# तारांचा वर्षाव!

विष्णु विनायक बोकील, बी. ए., बी. टी.

याचा

( प्रकाशित व अप्रकाशित कथाचा संग्रह )

प्रथमावृत्ति: १ जून १९३६.

कि. १३-

किंमत १। रुपया

कि. १-८-०

माझें पुढील प्रकाशन

**पुनर्भेट (भाग ३ रा)**

जुलै १९३६ मध्यें प्रसिद्ध होईल.

श्री विष्णु विनायक बोकील, बी ए, बी टी

याचा पहिला कथासंग्रह

**वळवांचे पाऊस** (किंमत १। रुपया)

**फोल आशा** (कादंबरी) किंमत २ रु.

**संकल्पित**

**स्वर्ग कुठे आहे?** (कादंबरी)

**गूळखोबरे** (कथासंग्रह)

# माझें प्रकाशन—

१ वळवांचे पाऊस ( कथासग्रह )

श्री वि. वि. बोकील किमत १। रुपया

२ पुनर्भेट भाग २ रा ( कथासग्रह )

श्री य. गो. जोशी किमत १ रुपया

३ दुर्दैवी मोहरे ( ऐतिहासिक चरित्रे )

श्री वि. गं. लेले किमत १ रुपया

४ पैसाच पैसा ( सचित्र नाटक )

श्री. माधवराव जोशी किमत १ रुपया

५ जीवन-पथ ( कथासग्रह )

श्री एन्. एम्. केळकर किमत १ रुपया

६ आवडत्या गोष्टी ( ६१ लेखकाचा कथासग्रह )

सपादक य. गो. जोशी किमत ३ रुपये

७ चित्तरंजन श्री पु. बा. साठे. किमत १। रुपया

८ फुलबाग ( कविता ) इन्दुकान्त. किमत १ रुपया

९ वायफळांचा मळा चिं. वि. जोशी किमत २॥ रुपये

१० वाहते वारे ( कथासग्रह )

( सपादक शिंत्रे व ब्रह्मे ) किमत १२ आणे

शिवाय सर्व तऱ्हेची पुस्तके आर्डरप्रमाणे पाठविलीं जातील

प्रकाशक—-यशवंत गोपाळ जोशी,

८५४ सदाशिव पेठ, पुणे न २.

माझी पत्नी

सौ. कमल

हीस—

— वि. वि. बोकील

# गारांचा वर्षाव !

## कटु सत्य ! : : १

'जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः। जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः ॥'

सहवासानें प्रेम वाढतें. प्रेमानें आशा दुणावते. आशेचा अंत कृतींत होतो. आणि त्याच कृतीकडे जगाचे डोळे लागतात. या सर्व अनर्थांचें मूळ सहवास.

मी काय लिहितों आहें हें माझें मलाच कळेनासें झालें आहे. वरील विधानें इतक्या व्यापक स्वरूपाचीं आहेत, कीं त्याचा स्पष्ट अर्थ करण्यास मला प्रसंगाची जोड दिलीच पाहिजे. आज संध्याकाळीं मी जगातून कायमचा नाहींसा होणार ! म्हणून ज्या गोष्टी दुसऱ्या वेळीं मला बिलकुल सांगता आल्या नसत्या त्या गोष्टी सांगण्याचें मी धारिष्ट करतों.

त्या दिवशीं शुभ्र चांदणें पडलें होतें. घरात पोराचा त्रास, गुराच्या धारा काढायच्या, अंथरुणें वगैरे घालायचीं म्हणून वहिनींनीं मोठ्या काकुळतीला येऊन हंसेला म्हटलें,

"बाई, तू तरी करतेस का माझं एवढं काम ? तेवढा मारुतीला नारळ फोडायचा आहे बापूला सांगितलं तर तो बिलकुल ऐकायचा नाहीं— मध्या, अरे कार्ट्यां, का उच्छाद मांडला आहेस असा ? बघ बाई, तेवढा नारळ घे नि—नारायणा, नको नको जीव झाला आहे अगदीं—मध्या, अरे का तिची शेपटी ओढतोस !"

प्रथम हसेनें जराशी टगळमगळ केली. नारळच सापडत नाहीं म्हणून तीनदा बाहेर येऊन उभी राहिली. इकडे वहिनीहि जराशी त्रासली, मध्याला दोन धपके मिळाले. तिला स्वतःला जरी वहिनींनीं बिलकुल मारलें नसतें तरी पण आता संपाकघरात राहणें श्रेयस्कर नाही असा पोक्त विचार करून हसेनें आपल्या दोन वर्षे वयाच्या हरीला उचललें व बाहेरचा रस्ता धरला. अगणात मी उभा होतों

" बापुराव, जरा मारुतीपर्यंत चलता का ? " तिनें मला विचारलें

मी केव्हाहि तयारच होतों, पण जरा चद्रबळ आणून म्हटलें,

" का, हरीला उचलायला हमाल पाहिजे वाटत ? "

हसाबाई माझ्याकडे किंचित् तिरक्या नजरेनें पाहून, ओष्ठद्वयाची मजेदार चाळवाचाळव करीत म्हणाली, " अन् श्रीकृष्णानीं द्रौपदीचे जोडे नव्हते का उचलले ? " मी निरुत्तरच झालों. पुन्हा काहीं तरी बोलणार होतों, इतक्यात हसेनें हरीला माझ्याकडे दिला. मीं तिच्या डोळ्याकडे पाहिलें. हसेच्या नवऱ्याला शिव्याची लाखोली वाहावेंसें मला वाटू लागलें. हसेचे डोळे काहीं विलक्षण होते. मला तिच्या त्या चिंचोळ्या हनुवटीवर दिमाखाने बसून राहिलेल्या इवल्याशा तिळाचा फारच हेवा वाटे. नावानें जरी गौरवर्णाची कल्पना होत असली, तरी खरोखरी पाहता हसा काळीसावळीच होती पण मग मला असें का वाटावें हें मोठेंच गूढ आहे

हरीला माझ्याजवळ देताना तिचा पदर त्याच्या वाळ्याला अडकला. तिनें पुष्कळ प्रयत्न केला, पण हरीनें तगड्या झाडण्यास सुरुवात केली व तिच्या नाकावर एक ठोसा ठेवून दिला 'कार्ट्या' म्हणून रागानें तिनें त्याचा गालगुचा घेतला. तो जास्तीच रडू लागला. शेवटी मला राहवेना

" हसाबाई ! जरा थांबा, मी सोडवतों तो गुता."

तिनें मोठ्या खुषीनें मला परवानगी दिली, पण मला धीर होईना. समजा, वहिनी बाहेर आली अन् मला हिचा पदर धरताना तिनें पाहिलें तर ? शिवाय दादा ऑफिसातून येण्याची वेळ झाली होती. मीं दरवाजाकडे पाहिलें आणि डोळे घट्ट मिटून पदर सोडवला.

वाटेनें माझ्या ओळखीचा कॉलेजातील तरुणाचा एक तांडा भेटला. नको

होतें तेंच नशिबीं आलें. मी ओळख न देताच हसेशीं बोलण्यात गर्क झालों. मी म्हटलें,

" आज तिथि कोणती ? "

" अष्टमी मला वाटत, का ? "

" नाही, सहजच विचारल."

तरीहि एकजणाचें 'आहेऽऽब्बुवा!' ऐकू आलेंच. हसेनें माझ्याकडे चोरट्या नजरेनें पाहिलें. मी हरीच्या केसाशी खेळू लागलों. पुन्हा एकजण आम्हाला ऐकू जाईल अशा बेतानें पुटपुटला,

" नशिबान ध्याव लागत, बाबा "

आता मात्र मला राहवेना. मी हरीला हसेजवळ देण्याकरता पुढें झालों.

" हसाबाई, तुम्ही थोड हरीला घेता का ? "

" बापुराव ! " त्या जरा भयभीत होऊन म्हणाल्या.

" हरीला जरा घ्या म्हणतों ना—" मी निश्चयाने म्हणालों.

" बापुराव, काय करायचा विचार आहे तुमचा ? तुम्ही एकटे नि ते आहेत सातजण परिणाम काय होईल ? "

पुन्हा एकजण फिदीफिदी हसून म्हणाला,

" काय झोंबल्या आहेत मिरच्या लेकाच्याच्या नाकाला ! "

" हसाबाई, तुम्ही मुकाट्यान हरीला घेऊन घरीं जा. मी थोडा फिरून येतों."

" बापुराव, मारुतीला येण्याच तुम्हीं मला कबूल केल आहे, दुसऱ्याशीं मारामारी करण्याकरिता तुम्ही आला नाहीं ! "

" हसाबाई—! "

" काय ? "

" काही नाही." मी मुकाट्यानें चालू लागलों.

जरा वेळानें हसा मला म्हणाली,

" बापुराव, अस माथेफिरूसारख काय करता ? "

" काय झाल ? "

" साध्या गोष्टीला उगीचच इतकं का ? "

मला आश्चर्यच वाटलें.

" हसाबाई, मला त्याच तें कुजक बोलण आवडल नाहीं त्यातून त्या बोलण्याचा रोख सगळा तुमच्याव' होता. माझ्यावरिता तुमचा वा उगीच छळ ? "

जरा वेळ ती स्तब्धच होती नंतर माझ्याकडे पाहून ती म्हणाली,

" बापुराव, तुम्हा पुरुषाना यातल समजण खरोखर कठीण आहे. आम्हा बायकाना या गोष्टींकडे किनी कानाडोळा करून— मुद्दाम डोळयावर कातडं ओढून—चालाव लागतं याची तुम्हा पुरुषाना चिलकुल कल्पना यायची नाहीं. नुसत तुळशीबागेंत जाऊन येईन म्हटल तर छप्पनजणाचे डोळे नि शभराच्या जिभा—माझ्या जागीं जर तुम्ही असता तर—"

" तर—तर—तर—" मला काय बोलावें हेंच सुचेना.

" तर काय केल असतत ? बापुराव, एक वेळ मारणाऱ्याचा हात धरवेल पण बोलणाराच्या तोंडाला काय करणार ? तुम्हाला अस का वाटत, कीं तुमच्या 'आहे ऽ ऽ बुवा'चा आम्हाला मुळींच अर्थ कळत नाहीं ? उलट आम्हाला जर समाजान मोकळीक दिली असती तर आम्हीसुद्धा उद्या असेच अर्थपूर्ण शब्द तयार करू. आता जर तुम्ही त्याच्याशी बाचाबाची करीत राहिला असतां तर चागलीच शोभा करून घेतली असतीत. अन् पुन्हा माझ्या नावाचा गवगवा—"

" हसाबाई, माझी चूक झाली. पुन्हा मी अस—"

" उः ! वेड्यासारखी क्षमा कसली मागता ? पुरुषाचा स्वभाव नेहमीं असाच उतावळा असायला पाहिजे. एरव्हीं आम्हा बायकाच्या विवेकाची मातब्बरी ती काय ? "

" आहे खर ! " मी निरुत्तर होऊन म्हणालों.

मारुती वगैरे झाल्यावर तेथेंच आम्ही जरा वेळ चादण्यात बसलों. हरी बाजूला वाळूत कायसें करीत होता मीं मारुतीपुढें लावलेल्या दिव्याकडे पाहून हसत म्हटलें, " हसाबाई, मारुतीजवळून काय वर मागितलात ? "

त्या जरा वेळ वाळूकडेच पाहत होत्या. नतर खडे उचलून त्याचा सागरगोट्यासारखा उपयोग करू लागल्या. मला हसू आलें.

" खर सागायच बापुराव, म्हणजे माझा विश्वासच उडाला आहे "

" माझ्यावरून ? " मी तिच्याकडे पाहत म्हणालों.

" ह—आता कोण कुजक बोलत आहे बर?"

" बर, राहिल."

" बापुराव, हल्ली देवाविषयीं माझं मन थोडं कलुषित झाल आहे—म्हणजे जगात देवच नाहीं अस मला वाटू लागल आहे!"

" का? यजमानानीं बरोबर आफ्रिकेंत नेल नाहीं म्हणून होय?" मी थट्टेनें हसून म्हणालों.

" होय."

पुन्हा मला आश्चर्य वाटलें.

" बापुराव, खर म्हटल तर असल्या गोष्टी कुणाजवळ बोलायच्या नाहींत, पण मला तुमच्याजवळ सगळ—सग्गळ सागावस वाटत. अस का बर?"

मलाहि तेंच कोडें पडलें होतें.

" माझा माहेरचा गोतावळा बराच आहे, पण मला एकाजवळ उभसुद्धा राहावस वाटत नाहीं. त्यातून तुमची माझी जास्त ओळख म्हणजे ह्या महिन्यातलीच काय ती. मला पुष्कळ सागायच, कीं बापू म्हणून एक माझा मामेभाऊ आहे. फार हुषार आहे. पुन्हा तो कधीं आला म्हणजे मी त्याला आपल्या इथ जेवायला बोलवीन— आणि तुम्ही हसणार नसाल तर सागतें—"

" नाहीं हसत, सांगा."

" किनई तुमची ही कीर्ति ऐकून तुमच्याविषयीं एक प्रकारची भीतीच उत्पन्न झाली माझ्या मनात. हसायच नाहीं म्हणून कबुली दिली आहेत ह!"

" हो—पण मला का भीत होता? मी काहीं वाघबीघ होतों कीं काय तुम्हाला खायला?"

" तस नाहीं हो, पण म्हटल कॉलेजातले साहेब, पुष्कळ मुलींची ओळख, त्यातून हुषार! त्याना आमच गरिबाच बोलण कस रुचाव?"

" हसाबाई—"

" काय म्हटल साहेब?" ती माझ्या काठीशीं खेळत म्हणाली

" मला चिडवण्यात तुम्हाला आनद वाटतो का हो?"

" हें चिडवण झाल होय?"

घरीं आल्यावर वहिनी कडाडल्या,

" बाई–बाई—कोपऱ्यापर्यंत जायला का सोबत पाहिजे होती ? अन् बापू कशाला बरोबर ? मीं म्हटल असत तर आकाशपाताळ एक केलं असतन् त्यान. पण तिच्याबरोबर ? —बरोबरच आहे; आम्ही कोण, नात्याच्या ना गोत्याच्या ! "

मीं हरीला खालीं ठेवला. हसा त्याला घेऊन अगणात गेली.

* * *

दोन दिवसानीं हसेच्या नावावर तिच्या नवऱ्याकडून एक पत्र आलें. तें घेण्याकरता मोठ्या उत्सुकतेने ती माझ्याकडे आली. मी पत्र कोटाच्या आतल्या खिशात ठेवून दिले.

" पत्र तुमच नाहीं." मी निर्विकार मुद्रेनें म्हणालों.

" काय आल आहे पत्र ? वाचलत का ? " ती हात पुढें करून म्हणाली.

" अरे पण— ! पत्र तुमच नाही म्हणतो ना ? "

" इश्श, थट्टा पुरे गडे —काय आहे सागा ना पत्रात ? "

" हसाबाई, तेवढ माझ्या टाकाशीं खेळण सोडून द्यायला काय घ्याल ?"

" हा ठेवला —अगदीं झिजला नाहीं जरा हातात घेतला तर ? "

तिनें तो टाक खाली ठेवला. मीं जरा रागाचा आविर्भाव आणून म्हटलें,

" अशान तर लवकरच मिळेल पत्र पाहायला, बर का ? "

" अस काय पण बापुराव—द्या ना पत्र ? "

आता ताणून धरण्यात अर्थ नाहीं असें पाहून मीं पत्र काढून तिच्या हातात दिलें. तिनें पत्र न वाचताच त्याची घडी करून पोलक्यात ठेवली.

" का—पत्र घेण्यापूर्वीची उत्सुकता एकदमशी मावळली ? हो—कदाचित् माझ्यासमोर न वाचायचा नियम असल्यास— "

" पण तुम्हाला काय करायच आहे ? मी वाचीन नाहीं तर फाडून टाकीन!"

इतकें म्हणून जरा फणकाऱ्यानेच ती माझ्यापुढून जाऊ लागली मी तिचा हात धरून म्हटलें,

" हसाबाई— "

" ह—काय आता ? " खांदे उडवीत ती म्हणाली,

" लॉरा ला प्लँटीच ॲक्टिंग चालवल आहे वाटत ? खरच सांगू हसाबाई, तुम्हांला अस जरा तोऱ्यान चालताना पाहून मला त्या बाईची आटवण होते."

" मला नाहीं समजत असला पाणचटपणा—"

मी तिच्या अडवणुकीकडे लक्ष न देताच म्हणालों—

" नाक नकट—"

हसेचे डोळे मोठे पाहण्यासारखे होते.

" गाल लाबट—" मी म्हणालों

" आता पुरे करता का नाहीं ?—"

" सदा बेछूट वागणारा केशसभार—"

मी वाक्य पुरें करण्याच्या आतच तिने माझ्या तोंडावर हात ठेवला.

" इतकाच जर तुमचा आग्रह असेल तर नाहींच वाचणार तुमच्यासमोर." माझ्याकडे तिरक्या नजरेनें पाहत ती म्हणाली.

" तू नाहीं वाचणार—? ' एकवचनी संबोधन ! मीं लगेच जीभ चावली. हसा माझ्याकडे किंचित् मिस्किलपणानें पाहून हसत होती. मीं जरा सावरून घेण्याच्या तयारीनें म्हटलें,

" अन् मी वाचायला लावल तर—?"

" पहा मी वाचतें का तें ?"

आता मात्र अटीतटीची वेळ होती तिच्याजवळून तें पत्र हिसकावून घेणें शक्य नव्हतें, पण तिच्या मर्जीप्रमाणें तिला तसेंच सोडून द्यावें तर तें माझ्या मानी मनाला खपेना. मी जरा गोंधळात पडलों. माझी बावरलेली स्थिति पाहून ती चटकन् माझ्याजवळ आली व जरा उपरोधिक स्वरानें म्हणाली,

" बाकी पुरुषाची जात मुळी हेंगाडीच बर का जरा ! किती जरी शौर्याचा वरकरणी आव आणला तरी एक अठरा-एकोणीस वर्षांची मुलगी हा हा म्हणता नाडवते. अन् म्हणे स्वराज्य मिळवणार आहेत'—दिवे ओवाळा याच्या शौर्याला—" तिचे पसरलेले हाताचे पंजे मीं दाबून धरले—

" आईऽऽऽ!"

" का—आता का आईऽऽऽ?"

" हात सोडा ना ? आईऽऽऽ—पुन्हा नाहीं असं म्हणणार—"

मी हात न सोडताच म्हणालों—

" तडजोडीची भाषा बोलू लागलात तरी भांडणाची ही तेढ आता काहीं सुटणार नाहीं. आता एकच अट मान्य केली तर सुटका, नाहीं तर—"

"नाहीं तर काय—? काय करणार?" जरा ठसक्यानेंच ती उद्गारली.

मीं उत्तराचेऐवजीं हातावर जास्त दाब दिला

"शोभत का तुम्हाला हे? पुरुषासारखे पुरुष म्हणवता अन् असहाय अबलाचे हात मोडता?"

"अबला? —अन् तुम्ही? शाबास! असल्या एक शभर अबला जरी निघाल्या तरी तीस कोटि लोकाना भारी आहेत—"

"मग—'पुरुषासि स्त्री ज्ञान-माला—' त्यात काय बिघडल? पण हात सोडा—' आता सोडता कीं नाही हात? का ओरडू मोठ्यादा—"

"ओरडा—"

दोन्ही ओठ विरल करून तिनें ओरडण्याचा आव आणला; पण लगेच माझ्या हातावर डोकें ठेवून ती हसू लागली.

"पहा—पत्र वाचायच कबूल केलत तर सोडतों हात—आहे कबूल?"

तिने मानेनेंच हुकार दिला.

"नुसत मानेनच मी काय समजू? तोंडान हो म्हणा—"

"होऽऽहो! किती छळाल तरी—" मीं तिचे हात सोडले. पत्र खिशातून काढून तिनें माझ्याजवळ दिलें

"का? तुम्हीं नाहीं वाटत वाचीत?"

"ऊहू—"

मीं तें पत्र घेण्याकरता हात पुढें केला समोरच्या दारात सावली पडलेली आता माझ्या लक्षात आली. मी जरा चपापलों. दादा तर नाहींत ना? हसेनें एकवार माझ्याकडे पाहिलें व लगेच दारातल्या सावलीकडे पाहिले. तीहि पण जरा गोंधळल्यासारखी झाली मीं पत्र हातात घेऊन काहींच झालें नाहीं असा वरकरणी आव आणून जरा मोठ्याने म्हटले,

"हसाबाई, हें तुमच पत्र आल आहे वाटत घेऊन जा येथून—"

"असू द्या तिथच—मग घेईन मी ते," इतकें म्हणून हसा दुसऱ्या दरवाजानें पसार झाली. मीं पुन्हा दरवाजाकडे नजर टाकली सावलीचा मागमूससुद्धा नव्हता. मीं झटकन् दरवाजाकडे पळालों सैंपाकघरात शिरणाऱ्या वहिनीच्या लुगड्याचें निशाण मीं तत्काळ ओळखलें.

त्या दिवशीच्या त्या चोरून ऐकण्याच्या वेळेपासून मी जरा सावधच राहिलों. हसासुद्धां माझ्याशीं तोळामासाच बोलू लागली. जेवणें झाल्यावर नेहमींप्रमाणे माझ्या ड्रॉवरमधील सुपारी, लवंग वगैरे घेण्यास ती येईनाशी झाली. मला जरा चमत्कारिकच वाटलें. मी मोठ्या आशेने दरवाजाकडे पहावें तो मंजुळा मोलकरीण धुणें घेऊन जाताना दृष्टीस पडे. एक वेळ वाटे कीं, 'अ.! त्यात काय आहे? वहिनींनीं लपून लपून येवढें ऐकले तरी काय? दोन-चार शब्दच ऐकले मग हसा माझ्या आयुष्यात प्रवेश करण्यापूर्वी त्याच्याशींसुद्धा मी असेच नव्हतो का बोलत? त्याच्यात येवढे भिण्यासारखें काय आहे? शिवाय मी म्हणतों, ऐकले, तरी काय करणार वहिनी माझे? फाशीं तर नाहीं ना देत त्याबद्दल? आत्ता घरात जाऊन हसेला बोलावले इकडे तर काय हरकत आहे?' पण लगेच हसेच्या त्या चिंतातुर चेहऱ्याकडे दृष्टि फेकली, कीं माझें अवसान नाहीसें होई आणि मी मुकाट्यानें चालू लागें. पण पुस्तकात तरी लक्ष कसें लागावें? आमच्या घरात हे मूर्तिमंत नाटक चाललेले असताना शेक्स्पिअरच्या टेंपेस्टमध्यें मन कसें रमावें! आयुष्याच्या नाटकात वाहत असताना त्या नाटकातील आयुष्यात कसा शिरूं! मनाशीं पुष्कळ वेळा लढे खेळलों. असतील नसतील त्या मुद्द्यावर वाद माडून मनाची स्थिरता कायम राखण्याचा प्रयत्न करूं लागलों, पण हसेचें तें वदन पाहिले, कीं पुस्तकाच्या ढिगावर लाथ मारून तिच्या समजावणुकीकरता धावतच जावेंसें वाटू लागे—पण वहिनी दादाना या बाबतींत काहींच कळलें नसल्याचें दिसलें आश्चर्यच मी म्हणतों, नाहीं तर वहिनी आपल्या जातीनुसार तोंडात तीळदेखील भिजू देत नसत. पण या वेळेलाच काय त्याना बुद्धि झाली, राम जाणे! पण मला मात्र हसेशीं एकीकडे बोलण्याची चोरी झाली. वहिनी जरा कुठें यदाकदाचित् बाहेर गेलीच तर हसाहि त्याच्यापाठोपाठ हरीला खाकोटीला मारून चालती होई, आणि मला तिच्या या वर्तनाचीच जास्त चीड आली. एखाद्याला आजारून गोंजारून मग त्याच्या तोंडात मारणाऱ्या व्यक्तीला काय म्हणावें हेच मला समजेना. आयुष्यात इतका भित्रेपणा तरी काय उपयोगी? जरा तरी मनुष्याच्या अंगात धिटाई पाहिजेच. हरीच्या अंगात सदरा अडकवण्यासुद्धा प्रथम प्रथम ती माझ्याकडे त्याला घेऊन येई. मी थट्टेनें तिला थोडेसें

टोंचून बोलेसुद्धा त्या वेळेस—'कीं काय ही बायकाची जात परावलची! स्वतः-च्या मुलाच्या अंगात फडकें अडकवायलासुद्धा पुरुषावाचून चालत नाहीं!' तीहि पण त्या वेळेस तसेंच काहीं तरी उत्तर देई. पण आता मात्र सगळा प्रकार बदलला. हरीला सदरा घालायला वहिनींचा मधू चालू लागला. मला वाईट वाटलें. कदाचित् आपल्या प्रेमाच्या व्यक्तीनें आपल्यावर सर्वस्वी अवलंबून राहावें अशीच पुरुषाची विचारसरणी असल्यास न कळे. काहीं का असेना, पण हंसेचें जरा फटकून वागणें मला विषासारखें प्राणघातक वाटू लागलें.

मी दोनदा-तीनदा या परिस्थितीशीं झगडण्याचा प्रयत्न केला, पण तो निष्फल झाला. हंसा आमच्याकडे आल्यापासून कर्मधर्मसंयोगानें तिची ट्रंक माझ्या खोलींतच पडली होती. ट्रंकेच्या सबबीवर माझ्या खोलींत तिची सारखी जा-ये असे, पण अलीकडे मंजुळाच येऊन ट्रंकेंतलें जरूरीचें सामान काढून नेऊं लागली. एके दिवशी ती ट्रंकसुद्धा मंजुळेनें माझ्या खोलीतून नेली—माझ्या आशेचा धागा एकदम तुटला. मी जरा रागानेंच त्या दिवशीं हंसेला वहिनींच्यादेखत म्हटलें,

"हंसाबाई, आज ट्रंक दिसत नाहीं तुमची माझ्या खोलींत?"

"मंजुळेन आत आणली असेल—" असें जरा तुटकपणानें उत्तर देऊन हंसा पटकन् बाहेर निघून गेली. मला राग आला. या तुसड्या वर्तनाचा काय अर्थ काढावा? मीं वहिनींकडे कपाळाला आठया चढवून पाहिलें वहिनी हसू लपवण्याकरताच की काय, नाकाच्या शेंड्यावर बोट ठेवून उभ्या होत्या. खरो-खरच मी इतका संतापलो होतों, कीं जर त्या वेळेस दादा का तेथे नसते—तर मीं काय केले असतें याची कल्पनाच करणें जास्त श्रेयस्कर होईल. मी तसाच भूक नाहीं म्हणून अर्धपोटीं उठलो नि बाहेर अंगणात गेलो अंगणात बाकावर मधू निजला होता, हरी त्याच्या शेजारीच खालीं निजला होता, हंसा बागेच्या फाटकावर डोकें ठेवून उभी होती. मी थोडा रागानेंच तिच्याजवळ गेलों. बराच वेळ तिच्या हालचालीकडे मी न्याहाळून पाहत होतों.

दादा जेवत होते, तेव्हा वहिनी गुंतलेली होती. मी हलकेच हंसेच्या खांद्यावर हात ठेवला. हंसेने जरा दचकून माझ्याकडे पाहिलें. अंधारात

तिच्या गालावर मोत्याचे सर चमकताना मला दिसले. माझा सगळा राग नाहींसा झाला.

"हसे, अधारात, एकीकडे—अस का बर रडतेस?"

तिनें फाटकावर डोकें ठेवलें व अश्रूना पूर्ण वाट करून दिली मीं तिचा हात धरून तिला माझ्याबरोबर बाहेर नेलें. दादा बाहेर येण्याची वेळ झाली होती, तेव्हा जरा लाबच गेलेले बरें. तीहि मला अश्रु दिसू न देण्याकरिता खालीं मान घालून—मुकाट्यानें माझ्याबरोबर चालू लागली. बरेंच दूर गेल्यावर एका पाडलेल्या झाडाच्या बुध्यावर मीं तिला बसवलें. मी तिच्यापुढें खालील गवतावर बसलो बराच वेळ कोणीच काहीं बोलेना—शेवटीं मींच हिय्या करून म्हटलें,

"हसे—रागावलीस का माझ्यावर?"

हसा काहींच बोलली नाहीं. वाऱ्यानें भुरुभुरु उडणाऱ्या केसाशींच ती खेळू लागली.

"हसे, ही नसती तेढ का वाढवतेस? हें तुझ रुसण नि फुगण तुला बर वाटत असेल, पण इकडे माझा जीव चालला आहे याची तुला काहीं तरी क्षिति आहे का? हसे, तुझ्या या तुसडया वर्तनाचा मी काय अर्थ समजू?"

"दैवानच पाठ पुरवली, तिथ मी दुसऱ्याला कशाला त्रास देऊ?" ती सद्गदित कठानें म्हणाली.

"मी नाहीं समजलों—" मीं म्हटलें.

"अज्ञानातच जिथ सौख्य आहे तिथ प्रत्यक्ष ज्ञान केव्हाहि कटु असतं"

"हें बघ हसे, तू म्हणीबिणी बाजूला टाकून जरा सरळ बोललीस तर माझ्यावर मोठे उपकार होतील! काय, झाल आहे तरी काय तुला आज? ट्रकेविषयीं मी बोललों तर तूच परक्यासारख उत्तर देऊन बाहेर आलीस. अलीकडे तुला माझ्यासमोर उभ राहण्याचाहि वीट आलेला दिसतो आहे. ऐकून घे—उगीच रडून मला का त्रास देतेस? हसे, तुला खोट वाटेल, पण खर सागायच म्हणजे तुला रडताना पाहून माझ्या काळजाच पाणी पाणी होत आहे! पूस ते डोळे."

तिनें पुन्हा उगम पावणारे अश्रु मोठया प्रयासानें दाबून धरले—तरी पण ओठाची कसरत चालूच होती.

"हसे, सोन्यासारखं सुखानं आयुष्य जात असताना—वेडे, असं तुला रडू का आठवलं? की माझ्यावर रागावलीस? सांग—सांग ना!"

"तुमच्यासारख्या देवमाणसावर रागावून मी काय बरं मिळवणार? मी माझ्या दुर्दैवाला रडतें आहें. तुमच्यावर माझा काहींएक बोल नाहीं." तिनें मोठया कष्टाने म्हटलें

"मग——माझ्याशीं पूर्वीसारखं का बोलत नाहींस?"

"तें आपल्या वहिनींनाच विचारा"

आत्ता माझ्या डोक्यात प्रकाश पडला! "पण वहिनींनीं काहीं बोलायला बंदी केली नव्हती" मीं म्हटले.

"नाही—पण स्त्रियांचीं हृदयं स्त्रियानाच माहितीं तुम्हाला राग येईल, पण तुमच्या वहिनी काहीं बोळ्यानं दूध पिणाऱ्या नाहींत हें खूप समजा!"

"वहिनी दादापाशी बोलली का?"

"हो—"

"मला नाहीं तसं वाटत! एरव्ही दादा नसते का मला तसं बोलले—"

"हेंच का तुमचं शिक्षण? दादा पक्के व्यवहारी आहेत, हें तुम्ही कसं विसरता?—तुमच्या दादानीं माझ्या मामाना पत्रसुद्धा धाडलं आहे!"

"तुझ्या मामाना पत्र?——"

"होय!—त्यात काय लिहिलं आहे हें काहीं समजायला मार्ग नव्हता, पण मजुळेन पोस्टात टाकायचीं पत्रं मला दाखविलीं, त्यात माझ्या मामाच्या पत्त्याचं एक पाकीट होतं."

"असंऽ!" मी विचार करू लागलों.

"आता तुम्हीच सांगा——मी काय करू अशा वेळेला! तुम्हाला माहीत नसेल, पण माझं आयुष्यच मुळीं असं चमत्कारिक आहे. लहानपणापासून माझ्या कपाळीं सदाचीच रड लागलेली. लहानपणी दहाव्या वर्षीच आईबापाना वाटेला लावून बसलें नि मामामामींच्या करड्या अमलात वागू लागलें. परमेश्वराची सारखी करुणा भाकीत होतें, की नारायणा! काय वाटेल तें कर, कुणाच्याहि गळ्यात बांध, पण या मामीच्या धुण्यापाण्यातून मला सोडव. माझ्या बाराव्या वर्षींच माझं लग्न झालं मला किती आनंद झाला म्हणून सांगू! मला जर कोणी सांगितलं असतं तर मी माझ्या अंगच्या

कातड्याचे जोडे शिवून त्या परमेश्वराला अर्पण केले असते। दोनचार वर्षे जरा थोडींशीं बरीं गेलीं. सोळाव्या वर्षींच मातृपद मिळाल तरी मला आनंदच वाटत होता. हरीला दुसऱ्याना दाखवताना मला कोण गर्व वाटे! नि माझ्या बरोबरीच्या मैत्रिणीसुद्धा माझा हेवा करताना पाहून मी म्हणजे कोणी असाधारण देवता आहें असच मला वाटू लागल. पण एक गोष्ट मला जरा त्रास देत होती—" इतकं बोलून ती थाबली. मी तिच्या या लाबच लाच कहाणीकडे आश्चर्यानेंच कान देऊन ऐकत होतों.

"ती म्हणजे— मला त्या आयुष्यात काहींच राम वाटेना!—इकडच्या- विषयीं मला फारस बोलता येणार नाहीं—अन् येईलहि. स्वभाव पडला जरा तामसी, त्यातून मी काहीं मर्जीला केव्हाच आलें नाहीं. आईबापाच्या धाका- मुळ म्हणा, अगर पदरीं पडले नि पवित्र झालें म्हणून म्हणा, माझ्याबरोबर ते आयुष्य ढकलीत होते. मी मोठ्या उत्सुकतेन एखादी गोष्ट करावी अन् त्यानीं माझा पूर्ण विरस करावा. मी पुष्कळ दिवस खपून एक गळपट्टा तयार केला होता सासूबाईच्या शिव्यासुद्धा खाल्ल्या रात्रीं जागण्याबद्दल! आणि तो पट्टा त्यानीं माझ्यादेखत फाडून टाकला. मला काय वाटल असेल, सागा बर? बायका शिकलेल्या नसल्या तरी त्यानाहि भावना असतातच. एवढच, कीं त्या जास्त सहनशील होतात! कारण त्याना आपला कमीपणा चागलाच जाणवतो. पण सहनशीलतेला तरी मर्यादा आहेच कीं नाही? काहीं तरी क्षुल्लक कारणावरून बायकोचा शब्दान का होईना, तुम्ही अपमान करू लागलात तर एक वेळ खपेल, दोन वेळा खपेल--तिसऱ्या खेपेला मात्र त्या बायकोलाहि धट्टपणा येईल. आणि ती धट्ट आहे म्हणूनच जर तुम्ही तिचा राग राग करू लागलात--प्रेमाचा एक फुकटचा शब्दसुद्धा नाही—तर कोणती तरुण बायको जीव धरून राहील? माझ्या आयुष्याचे पुरते धिंडवडे उडायचे म्हणूनच कीं काय, मी विहिरीत उडी टाकून जीव देण्याचा बेत रहित केला!"

"काय वेड्यासारखा विचार हा?" मी म्हटले.

"तुमच ठीक आहे हो! पण बायकाची स्थिति मोठी नाजुक असते. सासरच्या कीडमुगीलासुद्धा दुखवता कामा नये, नाहीं तर नणदा जगात कशाला उत्पन्न केल्या आहेत? अशा स्थितींत यानी आफ्रिका गाठली. अर्थात् माझी जरूरी नव्हती त्याना. मीं पुष्कळ हट्ट घेतला, पण त्यानीं

आपला विचार तडीस नेलाच. आज हें सगळं मला आठवलं अन् माझ्या आयुष्यात जरा कुठं आशेचा अंधुक प्रकाश पडू लागला होता, तोंच पुन्हा हा त्रास—! आता तरी रागवाल का माझ्यावर?"

"हसे, खरंच तुला माझ्या सहवासात आनंद वाटतो?" मीं उत्सुकतेनें म्हटलें.

ती काहीच बोलली नाहीं. मूक राहून जर जास्त स्पष्टपणें उत्तर देता येतें तर वाचेचा तरी कशाला विटाळ, अशीच काहीशी तिची कल्पना असल्यास न कळे. मी तिचा हात धरून म्हटलें,

"हसे, झालं तें झालं, यापुढं तरी तुझ्यावर मी स्वप्नातसुद्धा रागावणार नाहीं. स्त्रीहृदयाची तू आज मला पुरती जाणीव करून दिली आहेस हसे, लौकिकदृष्ट्या तुझ्यावर माझी काडीचीहि सत्ता नसली तरी पण माझ्या मनाला वाटतं, की तू सर्वस्वी माझी आहेस तू कुठंहि ऐस, पण वेड्यासारखा विहिरीबिहिरीचा विचार डोक्यात आणण्यापूर्वीं लक्षात ठेव, कीं तू मरशील ती मरशील अन् तुझ्याबरोबर दुसऱ्या एका वेड्या तरुणाचा जीव घेशील. आत्महत्येबरोबरच माझाहि खून करशील! तेव्हा माझ्याविषयीं जर तुला थोडंस तरी काहीं वाटत असेल तर मला वचन दे पाहू, की असला विचार कधींहि मनात आणणार नाही म्हणून—"

तिनें मुकाट्यानें माझ्या हातावर आपला हात ठेवला. मीं तिला उठवून म्हटलें,

"चल, घरीं जाऊ आयुष्य जर अशा बंधनाच्या बाहेरच असतं तर जगातले किती तरी निरपराधी जीव सुखानं नांदले असते."

"पण राग गेला ना?" तिनें माझ्या खांद्यावर दोन्ही हात ठेवून म्हटलें.

"अनुराग मात्र कायम आहे!" मीं हसून म्हटलें

"आता कध्धीं-कध्धी माझ्यावर रागावणार नाहीं ना?"

"आता माझ्या गळ्याची शपथ मात्र घेण्याचं बाकी राहिलं आहे."

"पहा बरं—नाहीं तर पुन्हा जातीवर जाल"

"सगळेच कांहीं असे रागीट नसतात काहीं—" मीं म्हटलें.

"मग सांगतेंच—मामाचं आजच सकाळीं पत्र आलं आहे. आजच रात्रीं

ते येणार आहेत, नि उद्या मी मामाच्या घरीं जाणार— का? कपाळाचा घामसा पुसलात? रागवायच नाही म्हणून शपथ घेतली आहेत ह!"

काय बोलावें हेंच मला सुचेना.

"आल्या प्रसगाला तोंड द्यायला नको का?" ती सद्गद कठानें म्हणाली

"होय—पण हसे, तुझ्याशिवाय—अन् उद्या तू इथें नसताना—मी काय करू मग?" मी गोंवळून म्हटलें.

"मी येण्याच्यापूर्वी कस केलत? तसच."

"पण—त्या वेळेस तुझा-माझा सहवास नव्हता, त्यामुळ प्रेम नव्हत. अन् आता जर तू गेलीस तर— छे.! हसे, मामाना वाटेल ती थाप मारून मी त्याना येथून घालवून लावीन, नाहीं तर मीच तुझ्याबरोबर येईन."

"महाराज! हात जोडतें, पण तस काहीं करू नका"

"पण मग तू गेल्यावर माझ्याशीं इतक सलगीच भाषण कोण करील? माझ्यावर अवलबून कोण राहील?—हसे, तू नकोच जाऊस."

"माझ्या जाण्यायेण्यावर जर माझी सत्ता असती तर—"

"तर जन्मभर मला सोडून गेली नसतीस, असच ना?"

"पण तुम्हाला इतक वाईट का वाटाव बाई? अजून तुमच वय आहे—उद्या लग्न झाल्यावर सुखान नादू लागाल—"

"हसे, मी लग्न न करण्याचा निश्चय केला आहे—"

"का?" तिनें जरा हसून प्रश्न केला.

"हें तूच आपल्या मनाला विचार—"

"इश्श ऽ"

"खरच सागतों, खोट नाहीं. हसे, पाण्याच्या लोंढ्याला मोकळ सोडल असताना जी दिशा मिळते ती दिशा जगाच्या अतापर्यंत कायम. माझ्या तारुण्याच्या आकाक्षा, इच्छा—हसे, सर्वस्वीं तुझ्या हातात आहेत माझं मन तुझ्या ताब्यात आहे, तर दुसऱ्या एका जिवाला माझ्या आयुष्यात बळ-जबरीन ओढून त्याला जन्मभर पस्तावात कशाला पाडूं? आतां माझ आयुष्य नि तूं— काय व्हायच असेल तें होऊ दे."

घर जवळ आलें म्हणून आम्ही जरा दुरून चालू लागलों

"या भाउजी, कुठ गेला होतात इतका वेळ?" वहिनींचा आवाज होता.

"कोण बापुराव का?" हसेचा मामा!

"हसा, अग तुझी तयारी कर बाई. आम्हीं पुष्कळ आग्रह केला, पण तुझ्या मामाला उद्याच गेल पाहिजे ते म्हणतात." वहिनी म्हणाल्या.

मी कांहींच बोललों नाहीं. माझ्या डोक्यात विचाराचें काहूर माजलें होतें. एक वेळ वाटे, कीं स्त्रीजात वगैरे विचार बाजूस ठेवून एक अशी सणसणीत लगावून द्यावी कीं नाहीं, की वहिनी माझी जन्मभर आठवण काढतील. हसा कांहींच न बोलता हरीला खाद्यावर टाकून घरात गेली.

* * *

आज हसा आपल्या मामाबरोबर जाणार होती. सकाळीं तिनें सामानाची बाधाबाध केली. काय असेल तें असो, सकाळपासून डोकें ठिकाणावर नसल्यासारखें ती करीत होती. सामान बाधताना कांहीं सामान बाहेरच राहिलें. ट्रंकेंत सामान काही केल्या मावेना. तिनें पुष्कळदा खटपट करून पाहिली—शेवटीं त्रासून हरीला दोनतीन रपाटेहि तिनें चढवले. पण हरीला मारून टक कशी भरणार? ट्रंक पुढें ठेवून कपाळाला हात लावून बसलेली मीं तिला पाहिली

"काय झाल?"

"कांहीं नाहीं" माझ्याकडे न पाहताच तिनें उत्तर केलें. तिच्या आवाजात कारुण्याची छटा होती.

मी जरा घाबरून म्हटलें,

"हसे, इतक मनाला लावून घेण्यात काय अर्थ आहे? योगायोग असेल तर पुन्हा आपल्या गाठीभेटी होऊ शकतील."

"मला कससच होतय—' असें म्हणून तिनें ट्रंकेवर डोकें टेकलें.

जवळपास कोणी नाही अशी खात्री करून मीं झटकन् पुढें होऊन तिचें डोकें धरले.

"काय होतय तुला?"

"फिरल्यासारख होतय—आईऽऽग—'

"आज जाण्याचा बेत रहित केला तर?"

" काहीं नको—"

" पण तुला चक्कर करते आहे ना ? "

" जाईल आता मात्राबित्रा घेतल्यावर—"

" मी उगाळू का मात्रा ? "

" नको—पण तेवढ माझ लुगड नि हरीचे सदरे ट्रंकेंत बसवा."

मी तिच्या म्हणण्याप्रमाणें केलें.

गाडी दुपारीं तीनची होती ऊन्ह म्हणजे मी म्हणत होतें. खालून जमीन तापलेली, भोंवताली वातावरण तापलेलें, आणि डोक्यावर जणु काय विश्वामित्राचा शाप बसल्यामुळें सूर्यानें बाराहि डोळे उघडलेले. तसें स्टेशन आमच्या घरापासून लाब नव्हतें, एका हाकेच्या अतरावरच— पण हरी· सारख्या मुलाला कडेवर घेऊन, अनवाणीच ती हाकेची तडी ओलाडणें निदान हसेला तरी दुरापास्तच होतें. मामा आमच्याबरोबर असल्याकारणानें उघड्या डोळ्यानीं प्राण चाललेला मी पाहत होतों—आणि त्यातून मधूनें हट्ट घेतल्यामुळें त्यालाहि मीं आपल्या हातावर घेतलें होतें. उन्हाची तिरीप लागू नये म्हणून मी उजव्या हातात छत्री धरून जरा दुरूनच, पण छत्रीची सावली हसेच्या डोक्यावर पडेल अशा बेतानें चाललों होतों. मधूची वटवट चालू झाली—

" काका—ए काका—काकाऽऽ—"

" काय रे ? " मी जरा तुसडेपणानें म्हणालों.

" काका, मोत्याला घे ना रे बरोबर—"

मोत्याला दगड मारून मी आताच हाकललें होतें.

" जास्ती बडबड करशील तर तुलाहि दगड मारून घालवीन घरात." मीं त्याला गप्प बसवण्यासाठीं रागानेंच उत्तर केलें; पण काकाचा अत पाहण्याची त्याची तयारी होतीच

" तू मला दगड मारलास तर मी दादांना सागेन "

" कडेवर नीट बैस. आता हाललास तर देईन फेकून खालीं."

जरा वेळ तो स्तब्धच होता.

" काका—"

" काय आता ? "

" तुला एक मजा सागू ? "

" नको--तू गप्प बैस--"

" आत्ता आईन ह्याना ( हसेला नावानें हाक मारणें त्याला माहितीच नव्हतें जसें काहीं ) चोळीला कापड दिलें अन् गाडींत भात करायला तादूळ दिले—मीं पाह्यलें "

मला हसू आवरेना—हसाहि पण कपाळाचा घाम पुशीत हसली. मामा मागें वळून म्हणाले,

" पोरगा मोठा चलाख आहे बर का, बापुसाहेब. काय रे, येतोस का रे आमच्याबरोबर ? "

मधू जरा वेळ विचारात पडला नतर मला घट्ट बिलगून म्हणाला,

" अऽह ! काका येईल तर मी येईन."

काकाविषयींच्या भक्तीचें हें प्रदर्शन एरव्हीं मला मोठें सुखावह झालें असतें, पण आता मी त्या लहरींत नव्हतों. मधु पुढें म्हणाला,

" काका, त्यानीं तादूळ घेतलेले आहेत लुगडयात—मीं मागितले थोडेसे त्याच्याजवळ मला खेळायला, तर त्यानी मला काय दिल ? "

मीं त्याच्याकडे जरा कौतुकानेंच पाहिलें.

" हें बघ " म्हणून हसेनें त्याला दिलेल्या लिमलेटच्या गोळ्याचा पुडा त्यानें खिशातून काढला.

हसा इतका वेळ काहींच बोलली नाहीं. मी तिच्याकडे मधून मधून पाहत होतों, पण ती बोलण्याचें काहीं चिन्ह दिसेना आणि अशा मूकावस्थेंत वियोग होण्याची कल्पनाच त्रासदायक होती. आता ती डोळे मिटूनच चालली होती. मीं तिला हळूच म्हटलें,

" हसे, तू इतका वेळ बहिरेपणा धारण करून आता आधळ्याच सोंग चालवल आहेस वाटत ? "

डोळे किलकिले करून तिनें माझ्याकडे पाहिलें झोंपेंत चालणाऱ्या मनुष्याप्रमाणें तिची अवस्था झाली होती तिला घेरी येणार हें तर नक्की होतें. काय करावें या विचारात मी होतों, इतक्यात हरीसकट ती मटकन् खालीं बसली. भर रस्ता, उन्हाची वेळ, त्यातून मूल खाद्यावर—आसपास

कोठें सावलीहि नाहीं. मामानीं चटकन् मागें पाहिलें. दगडाला पाझर फुटेल कीं नाहीं ही शंका माझ्या डोक्यात खेळू लागली. पण नाहीं- हसेच्या सुदैवानें मामा मागें वळले. मामानी हातातील ट्रंक खालीं ठेवली व हरीला आपल्याजवळ घेतलें हसेचे डोळे मिटलेलेच होते. मीं तिच्या डोक्यावर छत्री धरली व मधूला खालीं उतरविलें, तशी 'पाय भाजतात काका' म्हणून त्यानें एकच आकान्त मांडला. मामा जरा वेळ विचार करीत उभे होते. जरा वेळानें माझ्याकडे वळून ते म्हणाले,

" बापूसाहेब, कसंहि करून मला गाडी गाठलीच पाहिजे."

" मग ? —पण आज राहिलात तर ? —त्यातून हसाबाईना चालवेलस मला नाहीं वाटत—" मी म्हटलें.

" हं, असं दिसतं खरं—पण गाडीची वेळ झाली वाटतं. छे, बुवा ! काय हें नसतं विघ्न—"

मामाच्या डोक्यातून काहींच नक्की बेत बाहेर पडेना, तेव्हा पुढाकार घेणें ओघानेंच मला प्राप्त झालें

" मधू— ए दगड्या— घरी पळ अन् मंजुळा घरात असली तर तिला घेऊन ये जा— पळ—"

मधूहि पण तेथें उभा राहून कंटाळला होता. तो लगेच पळाला

" मामा—तुमची गाडी सुटली आहे, तुम्ही जा आता— हसाबाईना आता येणं शक्य नाहीं. हरीला द्या माझ्याजवळ अन्—"

मामा चटकन् फटक् फटक् जोडा वाजवीत निघून गेले. उभ्या रस्त्यात, निजलेला हरी मांडीवर ठेवून. मी हसेला रुमालानें वारा घालू लागलों तिचें सर्वांग घामानें निथळलें होतें मी तिच्या तोंडावरचा घाम पुसला—पण ती शुद्धीवर येण्याचा रंग दिसेना.

* * *

दहा दिवस आणि दहा रात्री मला जागून काढाव्या लागल्या. हसेच्या रोगाचें निदान करणें मोठें कठीण होतें. काहीं डॉक्टरानी Brain fever, काहींनी Sun-stroke, काहींनी काहीं, काहींनी काहीं असा शेरा दिला. मला त्याच्या बोलण्याचा काहींच अर्थ समजत नव्हता. वरकरणी मी 'हो' 'नाहीं' वेळ पडेल तसें उत्तर देत असें. पण हा पापण्याआड दडलेल्या

बुबुळाचा खेळ पाहण्याकडें— एकवार तरी तिचे नाचरे डोळे उघडलेले पाहण्याकडे—माझें लक्ष गुतून राहिलें होतें. दगड होऊन पडलेल्या अहल्ये-प्रमाणें ती निश्चल पडून राहिली होती. तिला हरीची पर्वा नव्हती, माझी नव्हती— सर्व जग असून-नसून तिला सारखेंच होतें. मीं मोठ्या आशेनें तिच्या डोळ्याकडे पाहावें, हळूच तिच्या कानाशीं तोंड नेऊन 'हंसे', म्हणून मोठ्या कळवळ्यानें हाक मारावी— पण छे.! तिनें डोळे म्हणून उघडले नाहीत

शेवटीं तिच्या नवऱ्याला तार केली. तिचे सासूसासरे आले—पण ते तरी काय करणार? वहिनींनीं मात्र आपली शिकस्त केली! इतक्या लोकांचीं जेवणींखाणीं—सगळ्याचें जेथल्या तेथें—एक वेळ पूर्वींचे तिचे सर्व अपराध विसरून तिच्याशीं प्रेमानें बोलावें असें मला वाटू लागलें.

हसेच्या या असहाय स्थितीकडे पाहून मला एक घटकाभर का होईना, मोठ्यानें गळा काढून रडावेंसें वाटू लागलें दहाच दिवस—पण दहा वर्षांसारखे मला वाटले. दररोज सकाळ होई—सकाळची दुपार होई—दुपारची तिन्हीसाज होई व रात्रीचा अधार पसरू लागे, पण हसेला दिवसाच्या या चारी अवस्थाची बिलकुल जाणीव नव्हती. दुपार झाली, कीं डॉक्टरानीं सागितल्याप्रमाणें थोडेंसें हुलग्याचें पाणी, ताक वगैरे घालून, मी तिला चमच्याचमच्यानें पाजीत असें. कधी म्हणून तिचा प्रतिकार नव्हता, कीं अगिकारहि नव्हता. मला तिच्या या स्थितीचेंच राहून राहून वाईट वाटे. तिचे कपडे बदलणेंसुद्धा अशक्य होऊन बसलें होतें मला तर तें शक्यच नव्हतें, पण वहिनी आणि मजुळासुद्धा या कामाला तयार होईनात, आणि त्याचेंहि बरोबर होतें. हसा म्हणजे निव्वळ एक दगडाची बाहुलीच होती—त्यानीं तरी तिला दुसरें लुगडें कसें नेसवावें? एक पाय तळ्यात व एक पाय मळ्यात, अशापैकींच काहींशी हसेची स्थिति झाली होती. तळ्याच्या बाजूनें तिला कोण ओढू पाहत होतें हें जाणणें माझ्या कल्पनेच्या आटोक्याबाहेरचें होतें, पण मळ्याच्या बाजूला मात्र मीं उभा होतों. सुमारें एक-दोन महिन्यांपूर्वी जर कोणी मला माझ्या मनाच्या प्रचलित परिस्थितीची थोडीबहुत पूर्वकल्पना करून देण्याचा प्रयत्न केला असता तर मी त्याला खुळा समजून हसलों असतों. कारण त्या वेळेस हसा माझ्या आयुष्यात आली नव्हती.

ज्याप्रमाणे प्रशान्त सरोवराच्या मध्यभागीं एखादा दगड टाकला असता एका-मागून एक आणि एकाहून एक मोठ्या अशा लहरी उगम पावतात, त्या-प्रमाणें हसेने माझ्या मानससरोवरात गोंधळ उडवून दिला होता. फरक एवढाच, की पाण्याच्या लहरी काही काळानें अस्पष्ट होऊ लागतात आणि हसा तर दिवसेंदिवस माझ्यावर अननुभूतपूर्व ताबा चालवू पाहत होती. आणि याचे कारण काही केल्या मला सापडेना. वास्तविक हसेचा माझा अर्थाअर्थी सबध नाही ज्याच्यातर्फे तिचीमाझी ओळख झाली तो तर माझ्यापासून किती तरी दूर गेला होता हसेपेक्षा शतपटीनी सुदर अशा मुली माझ्या पाहण्यात आल्या होत्या तिच्यापेक्षा जास्त शिकलेल्या मुली माझ्या परिचयाच्या होत्या हसेवर प्रेम करण्याचा मला बिलकुल अधिकार नाहीं हे मलाहि पटत होत दुसऱ्या कैक अविवाहित मुलीवर प्रेम करण्याची मला मुभाहि होती आणि इतक्या अडचणी असूनसुद्धा हसा म्हणजे मला परब्रह्म वाटे. पूर्वजन्म नाहीं नाहीं, म्हणून आपण म्हणतों—मग हें असे का? पूर्वजन्मीचे लागेबाधे असल्याशिवाय हें असे आकर्षण कसें घडू शकेल? कीं याला दुसरीहि काही कारणपरपरा असू शकेल? मला तर या ठिकाणी पूर्व-जन्माच्या कल्पनेचाच जास्त भरवसा वाटतो.

मातेचें मुलावर निर्हेतुक—प्रत्यक्ष प्राणापलीकडे प्रेम असतें असे आपण म्हणतों पण मग हसाच या नियमाला अपवाद होती कीं काय? कारण हरीविषयीं तिला फारसें प्रेम कधींच वाटत नव्हतें. कीं माझ्या निरीक्षणातच चूक झाली होती? बायका शिक्षित असल्या, कीं आपण त्याच्यावर उद्धट-पणाचा आरोप लादतों. शिक्षणानें पोरी उद्दाम होतात, म्हणून कुरकुर करणारे पुष्कळच लोक माझ्या पाहण्यात आहेत. पुष्कळ विवाहेच्छु तरुण वरील सबबीवर शिकलेल्या मुलींशीं सबध टाळतात असें माझ्या पुष्कळदा पाहण्यात आले आहे— मग 'असे पति देवचि ललनाना तयासी अन्य भावना ना—' या आर्यस्त्रीच्या रूढ कल्पनेला लाथाडून देऊन बेछूट वागणाऱ्या हसेला काय म्हणावें लागेल? शिक्षण म्हणावें तर माझ्याजवळूनच मागच्या महिन्यात—Hansa या पाच अक्षराचा धडा तिनें घेतला होता. हसेच्या या कृतीला दुसरें तिसरें नाव देण्याची कल्पनाच मुळीं असह्य होती. रूढ भावनापेक्षा या प्रथमदर्शनीं मनाला धक्का देणाऱ्या—पण जगाच्या

सुरुवातीपासून तों आतापर्यंत थोडया-फार प्रमाणात अव्याहत चालू राहणाऱ्या अकारण वा सकारण प्रेमालाच जास्त महत्त्व आहे काय ? हें प्रेम शिक्षण पाहत नाहीं, काळ पाहत नाहीं, वेळ पाहत नाही, सर्व रूढ भावनाना झुगारून देतें. यात दैवी अश असण्याचा काही सभव असेल का ?

मी नेहमींप्रमाणें हसेच्या उशाशीं बसलों होतों. सकाळची वेळ होती. वहिनी अग धुवायला गेल्या होत्या. दादा कामावर गेले होते. हसेचा मामा रजा काढून आला होता, तोहि फिरायला म्हणून बाहेर गेला होता. हसेचा सासरा अगणात कायसेंसें करीत होता हसेची सासू ओलेत्यानें तादूळ वैरीत होती. खोलींत हसा व मीच काय तीं होतों. प्रथमेच्या चद्रकोरीकडे ज्या-प्रमाणें औत्सुक्यानें आपण पाहतों त्याचप्रमाणें मी हसेच्या काळ्या पडलेल्या नेत्रवलयाच्या बाजू निरखून पाहत होतों. मला आठवतें, लहानपणी— मी सुमारें पांचसहा वर्षांचा असेन नसेन— माझे वडील मला माडीवर घेऊन आमच्या पुण्याच्या वाडयाच्या अगणात बसत. प्रथमेचा चद्र—तो कितीसा वेळ दिसणार ? नवीन सदरा मिळेल या मूढ आशेनें अगावरचें सूत काढून त्याला वाहण्यात जो एक अपूर्व आनद वाटे त्याची कल्पनाच करणें बरें आज हसेनें डोळे उघडले तर तिला माझें आयुष्य वहायाला मी तयार होतों. पण 'आज चद्र उगवणारच नाहीं असें तर होणार नाहीं ना' ? ही ल्हान-पणची वेडगळ कल्पना मला आता भेडसावू लागली. हसेनें अखेरचेच डोळे मिटले होते कीं काय ? 'उगवेल अ आता चादोबा' असें म्हणून लहानपणीं आधाराचे शब्द ऐकवायला वडील होते, पण—आता मात्र मी निराधार होतों. दहा दिवस विंचरणें नसल्यामुळें सती जायला तयार झालेल्या चितोडगडच्या पद्मिनीच्या केसाची कळा तिच्या वेणीला आली होती. मला गहिवरून आलें, कठ दाटून आला परमेश्वरावर काडीचाहि विश्वास नसता एखाद्या भोळ्या-भाबडया वयोवृद्धेप्रमाणें मी मनातल्यामनात तेहतीस कोटि देवाना सहासष्ट कोटि नवस केले. मी तिच्या डोळ्याकडे पाहिलें तों—तों काय ? पृथ्वीवरचें स्वामित्व देण्याकरिता जर कोणी पुढें आला असता तर त्याला मी सातासमुद्रापलीकडे फेकून दिलें असतें—हसेनें डोळे उघडले होते ! हसा अर्धवट उघडया नेत्रानीं वर पाहत होती ! तिच्या गालावरील खळगी जास्त स्पष्ट दिसू लागली होती ! हसा जिवत होती आणि हसा किंचित् हसत होती !

" हसे, हसे—" माझ्याच्यानें पुढे बोलवेना तिच्या डोळ्यात अश्रु जमा झाले. मी हलकेच तिच्या डोळ्यातील अश्रु पुसून टाकून म्हटलें, " हसे ! वेडे, काय मला भेवडावल होतस ? हसे, मला त्रास देण्याचा काय विडाच उचलला आहेस का तू ? माझी परीक्षाच पाहायची होती तर या मार्गाशिवाय दुसरे मार्ग तुला काय सापडलेच नाहीत का ? "

तिनें किंचित् मान हलवली व बोलण्याचा प्रयत्न केला. पण तिच्या शब्दाचा स्पष्ट उच्चारच होईना. मी तिच्या तोंडावर हात ठेवून म्हटलें,

" अऽहः ! आत्ता नको बोलूस– आता बरी झालीस, की सर्व आयुष्यभर माझ्याशी बोलत बैस—तू जरी माझ्यावर रागावलीस तरी हरकत नाहीं—भाड पाहिजे तर माझ्याशी, पण हें मुक्याच नि आवळ्याच व्रत सोडून दे."

आजाराने तिचा हातसुद्धा रोडावला होता

" कोणाचे शाप भोंवताहेत हे तुला ? अगाची काठी—हातापायाच्या काडया– हसे, जन्म घेतलास तो साता जन्मीचीं पाप फेडण्याकरता का ग ? "

तिनें माझ्याकडे केविलवाण्या नजरेनें पाहिले यापेक्षा तिची पूर्वीचीच निश्चल परिस्थिति बरी होती असें मला वाटू लागले तिच्या डोळ्यात करुण-रसाशिवाय दुसऱ्या कोणत्याच भावनेला थारा नव्हता. तिच्याकडे पाहिलें, तों ती काहीं तरी बोलण्याचा प्रयत्न करीत होती मी जरा खाली वाकलों. ती हलकेच पुटपुटत होती,

" गळयात—मोत्याची माळ—आईऽऽगऽऽ—"

आता माझ्या लक्षात आलें तिच्या गळयात मी तिला दिलेल्या सिरो पर्ल्सची माळ होती ते मणी तिच्या मानेला खुपत होते. मी हलकेच तिचें डोकें उचलून ती माळ तिच्या गळयातून काढली. तिने माझ्याकडे कृतज्ञता-बुद्धीनें पाहिलें व माझा हात आपल्या डोक्याखाली घेतला. मी मोकळा असलेला हात तिच्या गालावर ठेवला तिनें किंचित् स्मित केलें.

आणि या वेळेस मला जगाची पर्वा वाटत नव्हती. हसेचें आजारी-पणातून उठणें म्हणजे तिचा पुनर्जन्मच होय तिच्या आजारीपणात तिच्या नवऱ्याला तिची दया आली नाहीं. सर्वजण– प्रत्यक्ष तिचा मामासुद्धा—दुरूनच तिचा मृत्यूशीं चाललेला हा झगडा पाहत होते. ती पुन्हा जिवत झाली असता, पूर्वी तिच्याविषयीं बेफिकीर असणाऱ्या लोकानीं आता तिच्यावर

काय म्हणून सत्ता गाजवावी ? तिने स्वत. मृत्यूशीं दोन हात करून त्याच्यावर जय मिळवला होता. तिच्या मर्जीप्रमाणें ती आता राहू शकेल ! आजारी पडली म्हणून तिच्या मामाच्या केसाच्या जटा झाल्या नव्हत्या, कीं तिच्या नवऱ्याचे डोळे खोल गेले नव्हते, की जगाला तिच्या आजारापासून काहींएक त्रास पडला नव्हता. आता ती बरी झाली होती—तिच्यावर तुम्ही काय म्हणून सत्ता गाजवणार ? तिच्या देहाची ती पूर्ण मालकीण आहे माळ ठेवण्याकरता तिच्या उशाखालच्या किल्ल्या घेऊन मीं तिची ट्रंक उघडली. ती मुकाट्यानें पाहत होती. ट्रंक उघडल्याबरोबर वरतींच पडलेल्या एका रेशमी हातरुमालाकडे माझें लक्ष वेधलें. तो रुमाल माझा होता मीं पेन्सिलीनें अक्षरें काढून दिल्यावर त्यावर Bapu म्हणून हसानें रेशमाच्या धाग्यानें माझ्या नावाचीं अक्षरें काढलेलीं मला दिसली मी रुमाल उघडून किंचित् आश्चर्यानें हसेकडे पाहिले. तिनें मला खूण केली. मी जवळ गेल्याबरोबर तिनें चटकन् माझ्या हातातून तो रुमाल हिसकावून घेऊन आपल्या पोलक्याआड दडवला मी जास्तच गोंधळात पडलों हिला रुमाल पाहिजे होता तर मला न विचारता, न कळवता, तिने तो का घेतला ? व आता पुन्हा हिसकावून घेऊन, सूर्यदर्शन होऊ नये म्हणून काढलेला कुणगा पटकन् जमिनींत दडवण्याकरता जीव टाकणाऱ्या एखाद्या कजुषाप्रमाणें—माझ्यापासून लपवून का ठेवला ? उघड उघड मागितले असते तर एक काय दहासुद्धा रुमाल मीं तिला बहाल केले असते—मग ही चोरी का ? मीं तिच्याकडे पाहिलें. तिनें माझ्याकडे एखाद्या गुन्हेगाराप्रमाणें पाहिलें व ती थोडीशी हसली.

" हसे, तुला रुमाल पाहिजेत का ? " मीं म्हटलें. तिनें मानेनेच नको म्हणून म्हटलें

" मग— ?" मीं तिच्या पोलक्याकडे बोट दाखवून म्हटलें.

" तुम्हाला समजणार नाहीं." अशा अर्थानें तिनें मान हालवली. मी ऐकण्याकरता खालीं वाकलों—तिनें हलकेच म्हटले,

" सांगेन पुढं— पण हातरुमाल मला द्या—"

आत्ता माझ्या डोक्यात आलें मला सांगायला तिला धीर झाला नाहीं. मला न कळवताच माझी आठवण म्हणून माझा आवडता रुमाल तिनें आपल्याबरोबर घेतला होता. कदाचित् गाडींत बसल्यावर सांगण्याचा तिचा

बेत असावा. दरवाजा उघडल्याचा आवाज झाला म्हणून मी मागें पाहिलें— दारात मामा उभे होते वहिनी हातात लोण्यानें लडबडलेली रवी धरून उभ्या होत्या. मधू हातात एक चिपाडाची काडी धरून उभा होता.

मामानीं वहिनींकडे पाहिलें. वहिनींनीं नजरेला उलट सवाल टाकला. दोघानींहि माझ्याकडे व माझ्या शेजारीं पडलेल्या हसेकडे अर्थपूर्ण नजरेनें पाहिले मधू हातातील काडी घेऊन माझ्याकडे धावतच आला.

"काका, मला तू कडब्याच्या काडीची बदूक करून देईन म्हणाला होतास ना रे? दे आता!"

कडब्याच्या काडीची खरोखरच जर एखादी एनफील्ड रायफल तयार करण्याची माझ्या अगात जादू असती तर ह्याच रायफलनें मी त्या दिवशीं पाच खून करून आत्महत्या केली असती!

* * *

सुमारें एक महिन्याचा अवधि लोटला होता सुटी सपल्यामुळें मी पुण्यास निघालो. माझ्याबरोबर हसा व हरी होतीं. हसेला बरे वाटायला लागल्यापासून सर्वांनींच आपला तळ हालवला होता, तेव्हा तिला बरोबर नेणें माझ्यावरच पडले त्या दिवशीच्या त्या प्रकारापासून मामानीं माझ्याशीं बोलणें चालणें अजिबात बद केलें होते. आपल्या भाचीशींसुद्धा ते जरा कुर्‍यानेंच बोलत. मला एक वेळ हसू येई आणि पुन्हा वाईटहि वाटे वहिनींनीं व मामानीं त्या महिन्यात काय काय डावपेच रचले ते त्याचें त्याना माहीत एवढें मात्र खरें, कीं ही दुकल आम्हाला स्वस्थ बसू देणें शक्यच नव्हते घरात जो तो माझ्याशीं चढेलपणानेंच वागू लागला हसेला खाणें पिणेंसुद्धा वेळेवर मिळणें दुरापास्त होऊ लागलें. शेवटीं जेव्हा मी नरसिहरूप धारण करून एक दिवस वहिनींशीं दोन तास कडाक्यानें भाडलों तेव्हा त्या ताळ्यावर आल्या. दादाना माझ्याविषयीं तिरस्कार वाटत नव्हता; पण माझ्याकडे पाहून खिन्नपणानें उसासे टाकताना मीं पुष्कळ वेळा त्याना अचानक पकडलें होतें. 'काय काय पोराच्या नशिबीं आहे कोण जाणे! नाना असते तर माझ्यावरची जबाबदारी तरी टळती.' असे ते आपल्याशींच पुटपुटत असत. मला त्याचें समाधान करणें फारच जड गेले असतें. त्याचें आयुष्य अगदींच सपणें वाहत गेलें होतें.

वयाच्या अठराव्या वर्षी त्याना नोकरी लागली. सुरुवातीला पगार चाळीसच होता, पण पुढें वाढत वाढत आज अडीचशें रुपये पगार, पुन्हा अलावन्स वगैरे मिळून तीनशेंच्या घरात त्यानीं प्रवेश केला होता. एकोणिसाव्या वर्षी आईबापानीं ठरवून आणलेल्या मुलीच्या गळ्यात त्यानीं माळ घातली होती. ससारातले नेहमींचे खटके वजा जाता वहिनीचें व त्याचें कधींच भाडण झालें नाहीं मधू, सुशिला यासारखी दोन रत्नेंहि वहिनींनीं त्याना बहाल केली होतीं. एकदरींत आयुष्यात कुठें म्हणून कुरकुर करण्यास त्याना जागा नव्हती त्याना या गुतागुतीच्या प्रकरणाचा उलगडा व्हावा कसा ? हसेनें दादाना 'पक्के व्यवहारी' म्हणून म्हटलें होतें, पण तिची ती चूक होती. दादा काहीं काहीं गोष्टींत बायकोच्या पूर्णपणें अधीन असत. बायकोच्या मर्जीबाहेर वागणें त्याना फार जड गेलें असतें. माझें आयुष्य सर्व प्रकारें त्याच्याहून भिन्न होतें दादा सकोचवृत्तीचे तर मी फटकळ दादाचा नमतें घेण्याचा स्वभाव फार---मला लोकाच्या नाकात काड्या घालण्याचा मोह अनिवार. त्यामुळे माझ्या खोड्यावर पाघरूण घालणें, शिवाय वहिनींची समजूत काढणें---या दोन्हीहि गोष्टी त्याना साधत नसत. नवराबायकोमध्यें जर खटके उडालेच तर त्याचें कारण मी होतों. अशा परिस्थितींत दादाना माझ्याविषयी थोडेंबहुत वाटल्यास नवल नाही मी जायच्या दिवशीं स्टेशनवर मला एकीकडे नेऊन त्यानी माझ्या हातात एक शभराची नोट हलकेंच ठेवून दिली. मी नको म्हणून परत करणार, इतक्यात दादा झटकन् बाजूला होऊन दुसऱ्याच एकाशीं बोलण्यात गर्क झाले. गाडी सुटताना माझ्या खिडकीशी येऊन खिशातून चार सुपारीचीं खाडें, काही वेलदोडे, मूठभर लवगा वगैरे काढून त्यानी माझ्या हातात ठेवलें. मला गहिंवरून आलें, आणि शक्य असतें तर आम्ही दोघेजण एकमेकाच्या गळीं पडून मुक्तकठानें रडलों असतों. हसा दुरून सर्व पाहत होती. तिचेहि डोळे पाण्यानें भरून आले होते. दादानी शेवटी म्हटलें---

"जपून रहा---अविचार करू नकोस. तुला कोणीहि जवळ केल नाहीं तरी मी आहें---"

गाडीची शिटी झाली व तें वाक्य अर्धवटच राहिलें.

गाडी चालू झाल्यावर मी मधल्या बर्थवर येऊन पडलों.

"हसे, इतके दिवस भरत, राम, लक्ष्मण याच्या प्रेमाला मी भडक रंगानं चितारलेल्या कल्पना समजत होतों. पण सत्यसृष्टींत दादा-चापूसारखे सहोदर त्या व्यासाच्या कविकल्पनेला माग टाकू शकतील असं मला वाटू लागलं आहे." हसेला माझ्या म्हणण्याचा अर्थ कळलेला दिसला नाही. ती माझ्याकडे पहातच राहिली

*　　　　*　　　　*

पुण्यात हसा आपल्या सासरी गेली. मी माझ्या खोलीकडे गेलों तीन वर्षांपूर्वी या खोलींत प्रथम पाऊल टाकताना ज्या भावना माझ्या मनात होत्या त्या आज बिलकुल नव्हत्या प्रीव्हियसला आल्यावर मीं मनाशींच खूणगाठ बांधली होती, कीं काय वाटेल तें होवो, कॉलेजातून नाव मिळवूनच बाहेर पडेन, आणि आज नाव मिळवण्याकरिता मी काय करीत होतों? खोलींत दारावरच लिहून ठेवले होतें—'आत्मविश्वास ही यशाची गुरुकिल्ली आहे'! हसेसारख्या नाचऱ्या डोळ्याच्या मुलीनें माझा आत्मविश्वास पार धुऊन टाकला होता. 'असाध्य तें साध्य करिता सायास, कारण अभ्यास तुका म्हणे' म्हणून तीन वर्षे क्रमिक पुस्तकाचा जिवापाड समाचार घेत होतों. पण आज हातातल्या टेंपेस्टला लाथ मारून तें खिडकीबाहेर फेकून द्यावेंसें मला वाटू लागलें कृष्णाचा फोटो मीं टेबलावर ठेवला होता त्याच्याखालीच माझ्या घरच्या अभ्यासाचे वेळापत्रक लिहून ठेवलें होतें सकाळीं ६ ला उठून १० पर्यंत अभ्यास, दुपारीं ३ ते ६ पर्यंत अभ्यास, रात्रीं ८॥ ते १२॥ पर्यंत अभ्यास—मिळून चोवीस तासातून ११ तास मानेवर खडा ठेवण्याचा माझा कार्यक्रम होता, पण या वर्षी ११ तास तर राहिलेच, ११ मिनिटें तरी अभ्यास होईल की नाही, याचीच मला शंका वाटू लागली मीं तें वेळापत्रक—माझ्या गत आयुष्याचें स्मृतिचिन्ह—टर्रकन् फाडून टाकले, त्या तुकड्याखालीं काडी ओढली व हसेच्या घराकडे निघालो! हसा ओसरीवरच ट्रंकेतील सामान काढण्याच्या उद्योगात होती तिची सासू मागल्या सोप्यात निजली होती, सासरा माडीवर नित्यनैमित्तिक वामकुक्षी करीत होता. मला पाहिल्यावर ती हसून म्हणाली,

"ओहो! साहेब आले वाटत? म्हटलं आता कशाला गरिबाची आठवण होईल? अन् गरिबाच्या घरीं कशाला पायधूळ झाडतील?"

"का ? आठवण न व्हायला काय झाल ?"

"आता काय ? कॉलेजात मित्राना—मैत्रिणींना काय तोटा ? गरीब बिचाऱ्या हसेची आठवण राहते कशाला ?"

"ह समजल बर—पुरे करा आता शहाणपणा, बाईसाहेब—" मी जरा थट्टेनेंच म्हटले

"काय पण राग आलाय एका माणसाला ? अगदीं म्हणून अगदीं माझ्याशीं बोलण टाकून देण्याचा विचार आह ह ? राग डोक्यात चढला वाटत ! आता टाळूचे केस तरी जाग्यावर राहतोल का नाहीं शकाच आहे बाई !"

मी तिच्याकडे कौतुकाने पाहतच राहिलो. एक महिन्यापूर्वीं आजारी असताना काय जी थोडीशी विश्रान्ति मिळाला असेल तोंडाला तीच खरी.

दाराशींच टांगा थाबल्यासारखा वाटला बाहेर पाहिले, तो हसेचा नवरा टांग्यातून खालीं उतरताना दिसला मी झटकन् दूर जाऊन उभा राहिलों. मध्येंच घरीं परत येण्याचे काय कारण असावे बर ? कीं त्याच्या कानावर या बाबतींत काही गेले ? आणि किती ? ह्यापैकी सत्याचा अश किती व तिखट-मीठ लावलेला किती ? कदाचित् एरव्हीच आला असेल झाले. अ. ! त्यात काय भिण्यासारखे आहे ? काहीं का असेना—हसेला बिल्कुल त्रास पडू देता कामाचें नाहीं—त्या पायीं मी जन्माचा गुन्हेगार ठरलो तरी बेहेत्तर.

"काय नारायणराव, झाली का आठवण हिंदुस्थानची इतक्या लवकर ? नाही तर तुम्ही पडलात ऑफिसर लोक—एकदा कोणत्याहि कामात गुतलात की अम्मळ इकडच इकडे होईन म्हटल तरी वेळ मिळण कठीण—" मी म्हणालों.

माझ्या लक्षात आले, कीं नारायणराव कपाळाला आठ्या चढवून रागानें माझ्याकडे पाहण्यापेक्षा जास्त काहीं करीत नव्हते मी एकदम गप्प राहिलों.

"मी घर सोडून गेलों म्हणजे दुसऱ्याना मोकळ करून गेलों होतों अस वाटल काय तुम्हाला ?" ते म्हणाले. मला या वाक्याचा अर्थ समजला, पण प्रथमदर्शनींच भाडण नको म्हणून मी ओठ चावीत उभा राहिलों. हसेची काय स्थिति झाली असेल हें पाहण्याकरता मीं मागें वळून पाहिले, तों हसा तेथें नव्हती.

जरा वेळानें नारायणराव कपडे न काढताच घरात गेले. मी हसेच्या

ट्रंकेंतून एक जुना आनंदाचा अंक काढून वाचू लागलों. बराच वेळ आंत काहींच हालचाल दिसून आली नाही. नंतर रागाच्या शब्दाचा वर्षाव ऐकूं येऊं लागला. आत जावें कीं न जावें हा विचार मला सारखा त्रास देऊं लागला नवरा आपल्या लग्नाच्या बायकोला— अपशब्द असले म्हणून काय झालें— जर बोलू लागला तर त्रयस्थाला मध्यें पडण्याचा कितपत हक्क पोंहोचेल? जगाच्या—समाजाच्या दृष्टीनें मी त्रयस्थच नाहीं का? समाजानें नारायणरावाच्या हातात 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम्' शक्ति दिलेली होती. माझ्या हातात काहीच नव्हतें, उलट मी समाजाच्या दृष्टीनें अपराधी होतों. नवऱ्यानें बायकोला मारहाण केली तरी ती समाजाला खपेल, पण माझ्यासारख्यानें तिच्या हाताला गोंजारलेलें पाहून 'शान्त पापम्' म्हणून एकच हलकल्लोळ माजून राहील. काय करूं? दृष्टीआड सृष्टि करण्याकरिता तेथून खोलीकडे पळून जाऊं का? मग हसा— निराधार, निराश्रित अबला— तिचा वाली कोण? तिनें ज्याच्याकडे मोठ्या आशेनें पहावयाचें त्यानेंच जर तोंड काळें केलें तर—? मी पळून जाण्याची इच्छा मोठ्या कष्टानें दाबली. हातातील आनंद दूर कोपऱ्यात भिरकावून दिला.

जरा वेळानें हसेचे सासूसासरे बाहेर आले. मी त्याच्याकडे पाहिलें. दोघांनींहि भेदक दृष्टीनें माझ्याकडे पाहून खिन्नपणानें मान हलवली. सासूसासऱ्याची या बाबतींत काहींच मदत मिळेलसें मला वाटेना. प्रत्यक्ष अनुमति नाहीं तरी ते नारायणरावाच्या कृतीच्या आडहि येऊं इच्छीत नव्हते. हसेला आता माझ्याशिवाय कोणीच मित्र नव्हता—आणि अशा प्रसगीं पाठ फिरवण्याचा विचार—धिक्कार असो माझ्या जिण्याला! मी मुकाट्यानें हसेच्या सासूसासऱ्याकडे पाहत बसलों.

धप्पकन आवाज झाला. आवाजासरशी मी चमकून उठलों. दरवाजाकडे क्षणभरच नजर टाकली, आणि तीरासारखा स्वैंपाकघराकडे धावत निघालों. आत जाऊन पाहतों तों काय—चूल पेटलेली होती, पण चुलीवरच्या भाड्यातील पाणी तीत साडून राखेचा व वाफेचा एकच लोट उडाला होता. वैलाकडच्या बाजूस हसा जमिनीवर पडली होती. नारायणराव लाथ उगारून उभे होते. मीं त्याला दंडाला धरून बाजूस ढकललें व हसेच्या शेजारीं ओणवा झालों. हसेच्या कपाळाला खोंक पडली होती. रक्त पुसण्याकरतां मी

रुमाल काढू लागलों, तो माझ्या मानेला दोन्ही हातानीं धरून नारायणरावानें मला उभें केलें. काय होत आहे याची कल्पना डोक्यात शिरण्याच्या आतच माझ्या गालफडावर एक गुद्दा बसला व माझ्या डोळ्यापुढें अंधारी आली. मी पडणार–पडणार—अर्धवट गुंगींत असताना पुन्हा माझ्या पाठीवर एक गुद्दा बसला. मला काहींच सुचेना उभा राहीन म्हटलें तर आणखी एक गुद्दा बसण्याची भीति—आणि उभा तरी कसा राहणार? माझ्या डोळ्यापुढें—मला काहींच दिसत नव्हतें—मला काहींच समजत नव्हतें माझें डोकें भणाणून गेले होतें. मी पडल्या-पडल्याच पाहू लागलों. नारायणरावानें हसेच्या हाताला धरून उभें केलें, तो तिच्या तोंडात मारणार, इतक्यात माझें सर्व बळ एकवटून मी त्याच्या पायाना घट्ट मिठी मारली. पायाची मिठी सोडवण्याकरता तो खालीं वाकला, तेव्हा मी त्याच्या छातींत एक गुद्दा दिला. नारायणराव खालीं पडलेला पाहून मी कष्टानें उठून त्याच्या छातीवर गुडघे रोवून, त्याच्या गळ्याला बोटें रोवून बसलों हसा जर मध्यें पडली नसती तर— तर त्या दिवशी माझ्या हातून खून झाला असता!

"तुमच्या पाया पडतें, माझा त्रास मला भोगू द्या तुम्ही येथून निघून जा" हसा मला म्हणाली. मी तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून तसाच हटून बसलों. हसेनें डोळ्यात पाणी आणून म्हटलें,

"जा म्हणतें ना—"

"मी नाहीं जाणार तुला एकटीला टाकून"

"तूहि जा त्याचा हात धरून!" नारायणराव म्हणाला

मी ऐकत नाहींसें पाहून हसा रागाने म्हणाली,

"बापुराव, तुम्ही काय करता आहात याची कल्पना आहे का तुम्हाला? ते माझ्या कुंकवाचे धनी आहेत. ते मला तारतील किंवा मारतील. तुम्हाला त्याच्याशीं काय करायच आहे? झाली तेवढी शोभा बस्स झाली तुम्ही जात नसाल तर चार-चौघाना बोलावून आणून धक्के मारून तुम्हाला घालवून लावण मला भाग पडेल!"

मी तिच्या धमकावणीला भ्यालों नाही तर माझ्या हातून काही अविचाराचें कृत्य घडू नये ही तिची तळमळ पाहून मी उठलों. ती जरी रागानें बोलली होती, तरी रागाच्या मुळाशीं द्वेष, तिरस्कार, सूड ही भावना नसून

उत्कट प्रेम हीच भावना होती. नारायणरावाची व माझी तशी विशेष मारामारी झाली नव्हतीच. नाहीं तर शेजारपाजारचे लोक नसते का धावून आले? मारामारी म्हणजे काय—दोन गुद्दे दिले गेले नि दोन घेतले गेले. मी बाहेर न जाता बराच वेळ तेथेंच उभा राहिलों "का?—अजून जाण्याचा विचार नाहीं?" हसेनें रागानें म्हटलें

"तू पाहिजे,आहेस त्याला बरोबर!" नारायणराव कपटानें हसून म्हणाला.

मी दोन पावलें पुढें सरकलों. हसेनें झटकन् म्हटलें,

"रागान सांगितल तरी पटल नाहीं. काय—म्हणाव तरी काय तुम्हाला! खरच सांगतें, माझ्याविषयी जर तुम्हाला थोडीशी तरी कळकळ वाटत असेल तर तुम्ही आत्ताच्या आत्ता जा पाहू कसे? जा—जा—"

"अन् मग तू—?" मीं म्हटलें

"माझ दुर्दैव नि मी—जा, शपथ आहे माझ्या गळ्याची तुम्ही आता इथ राहाल तर!" असें म्हणून तिनें मला सैपाकघराच्या दाराबाहेर लोटलें. घरात बिऱ्हाडकरू नव्हते म्हणून ठीक, नाहीं तर त्याना बिनपैशानें घर बसल्या हें नाटकच पाहावयाला मिळालें असतें! मी जड पावलानें कोट सावरीत पुढच्या ओटीवर आलों. म्हातारा म्हातारी कपाळाला हात लावून जमिनीवर बसलीं होतीं. मी बाहेर पडणार, इतक्यात पुन्हा आवाज आला. मी थाबलों. काय वाटेल तें होवो, नारायणरावाचा गळा दाबून प्राण घ्यावा असें मला वाटू लागलें. पुन्हा मी दोन पावलें माघारी वळलों—पण हसाची शपथ! मी मनाशीच नारायणरावाला एक अभद्र शिवी हासडून घराबाहेर पडलों

* * *

आणि मीच नाहींसा झालो तर?

नारायणरावाला मी या बाबतींत बिलकुल दोष देऊं इच्छीत नाही, उलट मलाच त्याच्या दृष्टीनें दोषी ठराव लागल आहे. मित्रद्रोहाचें भयकर पातक माझ्या हातून घडलें असेंच तो म्हणणार. मी त्याला काय उत्तर देणार? प्रथम साव समजून दूध पाजलें होतें, पण मी सावाचें सोंग सोडून साप बनलों होतों असेंच त्याला वाटतें आहे. पण मी म्हणतों त्यानें तरी ही चूक केली नव्हती का? धर्मानें मित्र म्हणून जवळ केलेल्या लग्नाच्या बायकोला

निष्काळजीपणानें सोडून चालतें होणें यात त्याचा काहींच अपराध नव्हता का? कीं लग्नाची बायको म्हणजे पैशानें विकत घेतलेली चार दमडीची बाजारबसवी असा त्याचा समज होता?—भावनाप्रधान स्त्रियाना वागवण्याची ही तऱ्हा कोणालाहि पसत पडणें शक्य नाहीं. स्त्रिया शिकलेल्या नसल्या किंवा तुमच्या मर्जीनुरूप नसल्या तर त्या चुकीचीं फळें त्यानीं भोगायचीं, ही कोणत्या मुलुखाची रीत? कितीहि सुधारणा झाली तरी माझ्या मतें स्त्रिया काही अगी थोड्याबहुत प्रमाणानें पुरुषावर अवलबून राहणारच आपल्याला ज्याप्रमाणें आवडनिवड असते त्याप्रमाणें स्त्रियानाहि असण्याचा सभव आहे, ही कल्पना केव्हाहि नजरेआड करून भागणार नाहीं. तुम्हाला जसा आयुष्यात Romance असावासा वाटतो तसेंच कदाचित् त्यानाहि वाटण्याचा सभव आहे. नवऱ्यानें आपल्याशीं गोडीत बोलावें, आपण जें जें मोठ्या हुरूपानें करू त्याची नवऱ्यानें स्तुति करावी, आपण जर एखादी गोष्ट करू म्हटलें तर नवऱ्यानें त्याला थोडी तरी सवलत द्यावी, अशा विचारसरणीच्या कैक हसा आपल्या आसपास असतील. पण—'मुकीं बिचारी कुणिहि हका' अशा प्रकारचे नारायणराव तेवढे साव म्हणून सुटतात आणि हसा तेवढ्या अपराधी ठरतात! हा न्याय कोणाला पटेल तो पटो, पण मला तरी यात काही तरी चुकतें आहेसें वाटतें नवऱ्याशिवाय दुसऱ्या पुरुषाकडून सहानुभूतीची अपेक्षा करणें आपल्या सामाजिक बधनाना सोडून आहे मग निष्प्रेम आयुष्य हेंच हसेच्या कपाळी लिहिलेलें दिसते सामाजिक बधनें किंवा—समाजात साधारणपणें वागण्याचे चार नियम म्हणा पाहिजे तर—हे तरी आपणच आखलेले आहेत ना?—ज्या वेळेस हे नियम प्रचारात आले त्या वेळेंत व आताच्या वेळेंत केव्हाहि फरक राहणारच. त्या वेळचे हे नियम जगाच्या अतापर्यंत कायम राहावेत, त्यात बिलकुल फरक होऊ नये असा कोणी कायदा केला आहे? फिरत्या काळाबरोबर सामाजिक बधनेंहि बदलत राहणारच मग समाजाचा तरी इतका दुराग्रह काय म्हणून? हसेला जर नारायणरावाजवळ राहण्याची बिलकुल इच्छा नसेल तर जबरदस्तीनें तिचें आयुष्य त्याच्याशीच जखडून टाकण्यात काय पुरुषार्थ!

हसेच्या सासूसासऱ्याना मी एखाद्या सैतानासारखा वाटत होतों. त्याच्या दृष्टीनें मी त्याच्या मुलाच्या आयुष्याची राखरागोळी करणारा माग होतों.

त्याच्यावर अशा प्रकारचे प्रसंग पाहण्याची केव्हाच वेळ आली नव्हती. त्याचे दिवस आता राहिलेले नाहीत. वरच्या चिठीची वाटत पाहत आला दिवस ढकलण्यापलीकडे त्यांना या जगात फारसें काम नव्हते. त्यांची पिढी, त्याचे आचार, त्यांचे विचार, आज जात चालले आहेत. नवऱ्यानें ओसरीवर, झोपाळ्यावर बसून कांहीं लागलें तर 'काय ग, आहेस का घरात ?' या लांबच लांब वाक्प्रबंधानं बायकोला हाक मारण्याचे दिवस जात चालले आहेत. त्यांना जर मला मागहृदयी ठरवलें तर त्यांना दोष देण्यात केव्हाहि शहाणपणा होणार नाही.

दादांना माझ्याविषयी काय वाटत होतं हे मी मागे एक वेळ सांगितलेंच आहे. माझे आयुष्य हा त्यांना एक मोठा बिकट प्रश्न होऊन बसला होता. हा चार चौघाप्रमाणें वागून सुरळीत आयुष्य कसे घालवील हें त्यांना एक मोठेंच कोडें येऊन पडले होतें, आणि तें कोडें सोडवणे त्यांना शक्य नव्हतें. ज्याप्रमाणें पाण्यात जीव कसा जगवावा हे माशाच्या जन्माला गेल्याखेरीज समजणे शक्य नाही, तसेंच बापूच्या काय अडचणी आहेत, त्यांचे विचार काय आहेत, हे कळण्याला बापूच्याच जन्माला यावे, असे ते नेहमी म्हणून दाखवीत आणि त्यात बराच सत्यांशहि पण आहे! वडिलांच्यामागें कनिष्ठ भावाची जबाबदारी केवढी असते हें दादासारख्या ज्येष्ठ बंधूनाच माहिती.

वहिनीची विचारसरणी मात्र अतिशयच गूढ होती. वास्तविक हसेचा व तिचा अर्थाअर्थी काहीच संबंध नाहीं. हसा काही का करीना—तिला त्याच्याशी काहीहि कर्तव्य नव्हतें. आणि या सर्व गोष्टींना कारणीभूत वहिनी होती. वहिनीशिवाय ही गोष्ट झालीच नसती. वहिनींनी हसेशी विळ्याभोपळ्याचें वर्तन ठेवण्यात हसेनें त्यांचे असें काय केलें होतें ? प्रथमदर्शनीं कांहींच नाही असें उत्तर येईल, पण विचाराअतीं आढळून येईल, कीं हसेनें वहिनींचा एक अक्षम्य अपराध केला होता,—तो म्हणजे तिच्या दिराचें तिच्यावरचें प्रेम हसेनें आपल्याकडे ओढून घेतलें होतें. स्त्रियांच्या बाबतींत हा अपराध कांहीं लहानसहान नाही. कसें तें पहा—हसेचा व माझा परिचय होण्याचे पूर्वीं, मी जरी वहिनींशीं थोडाफार भांडत असें तरी घरात वहिनीच प्रमुख कार्यकर्ती असल्यामुळें पुन्हा मला तिच्याशीं एक व्हावें लागे.

घरात आमचें जरी भाडण होत असे तरी घराबाहेर परक्याशी बोलताना ती माझ्याशी दिराचें नातें केव्हाहि लावीत नसे, तर पाठचा भाऊ असेंच ती सर्वांना दाखवी. आणि प्रसगविशेषीं वहिनी आणि मी बहिणभावाप्रमाणें एकमेकाना आपली हृदये उकलून दाखवीत असू. लहानपणी माझा स्वभाव थोडासा हट्टी असे--सध्याकाळी दिवेलागणीच्या वेळेस काही तरी कारण काढून मी रडें, रुसे. दादानी मारल्यावर तसाच उपाशी निजे, पण सर्व झाकापाक झाल्यावर मला कपभर दूध आणून पाजल्याशिवाय काही तिला राहवत नसे मी जर काही आचरटासारखें बोलून तिला दुखवलें तर मला ती वेळी मारीसुद्धा—पण लगेच मला जवळ घेऊन माझे लाडहि पण करी काही का असेना, पुढें पुढे घरातल्या साध्या गोष्टीतसुद्धा तिच्यावाचून माझें चालेनासें झालें होतें. आघोळीला जाताना टॉवेल तरी विसरे--आणि मग मी ओलेत्यानेंच घरात आलेला पाहून तिनें सोवळयाओवळयाची कल्पना बाजूला ठेवून जरा रागानेच सैपाकघरातून उठून माझ्या अगावर टॉवेल भिरकावून द्यावा. तिच्या मनाची तर ठाम समजूत झालेली होती, की तिच्याशिवाय माझें एक पाऊलसुद्धा पुढें पडणें शक्य नाहीं. माझ्या दुर्बल-तेचा फायदा तिला मिळत होता, व त्यात तिला अभिमानहि वाटे. हसा आमच्या येथे राहयला येण्यापूर्वीच तिचीमाझी थोडीशी ओळख होती. पुढें तिच्या नवऱ्याच्या परवानगीनें चार दिवस हवापालट म्हणून तिला मी सुट्टीत माझ्या घरीं आणली, आणि तेव्हापासून वहिनीवाचून माझे चालू लागलें. दुपारचा चहा वहिनींनेंच तिच्या गळ्यात घातला होता. तेव्हा चहाला जर थोडा उशीर झाला, तर मी हसेच्याच नावानें ओरडत सुटे—वहिनीना फार उशिरा आपली चूक कळून आली. मला न कळत मी हसेला मोठेपणा देऊ लागलों हें वहिनींना कळू लागलें. पण त्याना उघड तसें बोलता येईना. हसासुद्धा माझ्या पुढें पुढें करण्यात आनद मानू लागली. मी बाहेर फिरायला गेलों असता माझ्या टेबलावर नीट व्यवस्था लावून ठेवणें, फ्लॉवरपॉटमध्यें ताजीं फुलें आणून ठेवणें, वगैरे वहिनींचीं कामें करण्यास तिनें सुरुवात केली. आणि साध्या गोष्टीत–आदल्या दिवशीं बाहेरून आल्यावर भिरकावून दिलेली टोपी सापडली नाहीं कीं—मी हसेला हाक मारू लागलों. मानी मनाच्या वहिनीना ही गोष्ट खपणें केव्हाहि शक्य नव्हतें. पुढें पुढें तर मी हसेला

फिरावयाला घेऊन जाऊ लागलो. वहिनींनाहि माझ्याबरोबर यावेंसे वाटे, पण घरात मजुळेवर देखरेख करणे, तिनें केरवारे नीट केले की नाहीं तें पाहणें, सध्याकाळच्या जेवणाची तयारी करणें सोडून त्याना बाहेर यायला कसें मिळणार ! अर्थात् या बाबतीत कुरकुर करण्यापलीकडे वहिनींना काहींच करता येत नव्हतें पण हसेचे हसणेसुद्धा त्याना विषासारखें वाटत असेल— आणि ते का ? तर मी हसेविषयी जास्त आस्था दाखवू लागलो म्हणून ! हसेचा सूड उगवण्यात मग सुक्याबरोबर ओलेंहि जरी जळले तरी पर्वा नाहीं, या नात्यानें मलाहि त्यानी सुखानें राहू दिले नाही. हसेला अपराधी ठरवण्या-करिता तिच्या मामाना साक्षी ठेवले—पण मामानी मलाहि अपराधी ठरवले हें तिला समजलें नाही का ? समजलें, पण त्याची सूडाची कल्पना इतकी तीव्र झाली होती, कीं त्या नादात आपल्या दिराचा आपण बळी घेत आहोंत ही कल्पना त्यानी जाणूनबुजून दृष्टीआड केली. आणि वहिनी, मी जगातूनच नाहीसा झालों तर तुला काय वाटेल ? वेडे, आज सूडाच्या भ्रामक कल्पनेंत जरी तू रगून गेली असलीस तरी ती धुदी उतरताच मला वाचवण्याकरता जरी एक सोडून दहा हसा तुझ्या दिराच्या प्रेमात भागीदारी भोगायला आल्या तरी बिलकुल न कचरता त्याना उदार हाताने मदतच करशील, पण मी जिवत राहावा असेंच तू म्हणशील. आज तुला तुझें मन माहीत नाहीं असें मी कसें म्हणू ? तुला स्पष्टपणें कळून चुकलें आहे, की तुझा दीर आता पूर्वीचा राहिलेला नाही, तर तो आता हसेचे सहानुभूतीचें निवासस्थान झाला आहे. त्याच्या मनात तुझ्याविषयीं दयेशिवाय कोणत्याच भावनेला थारा असणें शक्य नाही. आणि एकाद्यानें आपली कीव करावी ही कल्पना, मानी स्त्रिये, तुला पटणें शक्य नाही, त्याला मी तरी काय करू ? वहिनी, आपल्या अगच्या इतर गुणाबरोबर थोडासा विवेकहि घेऊन आली असतीस तर स्वतःचें आयुष्य, तसेंच दुसऱ्याचेंहि आयुष्य बेचिराख झालेलें पाहण्याचें आज तुझ्या नशिबी येतें ना

मामाना माझ्याविषयी काय वाटतें आहे हें मी सागण्यापेक्षा कल्पनेच्याच साह्यानें जास्त चागले पटेल. त्याच्या त्या रुबाबदार मिशा, फुगीर गाल, परमेश्वराच्या बापालाहि न जुमानणारें नाक, जगातल्या कोठल्याहि फणीचा विटाळ न लागलेले शेंडीचें घबाड, राणा भीमदेवासारखा गभीर आवाज—

मला वाटतें, शक्य असतें तर मामानी मला पुण्याच्या शनिवार वाड्यासमोर उभा जाळण्याची सजा ठोठावण्यास कमी केले नसतें. मी मेलों तर, 'बरें झालें —जगातलें एक पाप धुऊन गेलें,' असे म्हणून त्या दिवशी तरी निवातपणें हसून खेळून ते जेवतील

जगात माझ्याविषयी जर कुणाला खरोखरच काही वाटेल तर ते फक्त माझ्या मधूला सुटी सुरू होण्याच्यापूर्वी महिना-महिना आजूबाजूच्या पाचपचवीस घरातून " येणार, येणार—आमचा काका पाहिल्या तारखेला येणार, अन् मग आम्ही बॅट-बॉल खेळणार," असें म्हणून नाटक कपनीवजा जाहिराती फडकवण्याचे त्याला वेडच लागलें होतें. दादानी मी अमुक दिवशी येणार म्हणून माझें पत्र वाचलें, कीं त्या दिवसापासून येणाऱ्या-जाणाऱ्या गाडीकडे डोळे फाडफाडून पाहण्याचें त्याचें एक मुख्य कर्तव्यच होऊन बसे सकाळीं उठल्याबरोबर त्यानें " काका आला का ? " म्हणून पहिला प्रश्न टाकावा. यांत त्याचा स्वार्थ काय होता ? हसेला वाईट वाटेल—पण तिथें स्वार्थाची कल्पना आहे पण मधूला का वाईट वाटावे ? मी आल्या दिवसानतर निदान चार दिवस तरी मी बसेन तेथें पेगत पेंगत —पण पुन्हा डुलकी सावरून मी पुन्हा गेलों नाही अशी खात्री करून घेतल्याशिवाय त्याला राहवत नसे. शेवटीं तो तेथेंच झोपी जाई—आणि जाग्यावर नेऊन ठेवण्याकरता वहिनींनीं त्याला उचललें तर तो गडबडून जागा होई, व 'काका-काका' म्हणून रडूं लागे. मी कॉलेजात पुन्हा आलों, कीं चार दिवस रडूनरडून तो एकच आकात माडी. मधू, खुळ्या जीवा, काय तुझे माझे लागेबाधे असतील रे ? वेड्या, तुझ्याविषयी मला वाटतें तें येवढ्याचकरता, कीं परतभेटीची बिलकुल आशा न बाळगता तू आपलें प्रेम सर्वस्वी मला अर्पण करतो आहेस. बाळ, जा—माझ्यापेक्षा दुसऱ्या कोणातरी जास्त किंमतीच्या माणसावर तुझ्या बालप्रेमाची खैरात कर.

हसेविषयीं मी काय लिहूं ? असहाय, निराधार, अजाण—भयाण आयुष्यातून भटकत असता माझ्या आयुष्यात तिनें पाऊल टाकलें. जरा कुठें सुखाचा वारा वाहूं लागला तोंच मृगजलाप्रमाणें तिची अवस्था झाली. पुन्हा भयाण, उजाड आणि निर्माल्यवत् आयुष्य—

मी काय करूं ? मी हसेशिवाय कसा राहूं ? अभ्यास !—पण अभ्यास तरी

कशाकरता ? ज्ञान—! पण ज्ञान घेऊन तरी करू काय ? ज्ञान ही शक्ति असेल, पण त्या शक्तीचा उपयोग करताना पाहून मला शाबासकी देणारे नेत्रद्वय जर नाहींत तर-- तर काय करायचें आहे एवढा खटाटोप करून ? काय हें वेडे आयुष्य आहे ! दुसरें काहीच का उच्चतम ध्येय नाही ? असेल-पण ते आठवणें शक्य नाही. तत्त्वज्ञानाचें असे आहे, कीं एका विचारापासून सुरुवात करावी--पण शेवटी एक विचार ठरतच नाही. हसेपासून आयुष्याला सुरुवात केली. आता हा पसारा कसा आवरू ? की त्रासलेला तत्त्वज्ञानी शेवटीं खोलीतून उठून जातो तसा मीहि या विश्वाच्या बधनाबाहेर पडू ?

मला काहीच सुचेना मी खोलीत कसा परत आलों—वाटेंत मला दारुबाज समजून चार-दोन हेलकरी कसे हसले, त्या वेळेस मला काहींच समजलें नाहीं. आता मला थोडेंसे दिसू लागले आहे-! पण माझ्या हातात हें काय आहें ? मी दचकलो. आत्महत्या करण्याच्या समजुतीने पातें उघडलेला कोरा करकरीत वस्तरा माझ्याकडे पाहून विकट हास्य करीत होता— माझ्या डोळ्यापुढें हसा व मधू उभे राहिले. मी घट्ट डोळे मिटले--एक—दोन—

पण नाही—धीर होईना. आत्महत्येला लागणारें बळ मी कोठून आणू ? जगात जर परमेश्वर असेल तर त्याला माझ्या अगात एवढेहि बळ देण्याची हिंमत नव्हती ना ?

*　　　　*　　　　*

दार वाजलें मी हत्यार लपवलें व दाराकडे पाहिलें दारात हसा उभी होती मी डोळे झाकल्यासारखें करून पुन्हा उघडले— हो, हसाच ही आणि माझ्या खोलींत ! मीं हातातील हत्यार तिला न दिसेल अशा बेतानें ट्रंकेच्या मागें टाकलें.

तिच्या चेहऱ्यावर प्रेतकळा आली होती. रडून रडून डोळे सुजल्यासारखे झाले होते,—ओठ थरथर कापत होते, नाक लाल झाले होतें.

" हसे ! हसे ! नको रडूस आता—काय काय आपल्या आयुष्याचे धिंडवडे उडायचे असतील ते मुकाट्यान नकोत का पाहायाला ? अस धीर सोडून—काय मी वेडयासारखा बोलत होतों— आताच एका मिनिटापूर्वीं माझ्या हातात काय होतें ?

" पण आता माझ्याच्यान नाही सोसवत—" तिने स्फुदतच म्हटलें.

" हसे, नारायणरावानीं फार मारल का तुला ?" मी म्हटले. उत्तरा-ऐवजीं ती जास्तच रडू लागली.

" हसे—चल, मी सागतों तुझ्या नवऱ्याला—"

खवळलेल्या नागिणीप्रमाणें तिनें माझ्याकडे पाहून म्हटले,

" आता—ह्यापुढे ? प्राण गेला तरी मी त्या घराची पायरी चढणार नाहीं. तुम्हाला सकट वाटत असेल तर बाहेरचा एक घोडा घ्या नि तुमच्याच हातान माझा सोक्षमोक्ष करा—पण त्या घरी—?" पुन्हा ती रडू लागली.

मी चकितच झालों.

" जगानच जर माझा छळ माडला आहे—तर मी तरी काय म्हणून जगाच्या नियमान वागू ? आपण दोघेंहिजण, कोठेंहि—याच्यापासून दूर—दूर राहून आयुष्य घालवू—"

या नवीन कोडयातून सुटायला काय मार्ग आहे ?

## जग कुणाचें ? : : २

पुष्कळानी तिला पटवून द्यावें— " अग, हे जग आपल्यासारख्या गरिबा-करिता नाही ऐतोबा, दत्तकपुत्र अन् दिखाऊ लोकाच हें जग. लहान मुलाला देण्यात येणाऱ्या रिंगण्यापेक्षा आपल्याला जास्त महत्त्व या जगात नाही " तिनें किंचित् आश्चर्यचकित झाल्याप्रमाणें भुवया वर्तुळाकृति कराव्या अन् जरा वेळानें एक मुकहास्याची लकेर ठेवून द्यावी

आईबापाविना पोर ! अन् असते आईबाप तरी काय मोठासा फरक होणार होता ? एकानें भीक मागायची ती तिघानी मागितली असती. तिच्या पाचवीला भीक मागून आणलेल्या वस्तूचीच पूजा केली गेली होती. भीक मागून आणलेल्या वस्तूचाच नैवेद्य दाखविला गेला होता. भिकाऱ्याची पोर— भीक मागण्याचें ककणच बाधून जगात आली होती. परतु——

रूपालाहि लाजविणारा तिचा स्वभाव——

रस्त्यारस्त्यातून ती हिंडे अन् बऱ्याच गमती तिच्या पाहण्यात व ऐकण्यात येत. त्या गोष्टी ती लक्षपूर्वक पाही अन् नतर रात्री धर्मशाळेंतल्या दगडावर डोकें ठेवून पडताना आपल्या शक्तीप्रमाणें त्या गोष्टीचा साधासुधा अर्थ लावण्याचा ती प्रयत्न करी. पुष्कळ वेळा तिला समजे आणि कैक वेळा तिच्या चिमकुल्या मेंदूच्या आकलनाबाहेर ज्या गोष्टी जात त्याबद्दल ती मोठ्यानें हसून विचार करणेंच सोडून देई.

एके दिवशी दुपारीं अशीच ती नित्यक्रमाप्रमाणें एका नासक्या आंब्याची कोय चोखीत रस्त्यानें हिंडत होती रस्त्यानें काही तरुण स्त्रिया सोडा-वॉटरच्या फुटणाऱ्या बाटल्याप्रमाणें इश्शचे फवारे सोडीत चालल्या होत्या. कुठल्या तरी भागिनी-मंडळाच्या अध्वर्यु बहुतकरून असाव्यात त्या

" अग पण—" एकजण म्हणत होती.

" इश्श-अग पण किती वेळा 'अग पण' म्हणशील ?" दुसरी हसू लागली.

" तू जितक्या वेळा इश्श म्हणशील तितक्या वेळा " पहिली म्हणाली.

संभाषण चालूच होते काय असेल ते असो—भागीने आपली कोय टाकून दिली व त्या स्त्रियांच्या पाठोपाठ जाण्यास सुरुवात केली कुठल्याहि भगिनी-मंडळाच्या सभासद स्त्रिया येऊनजाऊन काय बोलणार ? पुरुषवर्गाचा अन्याय, नुकतेंच नामंजूर झालेलें देसायाचे दत्तक बिल–, अन् अखिल स्त्रियांची उन्नति—यापरते विषय तरी काय बिचाऱ्यांना मिळणार ?

बऱ्याच विषयांचा फन्ना उडविल्यानंतर बहुमताने ठरलें, की बायकांनी आता आपल्या पायावर उभे राहण्यावाचून भागणार नाही स्त्रियांनी 'उद्धरे-दात्मनात्मानम्' याचा अवलंब केल्याशिवाय सर्व व्यर्थ आहे

" ते काहीं नाही– मी सांगते की, इंग्लंडमध्ये सेफरेजीट बायकांनीं जशी चळवळ केली, त्याप्रमाणे आपल्याला केले पाहिजे अगदी अन्याय्य मार्गाने जावें लागले तरी हरकत नाही, परंतु पुढील फलावर नजर ठेवून चळवळ सुरू ठेवली पाहिजे स्वतःच्या पायावर उभें राहिले पाहिजे— " एक पोक्त-पणाचा आव आणणारी ( बहुतकरून आजच्या सभेची अध्यक्षीण असावी ) तरुणी उद्गारली.

संधि बरी आहे असे पाहून भागीनें तोंड उघडलें—

" साळूताई–रक्माताई,–अनपूरणाताई ऽ ऽ ऽ ऽ"

"इश्श ! काय ग बाई तरी–चल नीघ–" म्हणून म्हणत भगिनीमंडळाच्या सभासद स्त्रिया तोंडाला रुमाल लावून पुढें सटकल्या. बराच वेळ भागी आपल्या जागेवरून त्यांच्याकडे निरखून पाहत होती, आणि मनाशींच विचार करीत होती. परत फिरण्याकरिता सहज तिने जमिनीकडे पाहिलें एक चामड्याची लहानशी पिशवी खाली पडली होती जपरच्या खिशातून लगबगीनें रुमाल काढताना पैशाचे पाकीट खालीं पडले होते. भागीनें पाकिट उघडून

पाहिलें बरेच पैसे होते त्याच्यात. किती होते हें भागीला नक्की सागता येत नव्हते, परतु बरेच होते यात शका नाहीं तिने क्षणभरच दूर अतरावर कोपऱ्यावर वळणाऱ्या स्त्रियाकडे पाहिले, आणि मुकाट्याने तें पाकीट आपल्या चिंध्यात लपेटून घेतलं.

ती मोठ्याने हसली आणि धर्मशाळेची वाट चालू लागली.

* * *

भिकाऱ्यानी चोरी करू नये. कारण त्याना ती पचविणें शक्य नसते, हें भागीला माहीत नव्हतें असें नाही, परतु तिच्या मनानें पक्कें घेतलें होतें, की या पैशाच्या जोरावर आपण आपली उन्नति—का काय म्हणतात तें—करून घेणार विचार करता करता काय करावें या विचारातच तिचा डोळा लागला.

रात्रीं स्वप्नात तिने आपली उन्नति झालेली पाहिली. पहाटेची धूसर छटा आकाशात पसरलेली होती जिकडे तिकडे हवा कुद झाल्यासारखी दिसत होती मधूनमधून कृष्णवर्णीय ढगाचे अक्राळविक्राळ लोळच्या लोळ इतस्तत. नाचत होते. झाडाचे पानहि हलत नव्हतें मधूनच एखाद्या मरतुकड्या कुत्र्याचे दीनवाणें केकाटणें ऐकू येत होते

भागी जागी झाली. तिने चटकन आपल्या छातीशी हात लावून पाहिला पाकीट सुरक्षित होते तिला समाधान वाटले शेजारीच साचलेल्या पाण्याच्या डबक्याघर जाऊन तिने आपलें तोंड शक्य तितकें स्वच्छ करण्याचा प्रयत्न केला केस वगैरे पाण्याने ओलसर करून 'पुट्टन केल्यासारखे' केले.

फाटलेल्या वस्त्राला आणखी चार गाठी मारून कपड्याची साफसफाई केली पाकिटातलें थोडेसे पैसे घेऊन तिने मडईची वाट धरली. आज ती बागवानीण होणार होती थोडीशी फळे एका टोपलीत भरून ती आज शहरात हिंडून थोडीबहुत कमाई करणार होती.

" काय बर त्या आवा ( बायका ) म्हगाल्या ? आपूनच आपली वनती ( उन्नति ) करूनशान् घ्याया व्हवी, नव्ह का ? मीबी नावाची भागीच हाय चार दाम कमाई करीन. पाटलाशीं लगीन करीन अन् मग—मग—पधीन. पधीन अन् त्या बाईसारखी फाडफाड बोलाया लागन. आन् त्या बायाम्होर अस्सऽ बोलऽन—"

भागी मनाशींच हसली. पुढील वैभवाचें अस्पष्ट चित्र तिच्या डोळ्यासमोर तरळत होतें.

काहीं आंबे, काहीं केळीं, काहीं अजीर इत्यादि सर्व प्रकारची थोडीफार फळें खरेदी करून तिने टोपलींत भरली. इतकी फळफळावळ जन्मात पहिल्यानेंच ती पाहत होती. प्रत्येक फळ उचलावे, किंचित् लाबवर धरावें, नाकानें हुगावें व तोंडाला सुटलेलें पाणी ओठानें दाबून टाकीत ते फळ पुन्हा टोपलींत टाकावें यातच तिला परमावधीचा आनद वाटत होता कोणत्याहि गोष्टीच्या प्रत्यक्ष उपभोगात फारच थोडा आनद असतो, परतु त्या गोष्टीचा उपभोग घेण्याच्या कल्पनेंतच आनदाचा साठा असतो तें फळ पुन्हा पाटींत टाकताना जणू काय तें फळ खाऊनच आपण टाकीत आहोंत या भावनेनें भागीला आनद वाटत होता

परतु आता तिला प्रत्यक्ष व्यवहाराला तोंड द्यावयाचे होतें. हिशेबठिशेब करता येण्यास तिनें अजून एखाद्या हायस्कुलातील सहशिक्षणाचा अनुभव घेतला नव्हता. जगातल्या सोळा पावसाळ्याच्या अनुभवजन्य शहाणपणावरच तिची सारी भिस्त होती. प्रत्येक फळ घेतले केवढ्याला व विकायचें केवढ्याला हें तिनें आपल्या मनाशींच उलटसुलट विचार करून ठरवून टाकले. तिच्या हिशेबाप्रमाणे सर्व काहीं जुळलें असते तर आजच्या या व्यवहारात तिला आठबारा आण्याचा फायदा राहत होता. जणू काय तो फायदा मिळालाच अशा भावनेनें तिने पाटी उचलून डोक्यावर ठेवली व आपला रस्ता सुधारला

भिकाऱ्याची पोर होती, परतु आवाजीत ठसका होता. कमरेंत मुरड होती, दृष्टींत फिरकी होती व मानेंत गिरकी होती वर्ण काळसरच, परतु अवयवाची ठेवण काहीं न्यारीच आज पाटींत फळें टाकून निघालेली नोंकझोंकवाली छोकरी, काल एक भिकारीण होती असें म्हणण्याची कुणाची छाती होती ना!

आणि एका रगेल तरुणानें तिला पाहून तोंडातला रसहीन चोथा बाहेर फुस्कारून तिला शीळ घातलीच.

" क्यॅव्, चमेलीका फूल--ये क्या आज तूने लाया है ! "

तिच्या ओळखीचाच तो तरुण होता. एरव्हीं तिनें त्याच्याकडे पाहून त्याला उत्तेजित करण्यासारखीं आपल्या अवयवाची हालचाल केली असती,

परतु आज ती भिकारडी नव्हती. आज ती एक प्रतिष्ठित बागवानीण होती. ठसक्यानेंच ती " वारऽऽवा ! लईच दिसतुयास कीरऽऽ " म्हणून पुटपुटत आपला रस्ता चालू लागली एक प्रकारें त्या तरुणाचा हा उघडउघड अपमान होता रोज जी पोरगी एका डबलरोटच्या उष्ट्या तुकड्याकरिता त्याला पाहिजे तें सुख स्वखुशीने देत होती, तीच छोकरी आज वारे वा करून चालली होती हें त्याला कसें सहन होणार ? त्यानें दोन टागा टाकून तिच्या पाटींत हात घातला व हातानें उचलता येतील इतकीं फळे उचलून घेतलीं. स्वत॰च्या अब्रूचें सरक्षण जितक्या तत्परतेनें तिनें केलें नसेल तितक्या तत्परतेनें तिनें पाटी घट्ट धरून पळायला सुरुवात केली

कारण उघड होतें. तिला त्याच्याशीं दोन हात करणें शक्य नव्हतें. रोजच्या देहविक्रयाच्या बदला तो तिला खायला गोळाभर अन्न देत होता. देहविक्रीचा तिनें कधींच बाऊ केला नाहीं भिकाऱ्याला या भानगडींत लक्ष घालणें कधींच परवडत नसतें एखाद्या आचरट गोष्टी-लेखकाची भिकारीण मानधन असू शकेल, परन्तु प्रत्यक्ष व्यवहारात भागीसारख्या तरुणींचाच भरणा जास्त त्याना जगायचें असतें आणि जगण्याकरिता आवश्यक असणारा गोळा काहीतरी मोबदला शिवाय कोण देणार ? भिकारणीनें कसला मोबदला द्यावा ? एखाद्या पशूचें समाधान करण्याशिवाय त्याना पोटभर खाऊन जगता कसें येईल ? अर्थात् भागीला हें तत्त्वज्ञान फारसें समजत नसलें तरी एवढें तिला खास समजत होतें, कीं त्यात फारसा गाजावाजा करण्यात काहीं अर्थ नाहीं काहीं का होईना आज आपल्याला हक्कानें एखादी गोष्ट अशा पशूला नाडवून घेता येते ना ? बस्स ! पुरे आहे. एखादे वेळीं त्या तरुणाचें पैशाचें पाकीट तर लबे करता येतें ना ! मग काय हरकत आहे ?

परतु आज तिला ह्याचा—का कोण जाणे, कटाळा आला होता आज तिचें एरवींचें शून्य मन निराळ्याच विचारात गुग होतें म्हणून जास्त काहीं न बोलता ती कोपऱ्याआड होईतोंपर्यंत पळतच होती. डोक्यावरची पाटी एका घराच्या चौथऱ्यावर तिनें उतरली व राहिलेलीं फळें पुन्हा नीटनेटकी केलीं. काहीं झालें नाहीं असे आंतल्या मनाला वाटावें म्हणून तिने स्वतःशींच हसण्याचा प्रयत्न केला, परतु तो तितकासा यशस्वी झाला नाहीं.

ती पुन्हा पुढें चालू लागली.

वाटेंत एक मोठा जुनाट वाडा होता. त्यावरून जाताना कोणी तरी 'शुक्' केल्यासारखें तिला वाटलें. पाटीला हाताचा आधार देत तिनें वर पाहण्याचा प्रयत्न केला दुसऱ्या मजल्यावरून एक पोक्तसा गृहस्थ तिला खुणवीत असल्याचें तिला दिसलें क्षणभरच विचार करून उल्हसित अतःकरणाने तिनें वाड्यात प्रवेश केला एवढा मोठा वाडा, पण माणसाची बिलकुल गडबड नसल्याचे पाहून तिला जरा चमत्कारिकच वाटलें इतक्यात त्या गृहस्थानें 'जिन्यातून वर ये ग' म्हणून म्हटलेलें तिने ऐकले.

"दादा, आमी कस वरती याव " म्हणून तिनें उत्तर केलें.

"ह–पुरेपुरे! माहीत आहे. देवळात जाण्याकरिता भाडता लेकी, तेव्हा नाही लाजा वाटत, अन् गिऱ्हाइकान बोलावल तर लगेच जात येते काय? कोण जात आहे तुझी–?" गृहस्थाने वरूनच म्हटले.

भागीला तिची खरी जात कुठे माहीत होती? अन् तिला कोण सागायला बसलय! "आम्हाला बामन लोक शिवत नाहीत दादा" असे ती म्हणाली

"बर बर! चल ये वरती. अस्पृश्योद्धार करतों मी आज" असे म्हणत तो गृहस्थ मोठ्याने हसला आपल्याला वरती बोलाविले आहे, याशिवाय पुढचा मजकूर भागीच्या आकलन शक्तीबाहेरचा होता. ती मुकाट्याने जिना चढून वर गेली.

असा श्रीमती थाटाचा दिवाणखाना तिच्या आयुष्यात प्रथमच दृष्टीस पडत होता. ते लाकडी पलग, अन् त्या गाद्या, अन् गिरद्या, भिंतीवरची तीं रगीत चित्रें, चेंडू उडविणारी बाई, पोपटाला बोटावर घेऊन खेळवणारी बाई, एक लगोटीसारखी चिंधी घेऊन कोचावर विवस्त्र स्थितींत पडलेली एक धष्टपुष्ट बाई इत्यादि चित्रे पाहून क्षणभर तिचे डोळेच दिपून गेले रस्त्याच्या बाजूच्या खिडक्या बहुतेक सर्व बद होत्या. जिन्याजवळची खिडकी फक्त मोकळी होती. तो गृहस्थ आपल्याकडे पाहत असल्याचें दिसल्याबरोबर तिनें आपली चिंध्याची पैठणी नीट डोक्यावरून घेतली अन् पाटी उतरून आपल्यापुढे ठेवीत ती खाली बसली. आणि व्हायचा तोच प्रकार झाला! आज तिला ज्या गोष्टीचा तिटकारा वाटत होता, त्याच गोष्टी तिच्यापुढे सारख्या ताडवनृत्य करीत होत्या. पावित्र्याच्या कल्पनेमुळें नव्हे, परन्तु मनाची इच्छाच नव्हती म्हणून तिने शक्य तितका प्रतिकार केला.

आणि शेवटीं काही झाले तरी बळी पडावेंच लागणार हें स्पष्टपणें दिसताच ती त्याच्या हाताना कडकडून चावली.

तो गृहस्थ किंचित् शुद्धीवर आल्यासारखे दिसले, परन्तु त्यानें तिला सोडलें नाहीं दुसऱ्याला दोष लावीत ती वस्त्र नीटनीटके करीत होती, इतक्यात कायसेंसें टपकन् खाली पडले. दोघानींहि एकाच वेळीं त्याकडे पाहिले. छातीशी लपवलेलें पैशाचे पाकीट होतें तें ती पाटी, तें पाकीट सर्व काही तसेच टाकून तेथून पोबारा करण्याच्या विचाराने भागी जिन्याकडे धावली पण तिला पहिल्याच पायरीवरून मागे परतावें लागले.

जिन्यातून एक बाई वर येत होती–अन् काल जिचे पाकिट भागीनें घेतले होते, तीच बाई वर येत होती. दोन्ही हातानीं छाती घट्ट आवळून भागी पुन्हा माघारी फिरली

ती स्त्री वर आली. तिने क्षणभर दोघाच्याकडे भेदक दृष्टीने पाहिलें कोणी काही बोलेना बाहेरच्या बाजूस एक कावळा घसा खरडून ओरडत होता.

"ए पोरी, जा ती तुझी पाटी घेऊन" त्या गृहस्थाने सुरुवात केली.

"जा–? कुठे तिला जायला सांगता? मीच जातें ना बाहेर! तुमच्या या पाणचट लीळाच्या आड कशाला येऊ मी? असले हे तुमचे खेळ पाहण्यापेक्षा—" संतापातिरेकानें तिच्या तोडून शब्दच उमटेनात.

"बर-बर!" तो जरा कुर्‍यानेच उद्गारला

"वाटत नाही काही जिवाला? सोन्यासारखी बायको घरात असताना ही काय अवदसा तुम्हाला आठवली?"

"सोन्यासारखी! खरच सोन्यासारखी आहे. तुला कपाटात ठेवून तुझ्याकडे नुसत पाहतच बसाव. तुझ भगिनीमडळ नि मीटिंगा अन् अध्यक्षीणपणा सपेल तेव्हा तुला घरी यायला फावेल. अजून मी काहीं लगोटी लावणारा विश्वामित्र बनलो नाहीं—समजलीस?"

"हो! हो! पुरत समजल बर! विश्वामित्रासारखी ही प्रतिसृष्टि निर्माण करण्याचा खेळ मला पुरता समजतो बर का? छान! छान चालल आहे तुमच! थांबा तुमची खोड मोडल्याशिवाय भागणार नाहीं. हें–हें तुमच आजच प्रियपात्र गुन्हेगार आहे. समजल? तें जमिनीवर पडलेल पाकीट माझं

आहे अन् काल हिन ते चोरल्याचा माझा आरोप आहे आता पोलिसात वर्दी देतें—"

" अन् मीबी शिपायला सागन, कीं ह्या बामनान मला–" भागी सतापून ओरडली. आपल्या मनाविरुद्ध गोष्ट तर झालीच, अन् शिवाय ह्याच फळ म्हणून आपल्याला शिपायाच्या हवाली हे लोक करणार हें पाहून तिच्या अगाचा तिळपापड उडला तिने पैसे चोरले होते, तिला चोरी कबूल होती. त्याबद्दल तिला तुरुगात जावें लागणार अन् त्या बाईच्या नवऱ्याने काहींच का केले नव्हते ? तो काय म्हणून मोकळा राहणार ?

लगेच तिला पटले, की आपलें कोण ऐकेल ? आपले म्हणणे कोणाला खरें वाटेल ? उलट आपण आपल्यावरचा चोरीचा आळ धुऊन जावा म्हणूनच ही बतावणी करतो आहोंत असे जग म्हणणार ! आता तिला पटले, कीं जग गरिबाचें नाहीं, जग भिकाऱ्याचें नाहीं. भिकाऱ्याला जर जगात राहायचे असेल, तर रस्त्यावरच्या कुत्र्याप्रमाणे य् म्हणताच धावत यावें व छू म्हणताच शेपटी खाली करून निघून जावे असें केले तरच राहता येईल. दुसऱ्याचें खेळणें ! स्वत.ला काहीं आस्तित्व नाही !

त्या बाईनें एकवार तिच्याकडे तुच्छतेने पाहण्यापलीकडे काहीच केलें नाहीं. त्या गृहस्थानें एकवार भागीकडे पाहिले अन् नतर आपल्या बायको-कडे पाहिलें.

"मी आता येतें" असें म्हणून ती बाई जिन्याच्या दरवाजाला बाहेरून कडी लावून चालती झाली. कपाळाला हात लावून तो गृहस्थ पलगा-वर जाऊन पडला. भागीला कळून चुकलें, की 'आपली वनती ( उन्नति ) का काय म्हणतात तें' आता आपलें आपल्यालाच करून घेतलें पाहिजे जगात आपण नेकीने राहण्याचा प्रयत्न करू लागलों तर ते बिलकुल शक्य नाहीं. अन् आता तुरुगात तरी काय ? गरिबाला मन नाहीं –गरिबाचा स्वतःच्या शरिरावरसुद्धा ताबा नाहीं. पुन्हा हेच भोग अन् पुन्हा ह्याच हालअपेष्टा— जोंपर्यंत तारुण्य आहे तोंपर्यंत असेच लोक आपला उपयोग करून घेणार, अन् पुढें—?

पुढें काय ? तिनें धावत जाऊन खिडकीबाहेर विद्युद्वेगाने उडी टाकली !

* * *

आवडीमुळे आणि प्रकृति स्वास्थ्यासाठीहि ते ऑफिसातून स्पेट करीतच घरीं येत.

दाराशींच एक लेंकरू खाद्यावर, एक लेकरू दुडदुड करणारें व एक लेंकरू बागेंतल्या मोती कुत्र्याशीं खेळणारें इत्यादि साग्रसगीत लव्याजम्यानिशी त्याच्या प्रिय पत्नी त्रिवेणीबाई नित्यनियमानें त्याच्या स्वागतार्थ व्हराडयाच्या पायऱ्याशीं हसतमुखानें हजर असत घरात बाळू गडी, कृष्णा पोऱ्या, गोविंदा निरोप्या, अप्पासाहेब खासगी कारभारी, शिवाय वरकड काम करणारीं माणसें, हा थाट गोपाळरावाचा होता.

खाडेकराप्रमाणें गोपाळराव कोट्याधीश होते हें त्रिवेणीबाईना चागलेंच कळून चुकलें होतें. कोट्यावाचून जेवण नाहीं, कोट्यावाचून पत्नीप्रेम नाहीं कोट्यावाचून बूट घालणे नाहीं—कोटी नाही तर गोपाळराव नाहींत हें त्या बिचाऱ्या माउलीला पुरतेपणीं कळून चुकलें होतें

आणि या सर्व गुणावर ताण म्हणूनच कीं काय, गोपाळराव महाशब्दे महाराष्ट्रातील झाडून साऱ्या मासिकाना वेळेवर हुकमेहुकूम हव्या तेवढया गोष्टी पाठवणारे एक नामांकित लेखक होते.

वाचक, आता तरी गोपाळरावाची ओळख तुम्हाला पटली का ?

* * *

नित्याप्रमाणें घरात कांहीं काम नसल्यामुळे त्रिवेणीबाई आजहि आपल्या फौजफाटयानिशीं आपल्या नियोजित स्थळीं प्रिय पतीची वाट पाहत उभ्या होत्या. समोरच्या व आजूबाजूच्या बगल्यातील ललना कलियुगातील या पति-पत्नीप्रेमाचें कौतुक करीत आतबाहेर करीत होत्या. साडेपाचाचा टोला पडून जवळ जवळ पधरा मिनिटें झाली म्हणजे चक्क पावणेसहा वाजले तरी गोपाळरावाचा पत्ता नाहीं हें पाहून त्रिवेणीबाईंचा जीव खालींवर होऊ लागला. एवढया पगारदार बड्या लेखकाची बायको, पण मनातल्या मनात 'अबाबाई, जोगाई' म्हणून—झाडून साऱ्या स्त्रीलिंगी परमेश्वरस्वरूपाना नवसाचें आमिष दाखवू लागली.

आणि सहज वर मान करून पाहते तों काय? दाराशीं टांगा, अन् आश्चर्याची परमावधि म्हणजे त्या टांग्यात गोपाळराव! त्रिवेणीबाईनीं मानेला

एक झटका देऊन आपल्या जागृतावस्थेची खात्री करून घेतली. डोळ्यात करंगळी खुपसून पाहिली, पापण्याची चाळवाचाळव केली.

" बाळूला पाठवून द्या बर—सामान आहे—" म्हणून म्हणत गोपाळराव व्हराड्याच्या पायऱ्या चढू लागले

" सामान कसल आहे आज ? " त्रिवेणीबाई त्याच्याबरोबर दिवाणखान्यात प्रवेश करीत म्हणाल्या.

" तुला कसल सामान वाटल ? " म्हणून म्हणत गोपाळराव हाः हाः करून हसले.

त्रिवेणीबाई एरवीं कितीहि आपल्या पतिराजाविषयीं सकौतुक अभिमान बाळगणाऱ्या असल्या, तरी त्याची ही गलिच्छ कोटी त्याना बिलकुल पसत पडली नाहींसें दिसलें 'इश्श्' म्हणून त्यानीं तोंडाचा चबू केला

" पहा ! तुला वाटल मीं कोटी केली. काय लोक तरी आहेत पहा मी साधच बोलतों अन् त्यात लोकाना कोटी दिसते. लोकाना कुठल्यातरी एका सस्कृत कवीनें व्रणावर टोंच मारणारे कावळे म्हणून म्हटल आहे तें काहीं खोट नाही, पण प्रत्यक्ष आमच्या लाडक्या, आवडत्या, झुलत्या राणीसाहेब सुद्धा जर आमच्यावर अशी खप्पा मर्जी करू लागल्या तर या बिचाऱ्या नामांकित लेखकान आता बोलाव तरी काय बुवा ? " पुन्हा एकदा हाः-हाः चा पॉयशा फवारा सोडीत गोपाळराव म्हणाले.

" पहा हो ! कुठच कुठ न्यायच तें ! पण सागाव न काय आणल आहे तें ? "

" भारीच बुवा तुमचा हा स्वभाव ! बाळून ती पुडकीं आणलीं आहेत, तीं उघडा अन् पहा आमच्या विद्वत्तेच प्रदर्शन—"

बाळूनें शिरस्त्याप्रमाणें पाचसहा बोजे तडक माडीवर नेऊन ठेवले होते. तिकडे बोट दाखवून गोपाळराव म्हणाले, " चला वरच दाखवतों—"

" थाबायच ह. काहीं तरी आणतें—"

" मीठ-मोहऱ्याच आणा थोडयाशा—" जिना चढताना गोपाळराव म्हणाले.

" इश्श—काहींतरी म्हणजे फराळाच आणतें हो."

चहा पिण्याचें दोघाचोंहि काम शातपणें पार पडलें. बाळूनें साहेबाचे बूट

पायमोजे काढून, व्यवस्थित जागी लावून दिले अन् जिन्याचा रस्ता धरला. मातापितराना मधून मधून प्रेमाच्या लाघवी गप्पा मारण्यास सवड दिली असता त्याची प्रकृति सुदृढ राहील अशा पोक्त व सुज्ञ विचारानेच जणू काय बालगोपाळ मडळी दूर कोठेतरी गडीमाणसाशी खेळत होती.

घरातील जानबा आचाऱ्यानें पुन्हा एक चहाचा हता आणून दिला. त्याचाहि फन्ना उडविल्यावर शेषशायी भगवानाप्रमाणें आरामखुर्चीवर पडून गोपाळरावानीं टेबलावरचे टपाल फोडण्यास सुरुवात केली. त्रिवेणीबाईनीं बायकाच्या चौकस स्वभावनुसार बोचकी सोडण्यास सुरुवात केली.

"अग्या! पुस्तक आहेत—"

"मग तुला काय वाटल? वाणीउदीम सामान?" पत्रावरून दृष्टि न काढता गोपाळराव हसून म्हणाले

'बर का, आता मला राग आला आहे!" त्रिवेणीबाई मानेला झटका देत, भुवया धनुष्याकृति करीत अन् ओठाची मजेदार चाळवाचाळव करीत फुगटलेल्या आवाजात म्हणाल्या!

"बाप रे! खरच की काय! पण राग सपला, की अनुराग जेव्हा सुरू होईल तेव्हा मला सूचना करा म्हणजे ठीक—"

"चला! मला नाहीं अस हसून जिरवता येत एवढी घरात वट्टीकट्टी सहधर्मचारिणी—नेहमी म्हणायच, की 'मला तुझ्याएवढा रसिक वाचक अजून एकहि मिळाला नाही' अन् इक्डे पहाव तर मला कादबरी कधी लिहिली, काय लिहिली, केव्हा छापली—कश्शा कश्शाचा अगदी मागमूस सुद्धा लागून द्यायचा नाही बर ह! शेजारच्या मालुताई तर नेहमी म्हणत असतात, कीं नामाकित लेखकाची तुम्ही रसिक बायको. तुम्हाला पुढील पचवीस वर्षात लिहिल्या जाणाऱ्या गोष्टींची कथानक कळलेलीं असायचीं. अन् प्रत्यक्ष पहाव तर—"

"उद्या समारभ होऊन प्रकाशित होणारी कादबरीसुद्धा—"

"म्हणजे? उद्या का या कादबरीचा प्रकाशन-समारभ? बाई, बाई, बाई—! हद्द झाली बाई या लपडावापुढ!" त्रिवेणीबाई आश्चर्यानें म्हणाल्या.

"अस नाहीं ग—!"

"मग कच्य ग!" त्रिवेणीबाई, सुमारें १२ वर्षांपूर्वी आपण केलेल्या, अभिनयाचें स्मरण करू लागल्या

"उगीच नाहीं पोरहट्ट अन् स्त्रीहट्ट एका पक्तीला आपल्या आजोबानीं बसवून ठेवले आहेत ते." गोपाळराव हाः हाः करून म्हणाले.

"पण खरच सागाव गडे, अलीकडे मी मर्जीतून उतरत तर नाहीं ना चालले? हो— आता चार पोर झालीं— कपाळावर सुरकुत्या अन् पोटावर घड्या पडल्या, वयहि चागल मार्गशीर्ष सरता अठ्ठावीस पुर होईल—कशाला आता आवडतें आहें मी? अन् अशा नावडतीला काय करायच आहे विश्वासात घेऊन—?" बोलताना त्रिवेणीबाईना दम लागला.

'हो-हो हो-हो इटलीच्या मुसळखाब्या, जर्मनीच्या हेरहिटलरा, अरबी समुद्रावरील तुफानी दर्या, पजाब मेलच्या घाटइजिना— पुरे! विठाब्बाई माउली, ऐकून तर घेशील? ऐक, उद्या अलम् महाराष्ट्रातील तुझ्या या लाडक्या लेखकाच्या सदतिसाव्या कादबरीचा प्रकाशनसमारभ होणार आहे"

"मग मला का नाहीं अजूनपर्यंत—"

"सबूर कर. कालपर्यंत हा समारभ करण्याची जरूरी नाहीं, उगीच गाजावाजा करण्यात अर्थ नाही, म्हणून मीच माझ्या चाहत्याना नकार देत होतों. परतु त्याच म्हणण पडल, कीं हें अस मागमाग राहून चालणार नाहीं. कार्य लहान असल तरी जाहिरातीचा बेंडबाजा मात्र देवाचे कान फुटण्याइतका जबरदस्त पाहिजे. हें जाहिरातीच युग आहे. अन् त्यातून अलीकडे ही कला अन् कलातत्र या बाडगुळाची भरमसाट वाढ झाल्याकारणान हें अस काही समारभवजा केल्याखेरीज नव्या पिढीला तें नुसतच पुस्तक विक्रीला ठेवण पसत पडत नाहीं. त्रिवेणीबाईऽऽ—"

"इश्श! नाटकातल्यासारखच चालल आहे—"

"ससार हें सुद्धा नाटकच आहे. आपला गडकरी काय म्हणतो बर! अच्छा—, तेव्हां सागण्याचा मुद्दा हा, कीं ह्या बेट्या तत्रान फार गोंधळ उडवला आहे. आम्ही आपलीं जुनीं माणस आमचा विचार म्हणजे 'विद्या विनयेन शोभते.' बेंडबाजा लावून का कुठ कलाप्रेम व्यक्त होत? पण नाहीं; तरुण पिढीला तें सगळ अस ताशावाजंत्र्यांतल काम लागत आधींच ही

तरुण लेखकू मडळी आमच्यावर थोडीबहुत रुष्ट आहेत. आम्ही लाबच लिहितों, रुदच लिहितों, जुनाट बुरसटलेल्या कलानाच रेखाटतों, पुष्ट वाङ्मयातील ग्रथकाराची उसनवारच करतों— एक ना दोन. लाखों तक्रारी माझ्याविरुद्ध आहेत. आता काय आम्ही done up झालों. बुढ्ढेमिय्या बनलों. आता आम्ही पुराण, कुराण किंवा तैत्तिरीय उपनिषदातील एकाद्या सूत्राचा छळ करीत बसाव अस काहींजण उघड उघड म्हणू लागले आहेत—"

"कोण अस म्हणतो मेला ?" सात्त्विक सतापाची ठिणगी पडली.

"तो प्रभाकर—नवशिक्या पोर! अजून माझ्या वयाच्या बेरजेइतक्या गोष्टीसुद्धा लिहून झाल्या नसतील, तर 'तत्र', 'कला' वगैरे वगैरे शब्द फोर्ड-किर्लोस्करी थाटात बडबडू लागला आहे मला त्यानें लेखनसन्यास घ्यावा म्हणून मोठ्या कळकळींची विनति केली आहे"

"दाढगेश्वर मेला! बघवत आहे कुठ मेल्याला दुसऱ्याच सुख! सारा जन्म मेल्याचा 'तिनें दोनच बटा सावरल्या', 'तिनें दीडच इच हास्य केल', 'तिन ओठाचा चधूच केला' अन् सटरफटर लिहिण्यात गेला अन् इकडच्या-सारख्या अढळ ताऱ्याची सव्वा हात जीभ काढून निंदा करतो कागद उचलायला म्हणून आमच्याकडे राहा म्हणाव जरा— थोडीशी तरी अक्कल येईल मेला कधीं मला दिसेल अन् कधीं त्याला झाडीन अस मला होऊन गेल आहे—"

"आजच दिसेल. रात्रीं येणार आहे माझ्या भेटीला— पहा हें त्याच पत्र" नुकतेच वाचलेले एक पत्र त्यानी त्रिवेणीबाईच्या हातात दिलें.

गोपाळराव महाशब्दे अस्वस्थ मनानें 'टू टू टू'च्या सोडलेल्या फवाऱ्याकडे पाहत होते व नखशिखान्त सन्तापाने थरथरणाऱ्या नाड्याना दाबीत त्रिवेणीबाई तें पत्र वाचीत होत्या.

* * *

रात्रीचे दहा वाजले असतील. दिवाणखान्यात गोपाळराव महाशब्दे व प्रभाकर सहस्रबुद्धे बोलत बसले होते. दरवाजाआडून बहिर्जी नाइकाचें काम त्रिवेणीबाई करीतच होत्या. परतु त्याच्या मुद्रेवरून बाहेरील भाषण

त्याना ऐकू येत नसल्याचे स्पष्ट दिसत होते. शेवटीं फटाळून जवळच पडलेल्या एका स्टुलावर बैठक मारून, भिंतीला त्यानीं डोके टेकून दिले.

दिवाणखान्यात वाद रगात आला होता—

"तेव्हा मी म्हणतों, कीं—" गोपाळराव मुद्दा ठसवण्याकरिता हाताची मूठ टेबलावर आपटून म्हणाले.

"हो—पण सगळ तुमचच काय एकायच? माझहि थोडस ऐकून घ्याना, गोपाळराव, माझ्याविषयीं तुमची काय कल्पना आहे?" प्रभाकरनें शातपणें म्हटलें

"तुमच्याविषयीं? तुम्हाला राग येणार नसेल तर सागतों. तुम्ही एक मास्तरच आहात न? बस्स् तर! एका मास्तराच्याविषयीं काय कल्पना बोडक्याची करायची? पोराचीं तोंड पुसताना ओल्या झालेल्या हातान वाङ्मयसेवा मास्तरान काय करावी? मुळातच नाहीं तें पोहऱ्यात कोठून येणार? अन् मग 'कला', 'तत्र' ह्या ठराविक हाकाटीची गोंडस किनार! परतु राजेश्री, मुळातच कुरूप ठरलेल्या बाईला जगातल्या कुठल्याहि गजानन मिलसचीं पातळ आणून दिलीं तरी—"

"म्हणजे आपल्या मतान मास्तर हा प्राणी असा तसाच असावा अस दिसत. मास्तराना शिव्या देताना मौज वाटते, गुदगुल्या होतात पण एकवेळ येईल अन् मग -"

"लहान मुलहि असच काही तरी म्हणत असतात 'माझ्या आळीला ये, आईलाच जाऊन सागेन' प्रभाकरपत, लेखनसन्यास घेण्याकरता मला तुम्ही सुचवता तर तीच गोष्ट तुम्हीच केलीत तर जास्त बर होणार नाहीं का? आपली मास्तरकी बरी. उपरण झाडल कीं मोकळा—!"

प्रभाकरने मोठ्यानें हसण्यास सुरुवात केली. गोपाळराव चमकून त्याच्याकडे पाहू लागले

"मलाहि तुम्हाला असा एकादा घरचा आहेर परत करता येईल. नाहीं अस नाहीं. मी तुम्हाला एकच गोष्ट आज सागणार आहें. उद्या तुमच्या पुस्तकाचा प्रकाशनसमारभ होणार आहे, तो होऊ नये अशी माझी इच्छा आहे—" प्रभाकर म्हणाला.

"अरे वाऽरे वा! माझ्या घरात मीं अमकाच पोशाख घालावा अशीहि

तुझी एकादी इच्छा असेल. मी आपल्या पत्नीवर शेंकडा इतकेच टक्के प्रेम कराव, अमक्या वेळेस अमुक खाव ह्या आणखी तुझ्या इच्छा असतील ? प्रभाकरपत, तुम्हाला मी विचारतों, कीं अशी विचित्र इच्छा प्रगट करण्याचा तुम्हाला काय अधिकार ? "

"काय अधिकार ? गोपाळराव, तुम्हाला आठवण करून देऊच तर मग ? अच्छा ! जबाबदारी तुमच्यावर ! सुमारें वीस वर्षांपूर्वीचा काळ थोडासा डोळ्यासमोर आणा. वामनराव सहस्रबुद्धे नावाचे कोणी एक गृहस्थ तुमचे जीवश्च कठश्च स्नेही असल्याच आठवत काय ? " प्रभाकरानें म्हटलें

"बर मग—?" गोपाळराव पुढे होऊन म्हणाले त्याच्या आवाजात कापरेपणाची स्पष्ट छाया पडली होती

"त्याचाच मी मुलगा आहें--" प्रभाकर शातपणें म्हणाला.

"कोण—तू ? तू तें चवचाल कार्टे ?" गोपाळराव ओरडले

"होय ! मीच त्याचा मुलगा. आणि त्या वामनरावाचा एकुलता एक मुलगा या नात्यान मी तुम्हास सागतों, कीं उद्याचा प्रकाशनसमारभ बद करा—"

"शक्य नाही--समारभ हा झालाच पाहिजे" गोपाळराव कपाळावरचा घाम पुशीत म्हणाले.

"अच्छा ! त्यावर मग मला माझ्या वडिलानीं लिहून ठेवलेल्या डायऱ्याचा उपयोग करण भाग पडेल. गोपाळराव, इतके दिवस तुम्ही कादबऱ्याचा व गोष्टींचा महाराष्ट्रावर पाऊस पाडून वाचकवर्ग झुलवलात--, तुमच्या जुन्या तत्रशास्त्राबद्दल लोकानी टीका केली असता त्याच्यावर तुटून पडलात, मारे अफाट गप्पा मारून 'जित मया, जित मया' केलत पण ही सारी उसनवार होती. वामन्रावानीं, माझ्या वडिलानी मरते समयी विश्वासान म्हणून स्वाधीन केलेल्या हस्तलिखिताचा तुम्ही अशा रीतीन उपयोग करून घेतलात. मी त्या वेळीं लहान होतों. मला समजत नव्हत. मित्राचा छान उपयोग करून घेतलात ! अन् आता कसल्या बोडक्याच्या तत्राच्या गप्पा मारता ! " प्रभाकर म्हणाला.

गोपाळराव शून्य मनस्कतेनें आढ्याकडे दृष्टि लावून पडले होते. त्याच्या डोक्यत विचाराची गर्दी उडून राहिली होतें हें स्पष्ट दिसत होतें

"मग आता तुझ म्हणण तरी काय आहे ? " तें रुद्ध कठाने म्हणाले.

प्रभाकर बराच वेळ विचार करीत होता.

" मला कांहीं तुमच्यापासून मागायचं नाहीं. माझ्या वडिलाच्या पुस्तकावर तुम्हीं जी कमाई केली असेल ती सर्व गरीब विद्यार्थ्यांना मदत म्हणून देऊन टाका. तुमचा व माझा तत्राबद्दलचा तटा आपोआपच मिटणार आहे. कारण तुमच्याच म्हणण्याप्रमाण आडातच नाही तर पोहऱ्यात कोठून येईल? वामनराव सहस्रबुद्धे हे जुन्या पिढीचे लेखक होते त्याच तत्र ते हयात नसल्यामुळें आज ते नवीन तत्र कसे सभाळणार? आणि तुम्हाला तर ऑफिसातील कारकूनवर्गावर गुरकावणें व अधिकाऱ्यासमोर Yes sir करणें यापेक्षा निराळें तत्र कोणते समजणार? आठ दिवसापूर्वी माळ्यावरची सारी रद्दी विकावयास काढीत असताना हे गुपीत माझ्या दृष्टोत्पत्तीस पडल. मला वाटत हीच कादबरी माझ्या वडिलाची शेवटची असावी निदान ती तरी त्याच्या नावावर प्रसिद्ध करा मी प्रस्तावना लिहून देईन "

प्रभाकर थोडक्याच वेळाने निघून गेला गोपाळराव महाशब्दे—महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध कादबरीकार—की ज्याना न ओळखणारा प्राणी दुर्दैवीच ठरावा ते गृहस्थ स्वत:शीच एखाद्या भ्रमिष्टासारखें शुष्कपणें थोडा वेळ हसले.

* * *

दुसऱ्या दिवशीचा प्रकाशनसमारभ लेखकाच्या प्रकृतिअस्वास्थ्यामुळें घडून आला नाहीं आणि यापुढें खरोखरीच गोपाळराव महाशब्दे महाराष्ट्र सारस्वताच्या वाटेस गेले नाहीत.

[ —एका इग्रजी कथानकाधारे ]

# भाई ! : : ४

त्याचें संपूर्ण नांव प्रभाकर यशवंत लेले.

जन्मल्यापासून तों सुमारें १० वर्षांचा होईतोंपर्यंत त्याच्या नांवांत कांहीं फरक झाला नाही पुढें एके दिवशीं त्याच्या फाजील चिकित्सेखोर वडिलांनीं, लॉर्ड वेलस्ली वगैरे गंध लावणाऱ्या मंडळींनी विभूषित केलेलें त्याचें इतिहासाचें पुस्तक सहज पाहण्यास उचललें, त्यावर " प्रभाकर लेले " असें नांव त्यांच्या दृष्टीस पडलें

ज्या पोराला आपण जन्म दिला त्या दिवट्यानें आपल्या नांवावर दाखविलेला हा उदारपणा त्यांच्या स्वार्थी दृष्टीला सहन होण्याजोगा नव्हता हे त्यांनी पोराच्या काडकन् तोंडांत मारून सिद्ध करून दिलें. पोरानें त्याच वेळीं मनांत शपथ वाहिली, कीं " बरय् म्हातारबोवा ! आज तुमच्या नांवाला चाट दिली म्हणून इतके उखडलांत काय ? उद्यां माझ्याच काय परंतु तुमच्यासुद्धां मिशांना "

* * *

त्यानंतर तो कॉलेजांत आला. आणि दिवसेंदिवस बाळपण उलटल्याचे डोहाळे त्याला आठवूं लागले. आतां तो पोरीबाळींवर काव्यें करून त्या काव्याखालीं 'कुमार प्रभाकर' अशी निशाणी ठोकूं लागला. कुमार प्रभाकर हें नांव धारण केल्यापासून त्यानें आपली बोली बदलली. आतां तो थोडंथोडं

लाडक अन् बोबड बोलून आपण खरोखरीच लहान आहोंत असें आपल्या ( तो समजत असलेल्या ) मैत्रिणींना भासवू लागला. त्यानें आपली चाल बदलली, अन् लहान पोराप्रमाणें दुडदुड चालण्याची सवय व्हावी म्हणून आघोळ केल्यावर सकाळीं दीडहजार साष्टाग नमस्कार घालण्याची बात ठोकून एक तासभर नित्यनेमानें दारें खिडक्या लावून लगडी घालण्याचा महाभयकर व्यायाम घेऊ लागला लहान पोराप्रमाणे दिसण्याकरिता तो विस्मरणशक्तीचे पाठ घोकू लागला-- आणि प्रत्यक्ष अनुभव यावा म्हणून कुठें मित्राचें फौटन-पेन, हातरुमाल, उसने घेतलेले चारदोन आणे परत करण्याचें वारवार विसरू लागला.

परतु या कर्मदरिद्री महाराष्ट्राला एकाद्याचें बरें झालेले आजपर्यंत कधीं पाहवलें आहे का ? ज्या चाडाळानीं आगरकराना शिव्या दिल्या, ज्या नतद्दष्टानीं बळवतरावजींनाहि जिवतपणीं छळण्यास कमी केले नाही, त्याच दुष्ट आजोबा-च्या दुष्ट नातवानी आमच्या कुमार प्रभाकराला आपल्या गोकुळातल्या बाल-लीला, ते डोळे मिटून होणारे बासरीवादन, शातपणें करू दिलें नाहीं. गोकुळ तें गोकुळ अन् महाराष्ट्र तो महाराष्ट्रच !

एकाद्या निष्पाप बालकाप्रमाणें अजाणतेपणानें उगीचच बोलताना मधून-मधून डोळयाची उघडझाप करण्याची कला त्याने करतलमलवत् साध्य करून घेतली. एक साधें वाक्य बोलताना तो सहजच पाचपचवीस ठिकाणीं अडे, चाचरे, गोंधळे— अन् राहिलेले वाक्य तसेंच वाऱ्यावर साबणाच्या फुग्याप्रमाणें सोडून देई. किती नैसर्गिक रीतीने तो बोलत उभा राही पण !

एका कुठल्याशा त्याच्या मैत्रिणीला काव्यात खेंचून तिला यावचद्रदिवा-करौ ( हुश्श् ! ) अजरामर करून टाकण्याची भीष्मप्रतिज्ञा मनातल्या मनात उच्चारून त्यानें लेखणीला हात घातला. 'पुरुषी अरेरावी', 'पुरुषी सत्ता', 'पुरुषी जुलूम' इत्यादि गलेलठ्ठ शब्दसाहित्यावर पुष्ट झालेल्या त्या कॉलेज-कन्यकेनें कुमार प्रभाकरानाच "सबध कॉलेजमध्यें तुम्हाला अजरामर करीन" म्हणून उलट आहेर केला कवीच्या हातातली लेखणी गळून पडली. कवीनें विचार केला, कीं ज्याप्रमाणें तीन रुपये तेरा आण्याच्या माफक किंमतींत आरसा, कगवा, डमी घड्याळ इत्यादि सत्तर-बहात्तर नित्यो-पयोगी अशा भरपेट किंमतीच्या वस्तू मोठ्या उदार अंतःकरणानें आपल्या

प्रिय ग्राहकास अर्पण करणाऱ्या मुबईच्या कपन्या, कलकत्त्याच्या वर्तमानपत्रात व कलकत्त्याच्या कपन्या मुबईच्या वर्तमानपत्रात जाहिरात देतात त्याप्रमाणें मुबईच्या वर्तमानपत्रात पुण्यातील मुलींवर केलेली व पुण्यातील वर्तमानपत्रात मुबईतील मुलीच्यावर केलेलीं काव्यें छापण्यास कसलीच हरकत नाही दोन्ही गावातील मुलीनीं रुजुवात करण्याचा प्रसग आणलाच तर कवि-मजकूर सध्या मद्रास प्रातात आपल्या पुढील खड-काव्याच्या जुळवाजुळवीकरता हिडत आहेत असा गवगवा करून ठेवला, कीं गुलाबाच्या सरबतात बर्फ टाकल्याप्रमाणेंच होणार आहे

एक काळ होता, की त्या वेळीं शेक्सपीअरनें आपल्या सुनीतानी भरलेला जाडजूड ग्रथराज त्या कोणत्याशा कृष्णनेत्रीच्या डोक्यात हाणून तिला मूर्च्छना आणण्याचा प्रसग आणला असता तरी तिने मरता मरता कृतज्ञतेच्या ओलाव्यानें बरबटलेल्या डोळ्यानीं शेक्सपीअरकडे पाहून त्याला आशीर्वादच दिला असता पण कुमार प्रभाकराला फारच वाईट अनुभव आला. एकाद्याच्या घराला आग लावणें शक्य होईल पण एकाद्या पोरीवर काव्य करू म्हटलें तर तें जमत नाही आळींतल्या मुलीबाळीवर काव्य करणें म्हणजे स्वत.च्याच हातानें घराला आग लावून घेण्याइतकें सोपे असतें हें त्याला पटलें, नव्हे आळींतल्या मुलींनीं त्याला पटवून दिले.

पुढे तो बी ए झाला नतर आजतागायत पद्धतीला अनुसरून तो एम् ए. व एल्एल् बी. ह्या दोन्ही दगडावर हात ठेवण्याची कसरत करू लागला. जसा मित्र भेटेल त्याप्रमाणें तो त्याला आपण एम् ए किंवा एल्एल्. बी होणार असल्याचा शुभदायक सदेश देत फिरू लागला. आणि चुकूनमाकून बोटाला मुलगी धरून घरोघर हिंडणारा बहाद्दर भेटलाच तर एम्. ए. आणि एल्एल् बी दोन्हीहि साधण्याचा आपला गुप्त मनोरथ तो त्याच्याजवळ बेधडकपणें प्रगट करून दाखवीत असे. अर्थात् दोन्हीहि साधण्याचा हावरटपणा दाखविणारे आजचे बी. ए तरुण उद्या काय रडणार हें आता वधूपित्याना अनुभवाच्या ठेंचेवरून कळून चुकल्यामुळें एकदां चौकशीस आलेला पेन्शनर वधूपिता पुन्हा म्हणून बोलणें करण्याकरिता आला नाहीं.

शेवटीं त्यानें आजन्म ब्रह्मचारी राहून देशाच्या उपयोगी पडण्याचें आपलें

व्रत जाहीर केलें. लहानपणापासून बापाने कान ओढून ओढून दुखावलेला, तरुणपणी आळीतील आसपासच्या तरुणींनी धमक्या, दटावण्या वगैरे क्रूर प्रकारानीं थिजवला गेलेला, बरोबरीच्या मित्राकडून वेळीं अवेळी शालजोडींतील व शालजोडीविरहित टोमणे खाऊन भाजलेल्या पापडीप्रमाणें ठिसूळ झालेला, अन् वधूपित्याच्या सहेतुक वा निर्हेतुक प्रश्नाच्या माऱ्यानें गारठून गेलेला कुमार प्रभाकर देशसेवा करील नाहीतर काय गाडीखालीं जीव देईल ?

आणि देशसेवा करणें म्हणजे न जाणों कदाचित् उद्या एकादा महात्मा होण्यासारखेंच आहे देशसेवेचा उत्कृष्ट मार्ग म्हणजे वेळींअवेळीं (बहुतेक अवेळीच) प्रचलित शिक्षणसस्था, शिक्षण व शिक्षणाची दिशा या त्रयीवर सणसणीत कोरडे ओढणें, स्वत:च्या ज्ञानाची बिलकुल खातरी करून घेण्याच्या भानगडीत न सापडता 'हिंदुस्थानाने आता यापुढे काय केले पाह्यजे' या प्रश्नाची चिरफाड करीत बसणें--, डोक्यावर टोपीची उपाधी न ठेवता आपले झरेदार केस चापून-चोपून बसवणे, वैर्धधराप्रमाणें गल्लमिशाचा रुबाब राखणें--,आणि सर्वसाधारण जनतेला कळण्याची पचाईत नको म्हणून रशियातील राज्यपद्धतीची गहनगूढ तत्त्वे विशद करून सागता आहोत असा नेहमीं आव आणणे-- कित्ती सोपें हें देशसेवेचे व्रत !

* * *

कुमार प्रभाकर पुढें 'भाईप्रभा' या सुटसुटीत नावाने ओळखू जाऊ लागला।

आता त्याचा जीवनक्रम फार सुखाचा झाला ! आसऱ्याला घराची जरूरी वाटेनाशी झाली खायची ददात मिटली त्याच्या कपड्याबद्दल लोकच जास्त आस्थेवाईकपणा दाखवू लागले. त्याच्या अन्नाची, त्याच्या प्रकृतीची त्याच्या कपडयाची, सगळी काळजी त्या दयाघन कामगारवर्गाला ! तो आता कर्मसन्यासी झाला होता—कर्मापलीकडे गेला होता. गिरण-कामगाराची कुठलीहि सभा असो तो आता लहान पोराप्रमाणें टणाटण उडया मारीत सभेस जाऊ लागला. समानहक्काबद्दल डोळ्यात तेल घालून जपणाऱ्या आजच्या कुमारिकेचा पुरुषीथाटाचा बायकी 'नमस्ते' करून, मुंबईतील 'चालसे' बोलपट कपनीतील दुसरी कोणीच मिळत नसल्यामुळें एकमेवाद्वितीयम् ठरलेल्या हिरॉइनच्या आवेशात लहान मुलाना थरारून सोडणाऱ्या

किंकाळया फोडीन 'गुर्रर्र ड्रॉक्—चल् ये मर्दा असा सामन्याला' या तालावर बसवलेली आवेशी भाषणें पाठ म्हणू लागला

कामगाराना वाटे वा.! आता हो काय पाहिजे? उद्यापासून छत्तीस तासाचा आठवडा, भरपूर पगार, अन् वर्षांतून सहा महिन्याची भरपगारी रजा. अन् शिवाय वर मालकाचा रोज मुजरा! याला म्हणाव पुढारी!

इतराना वाटे—वाऽऽऽ टेऽऽऽ!

राजकारण हें लहानपोराचे खेळ नव्हत हें त्याला लवकरच कळून आलें.

भाई प्रभा आपल्या तोळामासा प्रकृतीकडे दुर्लक्ष करून फार वेळ राजकारणाच्या तळयात डुबला आणि त्याचें अग मोडून आलें.

एक वर्षभर त्यानें तुरुगात शेक घेतला.

प्रकृति ठीक झाली, पण—!

राजकारणावर तो बोलेनासा झाला! महिनामहिना दाढी वाढवू लागला घरचा आसरा सुटला व दारचा तुटला म्हणून तो उघड्यावरच निजून देशसेवेचें मधुर फल प्रत्यक्ष चाखू लागला—

एके दिवशीं माझ्या घरीं तो आला. मी नुकताच पाचपचवीस भकास चेहऱ्याच्या, निर्बुद्ध बाळगोपाळाच्या टाळक्यात जगद्‌विख्यात युक्लीडसाहेबाची विद्वत्ता कोंबण्याचा निष्फळ प्रयत्न करून घरीं परतलों होतो. चहा वगैरे चालू होता. मी सहजच कमलला म्हणालों—

"काय ग, तुला युक्लीड वगैरे काही ज्ञान आहे का?"

तिनें एकदा 'इश्श' म्हटलें. 'काहीतरीच' म्हणून पुटपुटत या दिशेची मान त्या दिशेला भिरकावली अन् अशा रीतीनें युक्लीडसाहेबाच्या ज्ञानाची आपल्याला कितपत माहिती आहे हें साभिनय पटवून दिलें.

"काय तूऽऽ? अग, इतक्या बायका आता शिकायला लागल्या आहेत, एकदासुद्धा इश्श न म्हणण्याकरिता डोळयात तेल घालून फिरतात, 'आहेऽऽ बुवा' म्हणून पुरुषवर्गापेक्षा आपणहि काहीं इचभरसुद्धा मार्गे नाहींत म्हणून अट्टाहासानें कोपऱ्याकोपऱ्यावर पटवून देतात, लकडीपुलावर पुरुषी आवेशात मुद्दाम उभ्या राहून आल्यागेल्याला, वेळप्रसगीं बिनओळखीच्यालासुद्धा 'नमस्ते' म्हणून दटावतात अन् तुला इग्रजी तीन यत्ताच्यावर एक यत्ता ढकलेतोंपर्यंत सुद्धा धीर निघाला नाहीं अ!" मी म्हणालों.

'हो! शिकून तरी काय दिवे लागतात—' असेंच काहींतरी कमल पुटपुटली.

त्याच वेळी आमच्या कॉलेजातला दोस्त भाई प्रभा एकाद्या चोरासारखा दबकत दबकत आमच्या घरात शिरला. मी त्याला पाहिल्याबरोबर हाक मारली त्यानें मला तावडतोब ओळखलें

जरा साशकवृत्तीनेंच तो मीं पुढें केलेल्या खुर्चीवर बसला ऐन तारुण्यात होणारा त्याचा हा पेन्शनरी थरकाप पाहून मला थोडेसे वाईटच वाटले. मी चटकन् घरात गेलो आणि चहा टाकण्यास सागून बाहेर आलों

" ह—काय भाई ? " मी त्याच्या पाठीवर थाप मारून म्हणालों.

" गोखले, पुन्हा मला भाई म्हणून हाक मारू नकोस जगातली वाटेल ती शिवी तू मला हसड मी बिलकुल रागावणार नाहीं—" तो गभीरपणानें म्हणाला

वादळात सापडलेली नौका केव्हा ना केव्हा तरी या थराला येणार हें मी जाणून होतों परतु, इतक्या लवकर तिचा 'तुकाराम' होईल ही मला कल्पना नव्हती. मी काहीच बोललो नाही

" तुला आश्चर्य वाटेल. आज मी जवळ जवळ महिनाभर एक वेळ जेवीत असतों अन् तेंहि अर्धपोटींच उठाव लागत. गोखले, मला भूक लागली आहे रे! " तो कळवळून म्हणाला.

" लेले–, पण तू तर कामगारवर्गाचा पुढारी बनला होतास न ? अन्—"

" सकटकालीं पाठचा भाऊसुद्धा पाठ फिरवतो रे! तुला खर सागतों–मला राजकारण किंवा हा समवाद याच काडीचाहि ज्ञान नाही रे! लोकाच्या सागण्यावरून मी समतावादी बनलों. मी त्याच्याकरिता डोहात उडी घेतली आणि मी बुडलों अस समजून आजूबाजूचे बघ्ये लोक 'एक वीर पुरुष गेला' म्हणून समजून घरोघर परतले. मी बुडलों नव्हतों. गटागळी खाल्ली होती. बुडलों असतों तर फार बर झाल असत–पण–मला वडील घरात घेत नाहीत. मला भविष्यकाळ काळासारखा दिसतोय! मी काय करू! गटागळी खाऊन मी वर आलों मला वाचवा म्हणून मीं टाहो फोडला. माझ ऐकायला कुणीच जाग्यावर उरल नाहीं. आजूबाजूची माणस मला 'भूत' म्हणून समजून माझ्याकडे फिरकतसुद्धा नाहीत—" तो म्हणाला.

" अरे, पण तू आर्धी उडी मारलीसच का ? भूगोलाच साधसुध ज्ञान तुला नाहीं ! जी वनस्पती एका देशात नैसर्गिकरीत्या उगवते तीच वनस्पती दुसऱ्या देशात तशीच उगवेल याला काहीं खात्री देता येत नाही किंवा एस्किमो लोक बर्फाच्या घरातून राहतात म्हणून उद्या आपल्याला तें कस शक्य होईल ? "

" तुझ्याच भूगोलात म्हटल आहे ना, की बटाटा हा आपल्या देशात पूर्वी नव्हता. पण आज त्याची लागवड करून पाहिल्यावर काय दिसून आल ! तसेच हेहि experiments— प्रयोग— आहेत."

" खर आहे ! काडी ओढून धर जळेल कीं नाहीं हें पाहण तरी प्रयोगातच जमा धरायच नाहीं का ? तुला एक सागू—? रागावणार नाहींस ? "

शुष्क तोंडानें त्यानें माझ्याकडे पाहिले

" तू आता हे प्रयोग दे सोडून, अन्—"

" अन् उत्साहाची शिदोरी पाठीस बाधून, साहसाची शिडी चढून, आत्मोन्नतीचें शिखर गाठ— कीं लगेच तीन दिवसाचे शिळे मूठभर पोहे एका मळक्या रुमालात बाधून फिरणाऱ्याचा एक लक्षाधीश पेढीवाला कसा झाला ही सुरस कथा एखाद्या अरबी भाषेतील सुरस कथेप्रमाणें लोकाच्या माथीं मारण्यास तुम्ही टपलेलेच आहात, असच ना तुला म्हणायच आहे ? " तो म्हणाला.

तशाहि स्थितीत मला हसू लोटलें. इतक्यात कसलीशी आठवण होऊन त्याने खिशातून एक कसलीशीं पुरचुडी बाहेर काढली खरोखरीच त्या पुरचुडीत मळकटसर असे मूठभर पोहे होते. त्याकडे पाहून तो एकदम म्हणाला—

" तुला यात मी भागीदार होऊ देणार नाहीं. एक वेळ होती त्या वेळीं मीं माझ्या मित्राना ते मागतील ते दिलें आहे, पण आज हे मूठभर पोहे मला तुझ्या ताटभर जिलब्यापेंक्षा जास्त प्यार आहेत. तुझी थट्टाच करायची तर मी म्हणेन, कीं हे पोहे मी फुकून फुकून खातों अन् खालीं राहील तो भाग तुझा—अ ? " असें म्हणून तो मोठ्यानें हसला.

मला त्याचें हसणें इतकें भेसूर वाटलें—!

इजिनाच्या डेरक्यात ज्या प्रमाणें हत्तीच्या सोंडेएवढ्या धारेनें पाणी

कोंबतात त्याप्रमाणें त्यानें समोर आलेला चहा घशाखालीं रितवला. शकर-पाळ्यावर तो तुटूनच पडला. थोडासा शांत दिसला तो आता!

"बराय्! मी जातों आता. पुन्हा केव्हा असला चहा मिळेल त्या दिवशीं तुझ्या इथल्या चहाची आठवण खास होईल."

तो जाण्याकरिता उठला. अर्थात् डोक्यावर टोपी नव्हतीच, तेव्हा आम्हा-सारख्या इतरेजनाच्या टोपी झाडण्याच्या त्रासातून तो मुक्तच होता.

"अच्छा भाई—!" मी उठून म्हणालों.

"गोखले, तुझ्या पाया पडूं का? पुन्हा तू मला भाई म्हणून हाक मारू नकोस. एका बाजून पूजा करायची आणि नंतर बुकलून मारण्याची तयारी करायची—म्हणजे तू मला त्या कसल्याशा आप्तोर्यामी यज्ञातल्या बोकडा-सारखा का छळतोस? माझं नाव यापुढं भाई नाहीं. माझं नाव प्रभाकर यशवंत लेले—"

प्रभाकर यशवंत लेले आला तसाच गेला!

बाहेर चक्क उन्हें पडली असल्याकारणानें 'मी' म्हणण्याचें धारिष्ट अंधारा-च्यानें करवणें शक्य नव्हतें! आणि उन्हंहि संध्याकाळी ५॥ ची वेळ असल्या-कारणानें 'मी' म्हणत नव्हतें.

"म्हटलं, मी—" मागून आवाज आला!

"आता तूच म्हण काय म्हणायचं तें—" मी हसून म्हणालों.

## एकाद्याचें नशीब ! : : ५

कुठेंहि एकादा दु:खदायक प्रसंग आपल्या पाहण्यात आला, की आपण मोठ्या सहृदयतेनें म्हणतो, की असला प्रसंग वैऱ्यावर सुद्धा येऊ नये. परंतु तसलाच प्रसंग प्रत्यक्ष आपल्या ओळखीच्या माणसावर आलेला पाहण्याचें दुर्दैव पुष्कळ वेळा येऊन उभें राहतें स्वत: आपणच इतके भाबावून जातों, कीं बोलता सोय नाहीं. सहानुभूति तरी कशी दाखवावी हाच एक मोठा प्रश्न येऊन पडतो. आणि असले प्रसंग उघडया डोळ्यानीं परंतु मुकाटपणें पाहत, कपाळाला हात लावून 'दुर्दैव बिचाऱ्याचें !' असें पुटपुटण्यापलीकडे आपण तरी काय करणार ?

नानाच्यावर आकाशीची कुऱ्हाडच कोसळली होती आज सुमारें सात वर्षे त्यानीं खस्ता खाल्लया होत्या. पैशाकडे पाहिलें नाही, श्रमाकडे पाहिलें नाहीं—काहीं काहीं म्हणून बाकी ठेविलें नव्हतें कानात नळ्या घालणारे डॉक्टर झाले, तोंडानें काहींतरी संस्कृत पुटपुटून रोग्याला नुसत्या दमानेंच गार करणारे आपले आयुर्वेदाचार्य झाले, जगाच्या कल्याणाकरिता देशोदेशीं हिंडताना प्रत्येक गावीं 'फक्त दोनच दिवस' मुक्काम टाकणारे मिय्या-बिसमिल्लाखासाहेब झाले, कोठल्याहि रोगावर कोठलीहि मुळी 'अमक्याच्या रसात उगाळून, फलाण्या जिनसाच्या काढयात टाकून' प्यायला सांगणारे

वैदूहि झाले. शेवटीं विश्वास नसताना देखील त्यानीं गाणगापूर, नरसोबाची वाडी इत्यादि क्षेत्रेंहि पालथीं घातलीं. परतु सरस्वतीबाईचा आजार समूळ असा कधींच बरा झाला नाहीं सस्कृत औषधे झालीं, इग्रजी औषधें झाली, चिनी औषधाचे कॅटलॉग सबध घरभर इतस्ततः लोळत होते. त्यातील 'मिनि मुस् कुस्' किंवा 'पिनु मोक् फुन्'च्या डझनावारी बाटल्या घरात 'आ' पसरून लोळत पडल्या होत्या. चारी खडातील मनुष्यनिर्मित औषधी-योजना पगू पडून शेवटीं नानाना आपल्या पत्नीस अदृष्टाच्या हवाली करणें भाग पडले होतें.

प्रथम नानाचा विश्वासच बसेना या गोष्टीवर. कालपर्यंत जी आपल्यालाच 'होईल बर माझ दुखण! काय त्यात काळजी करण्यासारख आहे? अन् मला तरी असा अर्धा डाव टाकून जाण बर वाटेल का?' इत्यादि गोष्टी बोलून धीर देत होती ती आज नाही—! छे. ! लोक चुकत असले पाहिजेत. त्याचा हा काहीतरी गैरसमज होत असला पाहिजे! समोरच्या मिटलेल्या डोळ्याकडे त्यानीं मोठ्या आशेनें पाहिलें. ज्या डोळ्याच्या मधुर हालचाली पाहण्याकरिता आपण तरुणपणी, आणि इतकेंच कशाला, अगदी परवापरवा-पर्यंत सुद्धा तासन् तास घालवीत होतों ते डोळे आता पुन्हा, कधीच उघडणार नाहींत?

त्याना ही कल्पनाच सहन होईना! धोतराच्या सोग्यानें त्यानीं आपलें तोंड झाकून घेतलें पाठीशीं त्याचा धाकटा भाऊ उभा होता. त्यानें नानाच्या पाटीवर हलकेंच हात ठेवला. नानानीं त्याच्याकडे पाहिलें. दोघानीं एकमेकाकडे कितीतरी वेळ पाहिलें, परतु दोघेहि काहींच बोलले नाहींत. आणि बोलणार तरी काय?

जड अत.करणानें नाना तेथून उठले. क्षणभर— अगदीं क्षणभरच— त्याना वाटलें, कीं आपण आपल्या जन्माच्या सोबतिणीला हाक मारून पाहावी. आपल्या हाकेला 'ओ' न देण्याची अमर्यादा तिनें आजपर्यंत कधींच केली नव्हती—! परतु—परतु—

एकाद्या लहान पोराप्रमाणें त्यानीं हुदके देण्यास सुरुवात केली—!

* * *

पाठच्या कर्तासवरता भाऊ, त्याची बायको, मुलें व स्वतःचीं तीन अपत्यें

इतकी मंडळी घरात असताना देखील नानाना घर कसें सुनेसुनें वाटू लागलें. गतस्मृतींचा पगडा मनावर कायम असल्याकारणानें घरात बसवेना, परंतु बाहेर जाऊनहि चित्त रमेना. जिच्यासमवेत उणीपुरी वीस वर्षे आयुष्याच्या चढउतारात घालविलीं तिची स्मृति काही केल्या बुजेना. आंघोळ गेल्यानंतर नेहमीच्या सवयीप्रमाणें सहजच खुंटीकडे हात जावा-- आणि नंतर आठवण होई, कीं खुंटीवर आता कोण निऱ्या केलेलें धोतर आणून ठेवील? जेवण झाल्यावर नेहमीप्रमाणें सुपारीच्या खांडाकरिता स्वयंपाक घरात नजर टाकावी अन् एक दीर्घ श्वास सोडून हपिसाचा रस्ता सुधारावा, असें चालले होतें.

शेजारी म्हणत 'सोनं झालं बिचारीचं. भरल्या कुंकवानं गेली! आज वीस वर्षं संसार केलान्. साऱ्यांना चटका लावून गेली. लाखात असली बाई मिळायची नाहीं. आता मुलांचीच काय ती काळजी. काळजी कसची म्हणा! आईविना पोरं मोठीधाटीं व्हायची थोडीच राहणार आहेत?'

— आणि ते आपल्या उद्योगात गर्क होत असत.

नानाचा भाऊ म्हणे, "वहिनी म्हणजे दुसरी आईच. होऊ नये तें झालं! नानाच्या सहवासात तिला एक दिवस काहीं कपाळाला आठ्या चढविण्याचं कारण पडलं नाहीं. आणखी काहीं वर्षं काढून मुलींचीं लग्नं करून, मुलाचा संसार पाहून गेली असती तर सोन्याहून पिवळं झालं असतं. नव्हतं तिच्या कपाळीं, दुसरं काय!"

— आणि तो आपल्या संसारात गर्क होत असे.

आतेष्ट म्हणत—काय वाटेल तें म्हणत. कोणी असं बोले कोणी तसं बोले.

— परंतु एकच गोष्ट कोणी बोलत नसत, किंवा त्या गोष्टीचा विचार सुद्धा करीत नसत. आणि ती गोष्ट म्हणजे नानाचें पत्नीविरहित आयुष्य! नानाच्याकडे ते मोठ्या सहानुभूतीनें व आदरानें पाहत असत, परंतु त्याचें आता कसें होईल याचा विचार करण्याचें कुणाला काहींच कारण नसल्या-सारखें दिसत होतें.

नानाचा सगळ्यात थोरला मुलगा सदू आता १५ वर्षांचा होता. इंग्रजी ५ वींत होता तो. आई वारल्याचें दुःख त्यालाहि जाणवलें, परंतु तो आता समजूतदार झाला होता. बाप किंवा आई कोणीहि गेलं तरी वाईटच. परंतु

त्यातल्यात्यात बापापेक्षा आई गेल्यामुळें विशेष नुकसान झालें नाहीं ही त्याची विचारसरणी. नानाशीं तो आता दुरूनच बोलणें ठेवीत असे. काहीं लागलेंच तर काकाच्या किंवा काकूच्यामार्फत तो आपल्या गरजा भागवून घेत असे. आईचे माध्यम गेल्यामुळें त्याचें काहींच नुकसान झालें नाही.

त्याच्याहून धाकटी कमल. कमल १२ वर्षांची होती. ती नुक्तीच इंग्रजी शाळेंत जाऊ लागली होती. आई होती तोंपर्यंत तिला एक प्रकारें भिऊनच घरात राहावें लागे. म्हणजे आईकडून मारपीट होण्याची धास्ती नव्हती तिला, परतु आईची शिस्त काही केल्या तिच्या मनास येत नसे. आई गेल्या-पासून आता तिला डोळयाच्या धाकात ठेवणारें कोणीच उरलें नव्हतें. शिवाय आईविना पोर म्हणून आता तिचे विशेषच लाड पुरविले जात होते.

सर्वांत धाकटी मनोरमा. ५ वर्षांची पोर ती. आई या सस्थेपासून लहान पोराचें नफानुकसान काय होते तें अजून यापुढेंच तिला शिकायचें होतें. आई गेली म्हणून काहीं वाटण्याइतकें तिला कळतच नव्हतें.

नानाना मात्र या पोराच्याकडे पाहून अगदी भडभडून येत असे. घरात पत्नी होती तोंपर्यंत सदू अन् कमल याच्या प्रगति-पुस्तकावर सह्या करण्या-पलीकडे व एकादे वेळीं मनोरमेच्या गुबगुबीत गालावर टिचकी मारण्या-पलीकडे त्यानी मुलाची जास्त विचारपूस कधीच केली नव्हती. म्हणजे प्रेमाच्या अभावामुळें नव्हे, तर घरात आईच्या तत्रानें सर्व कारभार चालावा, बापाला मध्ये पडण्याचें कारण नाही या विचारसरणीमुळेंच परतु आता मात्र हळूहळू सदूच्या जेवणाकडे, त्याच्या बोलण्याकडे, त्याच्या आचरणाकडे त्याचे लक्ष जाऊ लागले.

आला दिवस जात होता सृष्टीचे अनत व्यापार अबाधितपणें सुरळीत पार पडत होते. सरस्वतीबाई गेल्या म्हणून चादण्या चमकल्याशिवाय थोडयाच राहणार होत्या ? सूर्यानें प्रकाशण्याचें थोडेंच सोडून दिले होतें ? सर्व काहीं सुरळीत चाललें होतें. आपणा मनुष्याचीच मूर्खपणाची कल्पना, की सृष्टिदेवी मनुष्याच्या सुखदुःखात भाग घेत असते. मुळींच नाही. आपण तशी कल्पना करून घेतों परतु वास्तविक पाहता निसर्गाला मनुष्याशी सहसवेदना बाळगण्याचें काहींच कारण नाहीं.

सरस्वतीबाईना जाऊन एक वर्ष लोटलें असेल नसेल इतकेंच एके दिवशीं फॅमिली गुरुजी बाळभट सकाळींच नानाकडे आले.

हवापाण्याचे मामुली प्रश्न झाल्यावर बाळभटानी हळूच म्हटलें— " मग काय नानासाहेब, जाऊ मी ? अरे हो—एक गोष्ट विसरलोंच की— पण— बोल् कीं नको ? काहीं म्हणा नाना, मला पाहिजे तर चार शिव्या द्या, पण बोलल्याशिवाय मी काही राहणार नाही— "

नाना काहींच बोलले नाहीत केवळ प्रश्नार्थक मुद्रेनें त्यानीं बाळभटाकडे पाहिलें.

" त्याच अस आहे, कीं काळच आताशा फिरला आहे. ब्राह्मणाना नाहींत नोकऱ्या ना चाकऱ्या बर धदा काढावा म्हटल तर 'हा भट इथ कशाला ?' म्हणून इतर लोकाच्या पोटात दुखतच. पैसा नाही म्हणून, नानासाहेब, समाजाला स्थैर्य नाही. तरुण मडळी तर आताशा विचारूच नका करतील काय बिचारे ? आमच्या लहानपणीं, प्रत्यक्ष माझच पहा ना, मी लग्नाच्या वेळीं बारा वर्षांचा अन् ही ७ वर्षांची आता— मुलगा पचविशी उलटली तरी लग्नाला तयार नाही. मुलींनीं आता कराव तरी काय ?—" बाळभट म्हणाले.

नानानीं ओळखलें. परतु ते काहींच बोलले नाहींत.

" आमच्या त्या दत्तूभटाचीच यमी पहा न ! येत्या ज्येष्ठात सतराव सरून अठराव लागेल अर्थात् लोकाना सागायला तिला चवदाव सरून पधरावच्च लागेल. बिचाऱ्याला तोंड काढायला जागा नाही. करतो काय ? हजार-पाचशें खर्च करण्याची ऐपत नाहीं—अन् इकडे मुलगी तर गळ्याला लागलेली. कालीजातले झाले, शाळेंतले झाले, इनामदार, जहागिरदार, आचारी, पाणकी सगळे पाहिले. कुणी देवींचे वण म्हणून नाकारतो, कुणी उंचच म्हणून तोंड वळवतो, कुणी काळी म्हणून पुन्हा चौकशीला येत नाहीं तर कुणी पाचाचा आकडा पुढें करतात— "

" बाळभट, तुम्ही ह्या भानगडीत पडू नका मी ओळखल तुम्ही काय म्हणणार आहात तें. तुम्हाला स्पष्टच सागतों, कीं तुम्ही एकदशण्या करण्यापलीकडे आमच्या घरात जास्त बोलण्याचे श्रम घेऊ नका. रागावू नका हं—" म्हणून म्हणत नाना खुर्चीवरून उठले.

" ह्यः ह्यः ह्य.—" करून बाळभट पळीपच्चपात्री उचलून घराबाहेर पडले.

— शेजाऱ्यांनीं पुष्कळ प्रयत्न केले. नानानीं नकार कायम ठेवला.

— शेवटीं एके दिवशीं नानाचा भाऊ त्याच्या खोलींत आला.

" नाना, लहान तोंडीं मोठा घास घेऊ का ? "

" कुठल्या तरी भटजीन तुला फितवलेला दिसतो—" नाना किंचित् हसून म्हणाले.

" तस म्हणा हवं तर—, पण नाना— खरच का तुम्ही आता लग्नाचा विचार करणार नाहीं ? "

नानानीं उत्तरादाखल हसल्यासारखें केलें. किती भकास होतें तें हसणें !

" नाना, वहिनी मला अगदी आईसारख्या होत्या. त्यानी मला वाढवल नसत, प्रेमाची पाखर घातली नसती, तर आज माझी काय स्थिति झाली असती— ह ऽऽऽ! झाल्या गोष्टीला इलाज नाहीं ! मुलाच्याकडे पाहून तरी— ! "

" तेंच मी तुला म्हणणार होतों. मीं द्वितीय सबध करावा अस तुला वाटत असेल तर या मुलाना उद्या घराबाहेर हाकलून दे हेंच मी तुला सागणार होतों " नाना गभीरपणें म्हणाले.

" अह ! तस नाही मी म्हणत—"

" तस नाहीं तर कस ? भाऊ, तुला अजून ससारातल्या बऱ्याच गोष्टींचा अनुभव घ्यायचा आहे. तुला आता स्पष्टच सागतों. तुला अस का वाटत, कीं माझ्या साऱ्या आकाक्षा, साऱ्या इच्छा, साऱ्या आशा जळून खाक झाल्या ? नाही—मला सध्या ४५ व वर्ष आहे इतर देशात माणस पचेचाळिसाव्या वर्षीं आयुष्याला सुरुवात करतात आयुष्य अजून पुढेंच आहे याची जाणीव मला पूर्णपणें आहे. त्याचप्रमाण इतर विधुराप्रमाण गतपत्नीच्या नावाची जपमाळ ओढीत बसणारा मी नाहीं. अजून तारुण्याची उसळी माझ्या नसानसातून खेळते आहे. अजून सुद्धां माझ मन ससारात रमेल यात शका नाहीं. " नाना म्हणाले.

" मग अडचण कुठ आली ? " भाऊनें प्रश्न केला.

" अडचण एवढीच, कीं सदू, कमल अन् मनोरमा याच काय करायच ? बरोबर सोळा वर्षांपूर्वीची ती गोष्ट. तू लहान होतास तेव्हा. सदू झाल्याचा तिला कोण आनद झाला ! मुलाच रडण ऐकल्याबरोबर मला राहवेना. इतर

मोठ्या मडळींसमक्ष मी खुशाल खोलींत शिरलों आणि सदूला डोळे भरून पाहिला. सदूच्या भावी आयुष्याचे मनोरे बाधताना आम्ही दोघे तहानभूक सुद्धा विसरून जात असू कमलला स्थळ कोणत्या प्रकारच पाह्यच, तिच्या नवऱ्याला काय द्यायच वगैरे वगैरे बेत करताना आम्हीं दोघानीं रात्रीच्या-रात्री घालविल्या आहेत. ती होती तोपर्यंत मी निर्धास्त होतों, पण आता ही जबाबदारी माझ्या एकट्यावर पडली आहे. पुन्हा लग्न केल तर मी या गोष्टी करण्यास मोकळा राहीन का ? " नाना म्हणाले.

" काय हरकत आहे ? "

" तिन विश्वासान माझ्या हवालीं केलेलीं हीं तिचीं स्मृतिचिन्ह आहेत. त्याच कल्याण करण हेंच माझ आता ध्येय. ससारातला आनद आजवर मी उपभोगला आहें. तो पुरा झाला अस मी म्हणत नाहीं, परतु त्याच्याकडे दुर्लक्ष करण आता मला भाग पडत आहे दारूच्या दुसऱ्या पेल्यान पहिल्याची विस्मृति पडते. दुसरी बायको पहिलीच्या स्मृतीवर बोळा फिरवते. मनुष्याच मन अत्यत चचल असत. दुसरीच्या पाशात गुतून पहिलीच्या या पाडसाना विसरण्यास मी तयार नाहीं—"

पुन्हा यावर नानाच्या भावाने तो प्रश्न कधीच काढला नाहीं

आणि नानानीहि आपल्या आयुष्याला आता शिस्त लावण्यास सुरुवात केली.

आणि आयुष्यात हीच गमत आहे. एकदा आयुष्याचा उत्तररग सुरू झाला, कीं मनुष्याची तार्किक बुद्धि लटपटू लागते. प्रत्येक गोष्ट कार्यकारण-भावाच्या निकषावर घासून घेण्याची तितकीशी जरूरी वाटेनाशी होते. आणि मनुष्य शेवटीं श्रद्धाळू- कैक प्रसगी अधश्रद्धाळूहि होऊ लागतो. हपिसा-व्यतिरिक्त नानाचें आयुष्य एका शिसवीच्या देव्हाऱ्यात नीटनेटक्या माडून ठेवलेल्या ताब्यापितळेच्या मूर्तींचे कौतुक करण्यात जाऊ लागलें.

टाळ, चिपळ्या, एकतारी इत्यादि आयुधासमवेत परमेश्वराला जागृत ठेवण्यासाठीं त्यानीं त्या देव्हाऱ्यासमोर जागता पहाराच ठेवला होता—.

* * *

याहि गोष्टीला दहा वर्षें होऊन गेलीं हें वाक्य लिहिताना फार सोपें वाटतें, परतु प्रत्यक्ष अनुभवायला किती कठीण असतें याची कल्पना एकटे नानाच करू शकतील.

कमलचें लग्न होऊन ती सासरीं गेली होती. नानानी आपल्या कल्पने-प्रमाणें जावईबापू चागले निवडून काढले होते, परतु त्याचा चागुलपणा पुढें तेरड्याच्या रगासारखा तात्कालिकच ठरला. लग्नाचे वेळीं जावई बी. ए. होते, एलूएलू. बी च्या टर्म्स भरीत होते, एम्. ए.ची तुतारी फुकीत होते व तोंडानें पिवळ्या हत्तीची पाकिटें फुकीत होते. अलीकडच्या सर्वच तरुणा-प्रमाणे त्याना जगात 'काहीतरी' करून दाखविण्याची महत्त्वाकाक्षा होती. परतु शेवटीं जगाच्या मूर्खपणाला कटाळून काहीच न करण्याचे त्यानीं ठरविलें. फक्त एकच गोष्ट ते करीत, ती ही, की जवळचे पैसे सपले, कीं कमलला माहेरी पाठवून देत. आणि पैसे आले, कीं पुन्हा सासऱ्याच तोंड पाहायला नको म्हणून भीष्मप्रातिज्ञा करीत

नानानीं कपाळाला हात लावला

— मनोरमा हें एक रत्न होतें इग्रजी शिक्षण तिच्या बाबतीत खरोखरीच वाघिणीच्या दुधासारखें ठरले होते. नानाना वेळीं-अवेळी तोंड टाकून बोल-ण्यात तिला आपण स्त्रियाच्या स्वातत्र्याची पताका फडकावीत असल्याचा आनद होत असे. आईविना पोर म्हणून लाडात वाढलेली— त्यातून शेंडे-फळ. नानानी तिच्या लग्नाकरिता स्थळें पाहण्यास सुरुवात नुकतीच केली होती तिने त्याना एके दिवशी स्वच्छ सुनावलें, " जर माझ लग्न जुळवाल तर मी स्पिरिट अगावर ओतून घेईन अन्—" नानानीं आवेशाच्या भरात एक काडकन् तिच्या मुस्कुटात भडकावली तिनें दोन दिवस अन्न घेतलें नाहीं म्हाताऱ्याच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले. त्यानी तिची समजूत काढली. अन् पुन्हा वरकरणी शातता नादू लागली. मनोरमेनें आपल्या या विजयाचा पुरेपुर फायदा घेतला. आता ती बिनदिक्कत स्त्रियाच्या हक्काविषयीं चर्चा करू लागली.

— नानाचा भाऊ शेवटीं निराळा निघाला पाठचा भाऊ पाठ दाखवून दूर राहू लागला. कारणें अर्थातच उघड होती. घराच्या वाटण्या नानानीं केल्या जगातले कोणते पाठचे भाऊ वाटण्या बरोबर झाल्या म्हणून समाधान मानतात ! गावातल्या गावात त्यानें निराळें बिऱ्हाड केलें.

शेजाऱ्यानी—अर्थात् आपल्या शेजारधर्माला जागून—वडील भावाचें डोकें फिरलें म्हणून शेरा मारण्यास कमी केलें नाहीं.

ज्या सदूकरिता नानानी आपल्या जिवाचे रान केले— आसेष्टाची तमा बाळगली नाही— प्रत्यक्ष भावाशींसुद्धा न्यायाने (अर्थात् न्याय हा नेहमीच कटु असतो) वागण्यास कसूर केली नाहीं आणि रात्रीं निजताना एक दिवससुद्धा 'देवा, याला तरी सुखी कर' म्हणून देवाची करुणा भांकल्याशिवाय राहिले नाहीत, तो सदू—?

तो सदू, आता सदाशिवराव, बी. ए झाला होता. बी. ए. होऊन पुढें काय करावयाचे हें अजून तो ठरवीत होता. इग्लड, अमेरिका, जपान, इत्यादि पुढारलेल्या देशात सफर मारून यावी, तेथील समाजाचा बारकाईनें अभ्यास करावा इत्यादि ठोकळ कल्पना याच्या मनात वास्तव्य करू लागल्या होत्या. 'सरकारी नोकरी करणे हराम आहे' हें गाधींचे तत्त्वज्ञान त्याला बिनशर्त एकदम कबूल होतें. प्रत्येक प्रकारच्या पुढाऱ्यातील चांगलें तेवढें निवडावें हें तर त्याचें लाडकें तत्त्व होतें. दिवाणाच्या ऐटींत पोतेंभर पगार वसूल करावा हेंहि त्याला मान्य होतें. विश्वबधुत्वाच्या ऐसपैस नात्यावर मिळतील तितके फायदे करून घ्यावेत हींच त्याचीं मतें

स्वभावतः सदू दुष्ट नव्हता. सदूच काय परतु हल्लींचा कोणताहि तरुण दुष्ट आहे असें म्हणता येणार नाहीं. त्याच्या दृष्टीनें विचार केला तर त्याचेंहि एका अर्थी बरोबरच आहे असे म्हणणे प्राप्त आहे. त्याना शिक्षण द्यायचें एक प्रकारचे अन् जगात व्यवहार पडतो दुसऱ्या प्रकारचा ज्या ठिकाणीं रोजच्या भाकरीची पचाईत त्या ठिकाणी सर्वांगीण उन्नति करून कार्यक्षम, सुसस्कृत नागरिक बनविण्याची तयारी आणि वर उपदेश, कीं "बाळानो, तुम्ही नोकरीकरता काहीं हें शिकत नाही– तुम्ही उत्तम नागरिक व्हावें म्हणून–" इत्यादि नागरिक होऊन उपाशी मरण्यापेक्षा रस्ता झाडून पोटाची व्यवस्था लागलेली उत्तम.

—सदूचा त्यात काय दोष? पैमा स्वतःच्या अकलेवर मिळविणे त्याला शक्य नव्हतें. त्यानें आपल्याकडून पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. त्याला कोठेंच यश आलें नाही. पुष्कळाचें असेंच होतें. आकडेमोडी करणारा कारकून काही देवाच्या एका खास शाळेत पैदा झालेलें रत्न नसतें, परतु ती जागा कशी मिळावी? जिकडे तिकडे गर्दी—! तुबलेली हपिसें— मेंढराप्रमाणें कालक्रमणा करणारी मास्तर-मडळी—, टाळ्याला जीभ लावून रोग्याची

वाट पाहणारे डॉक्टर अन् हेलपाट्यापायींच खतम होणारे वकील! सदूनें करावें तरी काय?

सदूनें वडिलाकडे पाहण्याचे ठरविलें वडिलाच्या हयातींत त्याच्या पेन्शन-वर व पश्चात् पाचपचवीस हजाराच्या पुजीवर जेथपर्यंत निभावेल तेथपर्यंत पाहू. नतर— देखेंगे! हल्लींच्या तरुणाच्या या आजतागायतच्या विचारसरणीवर तो आला दिवस ढकलीत होता.

एके दिवशीं जेवताना नानानीं त्याच्याकडे पाहिलें.

"सदू, गळ्यातल जानव काय झाल तुझ्या?"

सदूनें काहींच उत्तर केलें नाहीं चार दिवसापूर्वी त्यानें जानवें तोडून टाकलें होतें.

नानानीं किंचित् रागानेंच पुन्हा प्रश्न केला.

"तोडून टाकलें—" सदूनें चिडून उत्तर केलें.

"जेवू नकोस. ऊठ—!"

सदू मुकाट्यानें तसाच पानावरून उठून चालता झाला.

ब्राह्मण म्हणवून घेण्यान आता काय पुरुषार्थ आहे? जानवें तरी कशाला? ज्या ब्राह्मण्यामुळें आज अन्नाला महाग होण्याची पाळी आली त्या ब्राह्मण्याला चिकटून घेण्यापेक्षा महार म्हणून घेणें काय वाईट? ही सदूची कल्पना, परतु नानाना ती कशी पटावी?

नाना दिवसेंदिवस भक्तिमार्गी बनू लागले आणि सदू— काहींच ध्येय पुढें ठेवण्यात अर्थ नसल्याकारणानें—चार्वाक बनू लागला. नानाच्या कुशींत बिलगणारा लहानगा सदू आता नानापासून दूर— दुसऱ्या जगावर गेल्या-सारखा राहू लागला.

नानानीं कोणतीहि गोष्ट पोटातील प्रेमामुळें करावी आणि सदूनें त्याच्यावर अगदीं उलट भाष्य बसवावें. दोघेहि आपआपल्या परींनीं योग्य तेंच करीत होते. पण—

एके दिवशीं नानानीं सदूला लग्नाविषयीं प्रश्न टाकला, आणि सदूनें दुसऱ्या दिवसापासून घरात बोलणें बद केलें.

नानानीं त्याला स्पष्टच विचारलें, "लग्न कां नको म्हणतोस—?"

सदूनें काहींच उत्तर केलें नाहीं. दुसरे दिवशीं सदूनें एक पत्र नानाच्या जवळ दिलें.

त्यातील महत्त्वाचा भाग हा होता—"मला पैसा मिळवता येत नाहीं; आणि तो पुढेंमागें मिळवता येईल हेंहि शक्य दिसत नाहीं. तेव्हा पैशा-शिवाय मी लग्न करून करू काय? तुम्ही म्हणाल, की आहे हा पैसा तुझाच आहे. परतु मला त्या म्हणण्यात काहींच अर्थ दिसत नाहीं. आज तुम्ही गोडींत आहात, उद्या तुमच माझ बिनसल (आणि हल्लीं रोजच तसं बिनसायला लागल आहे) आणि आम्हा दोघाना तुम्ही घराबाहेर काढलत तर—? माझ्या लग्नाच्या बाबतींत आपण बिलकुल पडू नये—" इत्यादि इत्यादि.

सबध रात्रभर नानाना झोंप आली नाहीं. त्याच्या प्रेमाविषयीं त्याच्या पोटच्या गोळ्यानें दाखविलेला अविश्वास त्याना सहन झाला नाहीं. ज्याच्या-करता आपण--

सकाळीं उठल्याबरोबर त्यानीं सदूस हटकलें

"सदू-- तू मला एक साग. तू लग्न करण्यास तयार आहेस कीं नाहींस?"

"नाहीं--" सदूनें खालच्या मानेनें परतु निश्चयानें उत्तर केलें.

"विचार करून उत्तर दे"

सदू काहींच बोलला नाहीं.

"पहा— लग्न करणार नसशील तर मी आपला घर सोडून काशीयात्रेला जातों. तुझ्या आईला मी वचन दिल होत, तें पूर्ण करण्याच तुझ्या हातात आहे. नाहीं तर मग मला या ससारात राहून काय अर्थ आहे?"

सदू झपाट्यानें सायकल घेऊन काहीएक न बोलता घराबाहेर पडला.

* * *

नानाच्या काशीयात्रेच्या बेताची कुणकुण लागताच त्याचा भाऊ लागलीच आला. नानानीं अश्रुपूर्ण नेत्रानीं त्याला म्हटलें, "भाऊ, तुला तो दिवस आठवतो का? त्या दिवशीं तुझ्या म्हणण्यास मीं होकार दिला असता तर या पोराची काय स्थिति झाली असती? जग धावतें आहे. वडिलानीं आपल्या-करिता काय स्वार्थत्याग केला असेल हें पाहण्याच्या स्थितींत तरुण पिढी नाहीं.

तरुण पिढी जीवनाच्या तीव्रतर धडपडीमुळें भाबावून गेली आहे. त्याना विवेक करण्याइतका सुद्धा विचार राहिलेला नाही. त्यात त्याचा दोष नाहीं. तरुणपिढी आजपर्यंत नेहमींच वडील मडळीच्याकडे सशयानें पाहत आली आहे. त्यात आणखी ही भर ! मला आता ससारात गुरफटून राहण्यासारखें काय राहिलें आहे ? उलट माझी अडचण होईल सर्वाना मीं पुरेसें ठेवलें आहे. एकीचें लग्न करून मी मोकळा झालों बाकीच्या राहिलेल्या दोघाच्या मनात येईल तेव्हा तूच त्याच्या लग्नाची व्यवस्था कर माझी अडचण होत आहें. मी आपला बाजूला होतों—"

एके दिवशी सकाळीं अश्रूनीं भरलेल्या डोळ्यानी नानानीं खरोखरीच घराबाहेर पाऊल टाकलें !

## शिवापूरचा रघ्या : : ६

'फुर्र्-फट्-फटक्-फटक्' इत्यादि तालबद्ध पद्धतीनें बेसूर आवाज करीत राकेलचा पिवळा डबा शिवापूरच्या 'इष्टयाड'वर येऊन थडकला. धूळीचा लोट आला! ब्रेक्स लागल्याचे व लहान पोरें किचाळल्याचे आवाज एकदम ऐकू आले. दोन्ही आवाज इतके सारखे होते, कीं कोणता आवाज कशाचा हें ओळखून काढण्यास 'सकाळ'मध्यें सपूर्ण पाच रुपयाचें बक्षीस 'सकाळचें कायमचें कोडें' म्हणून ठेवण्यास कसलीच भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

काही वेळानें मोटारीचें काळीज थड पडलें. दारें उघडल्याचे आवाज ऐकू येऊ लागले, आणि पुढच्या खुराड्यातून पिवळ्या खाकीनें भूषित केलेल्या दोन तगड्या एका इरसाल शिवीसमवेत बाहेर पडल्या. अर्थात् शिवी अमक्यालाच अशी काहीं कुणाला उद्देशून नव्हती. परतु समजणारा मनात समजला. ज्याला इतर लोक 'क्लीनर' म्हणून समजतात परतु ज्याचें काम इतक्या विविध स्वरूपाचे आहे, कीं त्याला खरोखरीच 'देवकिन्नर' म्हणून सबोधायला पाहिजे असा एक प्राणी, आधीच परमेश्वरानें विचकलेले दात जास्तच विचकत पुढें धावला. त्याच्या दृष्टीनें ड्रायव्हरनें दिलेली शिवी म्हणजे बादशाहानें नव्या वर्षाच्यानिमित्त वाटलेल्या पदव्याइतकीच अभिनदनीय होती. कानात अडकविलेली जळकी विडी त्यानें तोंडानें फुकर मारून दातात अडकवून ठेवली. एका उतारूजवळच्या काडीनें विझलेलें

होमकुंड प्रज्वलित करून मोटरीच्या नळकांड्यात पाणी ओतण्याकरता सिमिटानें बरबटलेलें, सत्तावीस ठिकाणी भोकें पडलेलें, आणि छप्पन्न ठिकाणीं चिंबटलेलें एक टमरेलवजा टिनपाट त्यानें बाहेर काढलें.

रेसला निघण्याच्या झोकात आपल्या सिनेमा- नटपद्धतीच्या केसामधून कौतुकानें बोटें फिरवीत, मधूनच धुळीनें पिंगटलेल्या मिशाचा जिभेच्या कोपऱ्यानें आस्वाद घेत, पैशाला चार मिळणाऱ्या आगीनगाडी छापाच्या उंची सिगरेटच्या निळसर धुराकडे एकाद्या तत्त्वज्ञान्याप्रमाणें पाहत मोटार हाक्या 'इष्टयाड'वर चाललेल्या फोनोच्या मिश्र मैफली शांत चित्तानें ऐकत उभा होता. इच्छित स्थळीं जाऊन पोंहोचण्याची त्याला गर्दी नव्हती, हें उघड दिसत होतें. इच्छित स्थळ, वेळ, काळ या मानवी विचाराच्या कक्षे-बाहेर वावरणारा तो एक अग्नुदार मोटरहाक्या होता. तो थांबेल तेंच त्याचें इच्छित स्थळ, तो निघेल तेव्हाचीच ती योग्य वेळ आणि तो मागेल तोच त्याच्या रथाचा दर. त्याचा शब्द हाच त्याचा कायदा.

जरा वेळानें त्यानें आपल्या मिशावरची धूळ तोंडाने 'फ्यू' करून झाडून टाकली. डोक्यावरची रोगणी टोपी एकवार झाडून जास्तच मळकट करून घेतली आणि तोंडानें एक शेलकी शिवी (अर्थात् कोणालाच उद्देशून नसलेली) पुटपुटत तो पुन्हा काथ्याच्या आसनावर स्थानापन्न झाला 'पॉग-पॉग' असा विव्हळणाऱ्या गाढवासारखा आवाज झाला

" हा चलाऽऽऽ" म्हणून मागच्या बाजूला लटकणाऱ्या क्लीनरनें म्हटलें

पुन्हा एकदा पॉग-पॉग आवाज झाला. इंजिनची खरखर झाली चार-दोन फटाकड्याचे बार झाले. मोटार दोन पावलें मागें सरकली आणि झोंपीं गेली

इतक्यात रघ्या, रघ्याचे वडील आणि रघ्याची आई जवळजवळ पळतच स्टँडवर येऊन पोंहोचलीं. दाडा मारण्याचा हुकूम देण्याकरिता उघडलेला जबडा 'या पाव्हण— कुठ जायच?' म्हणून मोठ्या आपुलकीनें चौकशी करू लागला.

रघ्यानें लाल रंगाचा, गळा दाबून टाकणारा कोट चढवला होता. एकंदर सात गुंड्यांपैकीं दोन फुटक्या व एक धडकी इतक्याच गुंड्या जादा काम करून काटकसरीचें धोरण व्यक्त करीत होत्या. कोट लाल रंगाचा म्हणजे

नुसत्या त्याच रगाचा होता असें नाहीं इतरहि इद्रधनुष्याचे रग थोडयाफार प्रमाणात होतेच हजर. डोक्याला एक काळी फाटकी टोपी होती ती डोक्याला घातली होती म्हणण्यापेक्षा डोक्यावर ठेवली होती हें कपाळावर दिसणाऱ्या करकोच्यामुळें स्पष्ट दिसत होतें. टोपीच्या आतला पुष्टा आता 'काम झेंपत नाहीं, फर्लो द्या' म्हणून कचेरींतल्या वयोवृद्ध कारकुनाप्रमाणें सतरा ठिकाणीं लचकत होता रघ्याची कापून लाडी केलेली तुमान त्याच्या गुडघ्यावर आली होती. कमरेला पट्टयाच्या ऐवजीं गुडाळलेल्या आईच्या लुगडयाची काठोळी गुडघ्याच्याहि खालीं लोंबत होती. नुकत्याच पुसलेल्या घामाने बाही ओलसर झालेली दिसत होती.

रघ्याचे वडील पोत्यात गुडाळलेले एक 'पाटीलबाबा' दिसत होते आणि गोवऱ्या लावताना नखाला चिकटलेले डाग अजून नीटसे पुसले गेले नसल्यामुळें हातानें धरलेल्या बोचक्यावर रवींद्रनाथाची चित्रकला काढणारी त्याची आई सती सावित्रीप्रमाणें दिसत होती.

रघ्याचे वडील 'ममई'ला सहकुटुब सहपरिवार जाऊन आपल्या कारभारणीच्या भावाचें लगीन उरकणार होते. 'तुमीही आल्यानें फार षोभा होणार आहे," म्हणून खुद्द त्याच्या हातचाच कागूद त्यानीं मुडाशाच्या एका पदरात पचवीस गाठींनीं सुरक्षित बाधून घेतला होता

"बसा पाव्हण—" म्हणून म्हणत ड्रायव्हर खाली उतरला.

"अर्, पण हत कुट बसू?" रघ्याचे वडील पायातल्या तुटक्या वाहना हातात घेत म्हणाले.

"मस्त जागा आहे. कुठ म्हणजे काय? त्या ड्रमवर तुम्ही टेका, बाईना बसू द्या त्या मोडक्या चाकावर, अन् पोराला घ्या माडीवर. कुठ लाब इग्लडाला जायच आहे? घटका दोन घटकेची कळ—" म्हणून म्हणत ड्रायव्हरनें मागचें दार खुलें केलें.

आतलीं माणसें सावरून बसण्याऐवजी जास्तच ऐसपैस बसलीं. सुशिक्षित उतारूनी 'काय बुवा—काय त्रास!' इत्यादि पुटपुत चेहरे आबट व लाबट केले. अशिक्षित उतारूंनीं 'आरऽ आणखी धा—पाच कोंब' म्हणून म्हटलें. ड्रायव्हरचा हा रोजचाच पोरखेळ होता. कोणत्याहि उतारूपुढें त्यानें अजून कच खाल्ली नव्हती. तो काय डरतो?

दीडफूट छातीचा कोट फुगवीत 'कायऽऽराव! टोपीवाल्याच्या खिशातूनच जसे काहीं उतरलात' म्हणून गुरकावीत तीन मेंढरें तशींच कोंबली.

रघ्या थक्क झाला! इतके दिवस तो परसातील लाकडाच्या ओंडक्याला मोटार समजून मोटारहाक्याच्या सुखमय जीवनाचें आपल्या कल्पनेप्रमाणें सुख अनुभवीत असे. पण प्रत्यक्ष पाहिल्याबरोबर त्याच्या बालमनाला केवढें कौतुक वाटलें! केवढा हा अधिकार! अन् ती पायापर्यंत लोंबणारी खाकी विजार– तो धीरगंभीर धैर्यधरकटाचा मुखडा–, तो तेलकट टोपीचा रुबाब अन् ती चाक फिरवण्याची ऐट! वा रे वा!

मोटार निघण्याच्या सुमारास होणारे सर्व प्रकार यथाविधि पार पडले. पंचवीस पावलं मोटार मागें गेली, ड्रायव्हरनें एक सुंदरशी शिवी ठेवून दिली आणि संतापानें थरथरणाऱ्या मोटरनें एक जोराची उचकी दिली आणि पुढें झेंप घेतली. पोरें किंचाळलीं. मोटारनें खोकत खोकत प्रवासास सुरुवात केली.

सुरुवातीस भेदरलेला रघ्या आईच्या पदराबाहेर डोकावून पाहू लागला!

—२—

दहा दिवसानंतर त्याच म्हाताऱ्या मोटरींतून रघ्या, रघ्याचे वडील अन् त्याची आई शिवापूरच्या स्टँडवर उतरले. रघ्याचे वडील आणि आई पूर्वीप्रमाणेंच दिसत होतीं, परंतु रघ्याचा मात्र पोशाख बदलला होता. मामानें दिलेले अमळनेर गिरणीचे वीस नंबरी सुताचें तलम (!) धोतर तो मोठ्या ऐटीत गचाळेपणानें नेसला होता तांबड्या कोटाच्या जागी भरपूर तीन धडक्या गुंड्या असलेला सोलापूर-चेकचा काळा कोट 'ममईत' शिवलेला,— सुताच्याच फुल्यानें शोभायमान दिसणारी बनातीची तांबडी लाल गरगरीत वाटोळी टोपी,—पायाला चावणारा पांढरा शुभ्र जपानी रबरी बूट,—त्या बुटाच्या गळ्यात मान टाकणारी हिरव्या सुताचा गोफ असलेली सुती पायमोजाची जोडी—! बस्स् बस्स्! मामानें भाच्याला पक्का मुंबईकर बनवून सोडला होता.

रघ्या बदलला होता यात शंका नाहीं तो नुसता कपड्यातच बदलला होता इतकेंच नव्हे तर मनातून सुद्धा तो पार बदलून गेला होता. दहा वर्षांचा कोंवळा पोर, मतें आणि मिशा उमटण्यापूर्वींच मुंबईच्या मोहनीनें

भारून गेला होता. मुबईच्या धावत्या टमरेळ गाड्या पाहून त्याच्या जास्तीत जास्त आवडत्या दोस्त कादरभाईच्या 'श्रीबजरगबलीकी जय' कपनीच्या पिवळ्या डबड्याविषयीचा त्याचा आदर पार नाहीसा झाला. अमेरिकन जर्नालिझमचे मराठी प्रयोग पाहून महाराष्ट्रीय वाचक जितका आइस्क्रिम झाला असेल तितका तो आपल्या पूर्वीच्या आदरणीय वस्तूच्या आठवणीनें थडगार पडू लागला मुबईचे डाबरी रस्ते पाहून लोक या रस्त्यावरून लोळत जाण्याऐवजीं चालत जातात या त्याच्या कल्पनातीत धाडसाकडे पाहून त्यानें आश्चर्यानें कोटाची उजवी बाही चक्क तोंडात घातली त्याला आश्चर्य वाटलें, की इतकीं माणसें रोज उठून कोठल्या फडावर कुस्त्या पाहयला जात असतील? नाहीतर इतक्या लोकाना इतक्या दाटीवाटीनें राह्यला रोज कोणत्या तरी सटवाई मरीआईची जत्रा भरत असली पाहिजे. आग्र्याच्या ताजमहालाहि भव्यपणात क्षुद्र झोपडी-प्रमाणे वाटावयास लावणाऱ्या इमारती, आ वासलेल्या तोंडानें पाहून त्याला शिवापूरच्या अत्यत उच टेकाडाचाहि इतक्या दिवस वाटणारा अभिमान जेथल्या तेथें जिरून गेला. कोपऱ्या कोपऱ्यावर उभा राहून डाव्या-उजव्या हाताची कसरत करणाऱ्या इष्टुर फाकडयाच्या पोलीसी आकृतीशी, कधी चार वर्षातून एकाद्या वेळीं घाटात दबा धरून बसलेल्या तट्या भिल्लाचा तल्लास काढण्याच्या विचारानें आलेल्या पुण्याच्या चिपाडी पोलिसाची तुलना करून पाहताना त्याची त्यालाच लाज वाटली. मुबईचा 'समिंदर' पाहून गावच्या शिगेवरून कमाल मर्यादा फार तर वर्षातून दहा बारा दिवस अथाग वाहणा-ऱ्या 'रत्नावती' ओढयाचा त्याला अतोनात तिरस्कार वाटू लागला.

खुद्द मामाच्या घरीं त्याला असे आणखी कित्येक देखावे दिसले! मामा-ची नोकरी तरी किती मजेची. पावसाळ्यात रस्त्याच्या कडेने दाटीवाटीने उपटलेल्या 'छत्र्या'पेक्षा सुद्धा जास्त सुळसुळाट माजवणाऱ्या आणि 'अहो, आम्ही छापखानेवाले आहोत आणि आमच्याजवळ छापखानाहि पण आहे अन् आमच्या छापखान्यात खिळेहि पण आहेत अन् त्या खिळ्यानी अक्षरें पण छापली जातात' अशी जाडजूड अक्षराच्या साहाय्याने जाहीर घोषणा करणाऱ्या खटाववाडीतल्या अनत छापखान्यापैकीं एका छापखान्यात खिळे जुळविण्याचें कत्राटी काम त्याचा मामा करीत असे. लोखडाच्या एवढ्याशा

खिळयानें अक्षरे उमटवली जातात हें विचित्र सत्य प्रत्यक्ष डोळ्यानी अनुभव ल्यावर रध्याचा डोळ्यावरमुद्धा विश्वास बसेनासा झाला. कुठे हें रम्य जीवन अन् कुठें 'राभपाऱ्यात' जुपलेले ते पवळ्या ढवळ्या बैल अन् तो गाठीनें साधलेला आसूड, अन् तो विंचवासारखा तरफाकडा लाकडी नागर, अन्— छे! जन्म घेण्याच्या कामात आपला नाइलाज होत असेल परतु मराव ते मुबईतच!

शिवापुरच्या रानात आपण सुरपाट्या खेळण्यात आनद मानीत होतो त्या-पेक्षा या रस्त्यातून बेदरकारपणाने इकडून तिकडे जाण्यात कितीतरी जास्त मौज आहे शिवापुरचे ते धुळीनें समृद्ध असलेले रस्ते अगदी प्रथम खडी पसरून एका लठ्ठभारती इजिनाकडून दबवून घेतलेले त्यानें पाहिले होते आणि येथें तर त्या इजिनाच्या आत्याबाई शोभणाऱ्या जाडजड इजिनाकडून वेगानें ओढल्या जाणाऱ्या गाड्या पाहून त्याला आपण शिवापुरसारख्या मातीच्या ढिगात राहतोच का हा मोठा प्रश्न येऊन पडला गावातल्या साऱ्या गावकऱ्याचा मोठ्या अभिमानाने सागण्याचा विषय म्हणजे शिमग्याच्या दिवसात ब्रह्मचारी मारुतीच्या पडक्या देवालयात गावातल्या नीटस दिसणाऱ्या मुलाकडून केला जाणारा कलगी-तुऱ्याचा तमाशा. आधी खेडेगाव, त्यातून हक्काचे दिवस, त्यातून गावातल्या सस्कृतिरक्षण मडळाचे सभासद जातीनें हजर– मग जल्लोशाला काय सीमा! शिवापुरचा शिमग्यातला तमाशा म्हणजे मुबईच्या भरभक्कम दीड महिनाभर आयुष्य असलेल्या एकाद्या मारपीट सिनेमा कपनीचा रोमाचकारी, हृदयाचा तळठाव (म्हणजे काय कुणास ठाऊक?) घेणारा, आतषबाजीचे भरपूर प्रदर्शन माडणारा, स्वरमाधुरी मिस् अमकीतमकीला प्रथमच पडद्यावर खेचून आणून मवाली प्रेक्षकाना आधळे बनविणारा एकादा स्वर्गीय बोलपटच तो. तमाशा पहायाला गावची कुत्री येत इतकेंच नव्हे तर दूरदूरची— बारामती, सातारा, पुणें येथलीसुद्धा–– रसिक वकील मडळीसुद्धा तेथील जज्जसाहेबासकट येत असत. बोला आता!

परतु रध्याचा हा अभिमानसुद्धा पाच मिनिटात पचवीस लोकाचे मुडदे पाडून नायिकेसकट घोड्यावरून पशार होणाऱ्या नायकाला पाहताच पत्त्याच्या बगल्याप्रमाणें एकदम जमीनदोस्त झाला. त्याला आता शिवापुरच्या

पेन्शनर पाटलाचा मुलगा म्हणून स्वत.ची बदनामी करून घेणे योग्य वाटेना त्यापेक्षा मुबईतल्या दाशेसेठच्या करीरोड येथील त्रेपन्नाव्या गल्लीतील पासष्टाव्या चाळीत राहणाऱ्या 'कपोसीटर' मामाचा भाचा म्हणून सागणें जास्त फुशारकीचें वाटू लागले आहे म्हणजे उगीच कोणी लुगासुगा नाहीं.

या व आणखी अशाच विचाराने भारलेल्या डोक्यानें त्यानें मुबईला रामराम ठोकला बोरीबदरपर पोंहोचवायला आलेल्या मामाचे ते सफाईदार बामणी बोलणे, सामानाचें वजन मागणाऱ्या एका अवाढव्य घड्याळात पाहून इतके रुपये, इतके आणे बिनचुक सागणे, कारण नसताना उगाचच डोक्यावरच्या केसाना कुरवाळणे, आपले वडील घरातून निघाल्यापासून तिकिटे कशी काढावींत या महाबिकट सकटात पडलेले पाहून त्याना झटकन् ह्या सकटातून सोडवणें— इत्यादि गोष्टी त्याच्या अत:पटलावर कोरल्याप्रमाणें स्पष्ट उठल्या होत्या !

अर्थात्च शिवापूरच्या स्टॅडवर उतरलेला रघ्या आता पूर्वीचा रघ्या राहिला नव्हता. त्यानें त्या म्हाताऱ्या मोटरीकडे तुच्छतेने एकवार पाहिले आणि मनात शपथ वाहिली की मरेन तर मुबईकर म्हणूनच आणि तेंहि मुबईतच !

—३—

शिवापुरची शाळा अजून वाघिणीचे दूध पाजण्याच्या नसत्या फदात पडली नव्हती गावातील ग्रामसिहाची ( किवा गावपिते म्हणा वाटल्यास ) अजून प्रामाणिक समजूत होती, की इग्रजी शिक्षणाने मुलगा बिघडतो— म्हणजे बाप जिवत असताना भिगा काढतो— घरातल्या पवित्र देव्हाऱ्याच्या आसपास ती अगावर शहारे आणणारी भाषा बोलून देवाना कळणार नाहींत असल्या शिव्या देतो— अन् मडम आणून नाच करतो पुण्याहून आणि मुबईहून आलेले 'बामन लोग' त्यानीं डोळ्यानी पाहिले होते.

"कशापाई विंग्रजी शिकाया व्होंव ? आपल जुन पेशवाई म्हराटी हाय त्ये ब्येस" गावातील पाटलापासून ते बलुत्या—म्हशी-माद्ऱ्यापर्यंत प्रत्येकाचें हेंच मत कायम होतें

आज्यापणज्यापासून ते आजतागायत शिवापुरच्या ब्रह्मचारी मारुतीनें एकसुद्धा इग्रजी शब्द ऐकून आपले कान विटाळून घेतले नव्हते.

परतु जी गोष्ट प्रत्यक्ष इग्रजहि करू शकला नसता तीच गोष्ट आपल्याच-पैकीं एक खादीधारी मनुष्य एका चुटकीसरशी करू शकला मारुतीच्या मागच्या आवारात त्यानें गावातील प्रतिष्ठित समजली जाणारी ग्येनबा मारुती, इठा (विठा) रक्मा, तात्या गोईदा आदिकरून मडळी एके ठिकाणीं बोलवली आणि महाराज, बोलता बोलता त्याने कळ फिरवली! साक्षर व्हा!

रघ्याच्या वडिलाना हे व्याख्यान फार बाधलें. रघ्या नुकताच मराठी चौथी इयत्ता डिपोटीच्या मेहेरबानगीने पास झाला होता त्यानें इग्रजी शिकण्याचा हट्ट घेतला.

मुलानें बायको करून द्या म्हणून हट्ट घेतला असता तरी रघ्याच्या वडिलाचे डोळे पाढरे झाले नसते इतके ते या इग्रजी शिकण्याच्या मागणीला दचकले. आपल्या घरात आता ती पाढरीबाई शिरणार या विचारानें त्याना तबाकूची फक्कीसुद्धा कडूलिंबाच्या वाळलेल्या पानासारखी कडू अन् चोथट लागली. अन् मर्दाला खुलून दिसणारी मिशीची कोंवळी झार सुद्धा हा पोरटा उगवू देणार नाहीं!

"अरऽऽ, पन रग्या, विंग्रजीबुक वाचूनशान तू काय साहेब होनार हैस व्हय? त्या बामनानीं एक इचार सोडला पन आपल्याला आपली कुळी पगाया व्होवी ना? अरऽ तुझ्या बाच बा-चीं ह्ये असल वगाळ कदी शिकले न्हाइत. तुझी आई तर म्हराठी बुक पाऊनबी डोळ गप्‌कान मिटतीया. आन तू म्हनतोस विंग्रजी शिकतो." तोंडातील तबाकूचा फवारा उडवीत त्याचे वडील म्हणाले.

"पन मामाबी विंग्रजी छापतो—" रघ्या म्हणाला.

"त्यो यक शेना अन् तू सात शेना" पेन्शनर पाटील उद्गारले.

भावाचा हा होत असलेला उद्धार पाहून कोणती भगिनी धावून येणार नाहीं?

"हा! तस नाय बर का! माजा भाउराया लई गुनाचा. टमरेलगाडींतनं जाताना साहेबाच्या मोटारीकड अक्शी डोळ फाडून पघतो त्यो. कदी डरायचा नाइ"

"न्हाउ द्ये! तूबी माझ डोकस कुरतडाया लागलीस नव्ह का?" म्हणून म्हणत पाटील उठून गेले.

सबंध गावात दुसऱ्या दिवशीं हा.हा.कार! गावातील शाळेचा मराठी चौथी पास होणारा एकुलता एक विद्यार्थी, कुस्त्याच्या दंगलींत फडावर बालपहिलवानात अजिंक्य ठरलेला शिवापुरचा भावी गुगा, शिमग्यातल्या पाच दिवसात पंचवीस ठिकाणची चीजवस्त हातोहात लंबे करणारा पठ्या आणि शिमग्यातल्या तमाशात डोळे न मिटता तासन् तास दिवट्या धरण्याचें काम करणारा बाल अभिमन्यू— इंग्रजी शिकण्याचा महाभयंकर हट्ट घेऊन बसला आहे! गावातील वृद्धा नारींनी अगारे-धुपारे केले, वृद्ध आजोबानीं 'आपण इंग्रजी शिकलो नाही म्हणून काही आमचे संसार व्हायचे राहिले नाहीत,' म्हणून निर्वाळा दिला तरुणानी तंगडी तोडण्याची धमकी दिली, आणि गावच्या पारलौकिक स्वास्थ्याची सतत काळजी वाहणारा तुंदिलतनु गदाधरभट याने तर शास्त्रातले चक्क संस्कृत आधार काढून दाखवले.

"बाबा रे! 'न वदेत् यावनीं भाषा प्राणैरपि गतैरपि'! प्रत्यक्ष भगवान् विष्णु आपल्या लाडक्या नारदाला, जेहेत्ते कालाचे ठायीं, हे गुपित—अन् महाराज, हे गुपित फक्त नारदालाच तेवढ सांगितलं आहे बर का त्या परमात्म्यानं— तर हें गुपित मोठ्या कळवळ्यानं, अन् महाराज! मोठ्या कानफिशडल (Confidentially) पद्धतीनं सांगितलेलं आहे. आमचा मुलगा पुण्याला आहे. त्याला सांगितलं मीं, की बाबा रे, इंग्रजी शिकू नकोस. ऐकल नाही त्यानं. कलीयुग म्हणून ज्याला म्हणतात तें हे बर! रघ्याची आई! आता करायचं काय? सच्चिदानंद! जय हरी जय हरी—! बर उद्या पौर्णिमा आहे बर का—" इति गदाधरशास्त्रि उवाच।

रघ्यानें अन्नत्याग केला अर्थात् घरात कुणी पाहत नाही असें पाहून त्यानें दुधातलें दूध, त्यादर लोण्यातलें लोणी इत्यादि साजूक जिनसावर भागवून नेले. आईचा धीर सुटला वडिलाना तंबाकूसुद्धा कमी गुळचट लागू लागली

एके दिवशी त्यानीं मामाला कागूद धाडला

—आणि रघ्या मुंबईला जाऊन, इंग्रजी शिकून आईबापाचे पांग फेडण्याकरता मामाचा हात धरून शिवापुरच्या स्टँडवर उपस्थित झाला. (म्हणजे आला.)

आजची मोटर तीच ती. आणि हाक्याहि तोच तो. आणि दुर्दैव हे, की

बत्तीस दातांपैकी निम्म्याच्यावर दातांची बाजारपेठ मांडून बसलेलें तेंच तें क्लिन्नरनाम्या प्राण्याचें थोबाड !

अर्थात् परंपरेचा मान ठेवण्यात सदा जागरूक असलेल्या त्या झोपाळू मोटारने तेच सर्व विधि मोठ्या आस्थेवाईक गंभीरतेनें करून दाखविण्यात कांडीचीहि कसूर केली नाही

रघ्याच्या वडिलांनी मामाच्या कानाशी लागून म्हटले, "जरा वाईच् पोरावर नदर असू द्या लई अचपळ म्हून सांगाया व्होवं !"

"एं. ! त्याची कांहीं काळजी करू नका रघुनाथ तुमचा मुलगा आहे तसाच माझा भाचाहि लागतोच न !" सफाईदार वाक्यरचनेवर भर देत मामा म्हणाला.

एकदाची मोटर जागची हलली. रघ्याच्या आईनें पदराआड तोंड केलें

"रघ्या—पोरा, तुला सुद्धा मुंबईच आवडली का रे ?" म्हणून म्हणत मामानें त्याच्या पाठीवर हात ठेवला

— ४ —

सात-आठ वर्षांत रघुनाथ दोनदा का तिनदाच काय तो शिवापुरला आला होता. आता त्याला 'रघ्या' म्हणण्याची छातीच नव्हती कुणाची ! आता स्वतःला तो 'टी. रघुनाथ—, बॉंबे' म्हणून समजत असे शिवापुरच्या राहणीवर, तेथील अज्ञानरूपी अंधःकारावर, तेथील शेंबड्या पोरीसोरींवर, तेथील लोकांच्या गलिच्छ, अस्वच्छ पद्धतीवर—एकाद्या इंग्लंडहून मुंबई बंदरावर नुकतेंच पदार्पण करणाऱ्या I. C. S.च्या झाकीत मोठ्या सडेतोड-पणें तो कोरडे ओढीत असे

आईचे हृदय उचंबळून येई. तिला वाटे पुन्हा पदराखालीं झांकावा. त्याला वाटे की काय हे वेडेपण ! माया पोटात ठेवावी. फार तर ओठानें बोलून दाखवावी ! पण— इस्तरी केलेल्या कपड्यावर ते मातट हात ! शीः ! बिचारी आई खट्टू होई. प्रेमाचा पान्हा कोंडून ठेवी.

वडिलांना वाटे पोरगा नांव काढणार. उद्या एकाद्या साहेबाशींसुद्धा बोलायला डरायचा नाही. आता गोरी मडम—! छेः ! आपल्या पोटच्या गोळ्यासंबंधीं कोण हे अमंगळ विचार ! आता एवढी 'माती कुटण्याची' का

कसलीगी एवढी आभाळाला हात पोहोचवणारी परीक्षा झाली की देऊ त्या सावळ्याच्या यमीशी लगीन लावून !

मुलाला वाटे—, मुलाला वाटे—!

शेवटी एकदाची ती मोठी परीक्षा झाली रघुनाथ सुटींत घरी आला होता गावातल्या शिल्लक राहिलेल्या मडळीचे एक मडळ रघ्याच्या वडिलाकडे दुसरे दिवशीं आलें त्यात सावळ्याहि पण होता—, त्याला कारणहि पण तसेंच होतें.

"पाटील, पगा—समद्याच ह्येच म्हनन हाय! आमी समद गावकरी येक मत्त करून, येक हातीं, येका वक्ताला, येका दिलान आपल्या शेंदऱ्या मारुतीसबूर तुमच्या पोराला पैका द्याया राजी हावो काढ म्हनाव! काढ ल्येका, पिठाची गिरन काढ! काय पट्टी बसल ती करू उभी पाटलाचा पोर-ममईला जाऊन सायची बोली शिकून आलाया! आमच्या गावाच नाव आक्शी इरुपात जाया व्होव—" सावळ्या घोंगडी सावरीत म्हणाला

"हा! कस म्हगालास! अरऽऽ त्यो सकाळ का सध्याकाळ म्हनत्यात ना त्या—इर्ष्टडवर मिळतोना त्यो? अग त्यात छापाया होव ह्ये तवा खर—" दुसरा म्हणाला.

"तवा—पगा पाटील गावच म्हनन हाय ह्ये. अक्शी इरूपच्या बाच्छा वानी रहा म्हनाव शिवापुरात. शिवापुरच इरूप करून टाकू म्हनाव ल्येकाला" सावळ्या अभिमानाने म्हणाला

"हा—हा! शिवापूरच इरूप व्हयल् अन् काय?" चारजण एकदम् म्हणाले.

"माझी यमी, तुम्ही, पाटील पधीतली हाय! आता येत्या मार्गेसरात अकराव वरीस लागल पोरीला! हाय उफाड्याची! अन् धारबी सोता (स्वत.) काडती." सावळ्या म्हणाला.

"सावळ्या, आर ऽऽ यमी तर लई मोठी दिसतीया कि र!" एकानें शका काढली

"उग बस की मर्दा" सावळ्यानें त्याला चापलें.

कनक आणि कान्ता सहज लीलेनें आपणाकडे खेंचणाऱ्या आपल्या मुलाचें गुण आठवून पाटलाना गहिवरून आलें त्याचे डोळे आनदाश्रूंनीं भरून आले. त्यानीं मोठ्या प्रेमानें मडळीना निरोप दिला व उदईक आपण

मारुतीच्या देवळाबाहेरील पटागणात विचारविनियम करू अशा अर्थाचें वचन दिले.

रात्रीं नवरा-बायको किती तरी वेळ रडत होती. आपण का रडतो आहोत याचें कारण मात्र त्याना उमगलें नाहीं

टी. रघुनाथ बॉबे-मजकुरानीं सध्याकाळी आलेल्या शिष्टमडळाचें म्हणणें समग्र आडून ऐकले होते त्यानी मनाशीं ठरवून टाकले कीं,—

दुसऱ्या दिवशीं 'चार दिवसानी येतों. फारच निकडीचें काम आहे पुण्याला' म्हणून गावातील लोकाना सुनवून रघ्यानें येट मुबई गाठली.

पुन्हा म्हणून रघ्याने शिवापूरची वेस ओलाडली नाही

— ५ —

म्हातारा म्हातारी रोज डोळ्यात आसवे आणून एक वर्षभर रघ्याच्या वाटेकडे डोळे लावून बसत असत दुपारी वडील शेतावर जात, सध्याकाळी परत येत, आणि सध्याकाळी नवरा बायको दोघेहिजण 'इष्टयाड'वर जाऊन घटका दोन घटका एका झाडाखाली बसत अगदी अधार पडला म्हणजे दोघेंहि एक दीर्घ नि:श्वास सोडून, एक चकारशब्द न काढता आपल्या घराकडे वळत.

एक वर्षानतर मामाचा कागूद आला. त्यात त्यानें रघ्याला ५० रुपयाची सरकारी नोकरी मुबईतच लागली असल्याचे कळविले होते व आता रघ्याचें लग्न आपल्या चाळीतल्या एका पुण्याकडच्या मुलीशीच करण्याचें का भाग पडत आहे हेहि उडत उडत कळविलें होतें शेवटी आता रघ्याच्या हिता-करता म्हणून ते लग्न उरकून घेण्यास तुम्ही ताबडतोब मुबईस यावें असें विनविले होतें

म्हाताऱ्याने चार दिवस या गोष्टीवर विचार केला. शेवटी सताप, अपमान सर्व काही गिळून टाकलें म्हातारीनें थोड्याशा बावचळलेल्या मन:स्थितीत काय खिडुकमिडुक घरात होते नव्हते ते बाधून घेतले.

आणि एके दिवशी सारा जन्म ज्या घरात काढला, ज्या घरातील अणुरेणु-मातीसुद्धा सोन्याच्या लाख तोळे किंमतीची होती त्या घराला त्यानीं अखेरचा रामराम ठोकला!

—आणि थरथरणाऱ्या हाताने म्हाताऱ्यानें दरवाजाची कडी उचलून कपाळाला लावली— त्या भकास घराकडे तितक्याच भकास मुद्रेनें पाहिलें आणि—

—आणि आमचे पुढारी आम्हाला आक्रोश करून सांगतात, कीं खेड्यात चला !

## सूडाच्या लहरींत—! : : ७

"अशीच जिरवली पाह्यजे याची " म्हणून नाना आपल्याशींच पुटपुटत होता त्याच्या एका हातात एक पत्र आणि दुसऱ्या हातात एक कसलासा फोटो होता. चालू कार्यात गोडी आणण्याकरिता म्हणूनच कीं काय, मधून मधून माडीवर पडलेलें अलगूज तोंडात धरून 'मधुकर वनवन' या पुराणात जमा झालेल्या गाण्याची शक्य तितकी विकृत नक्कल करीत होता

हें अलगूज विकत घेऊन आज जवळजवळ दीड वर्ष होत आलें होतें. तस म्हटल तर नाना कांहीं एकादा कलावान नव्हता हें तो स्वत. देखील कबूल करीत असे विशेषत' गायनकलेत तर त्याच्याशी एकाद्या सगीत-कलाविहीन पशूनें सुद्धा बोलण्याच्या लायकीचा तो नव्हता, पण मनुष्यस्वभावच कांहीं विचित्र आहे त्याला काय करणार—! वाङ्मयाशीं वाचक या नात्या-पलीकडे कांहींहि सबध नसलेल्या आणि येणाऱ्या जाणाऱ्या गाड्याना हिरव्या-पिवळ्या चिठ्ठया खरडून त्याची बोळवण करणाऱ्या जी. आय पी. रेल्वेंतील खरबुजी चेहऱ्याच्या कारकुनानासुद्धा हा कलाविलासाचा आचटशोक करावासा वाटतोच की नाही ? हॉटेलात बसून एक सिंगल आणि आखा पाव या सामुग्रीच्या जोरावर अलीकडे टागेवाल्याना सुद्धा वर्तमानपत्रातील निवडक व शेलक्या बातम्याच्या आधारावर इरसाल कलाविलास करावासा वाटतोच की नाहीं ? शाळेंतील दिनाकारण माजवलेल्या अनावश्यक अभ्यास-

क्रमाच्या जाचणीला कटाळून निमित्तालाच टपलेल्या काही उडाणटप्पू विद्यार्थ्यांनाहि असहकारितेच्या राजरोस निमित्तानें शाळेला रामराम ठोकून, स्वावलबनाच्या ऐसपैस थापेबाजीवर आज हिंदूचा बॅड म्हणून जे काहीं पुण्या मुबईत अगम्य लफडें निर्माण करून ठेवण्यात आलें आहे त्यात शिरून पद्धतशीर रीतीनें गावचा उकिरडा फुकत हिंडण्यात मौज वाटतेंच की नाहीं ?

नानाचा तरी त्यात काय दोष होता ? बरोब्बर दीड वर्ष झाल असेल त्या गोष्टीला. शेजारच्या चाळींत कोणीएक पुण्याच्या कॉलेजातला अलगुजफुक्या आला होता. नानाच्या विनवण्याना भीक न घालता बापूनें त्याला ओढून नेले सारी बैठक समाप्त होईपर्यंत भिंतीशी ठेवलेल्या लोडाला टेकून, त्या अलगूज वाजविणाऱ्याच्या डोक्यावर किती पौंड बर्फ ठेवलें असता तो थंड होईल या अभिनव विचारात नाना गर्क होता बैठक सपली नाना आणि बापू घरी जाण्याकरिता उठले. परत घरीं आल्यावर बापू मोठ्या अभिमानानें म्हणाला—

" नाना, महाराष्ट्राचा खरा पुत्र असशील तर तूहि असच काहीतरी करून दाखवशील "

नानाच्या डोक्यात काय आले कुणास ठाऊक ! दुसऱ्या दिवशी सकाळी त्याच्या खोलीतून 'फुई-फुई' ऐकू येऊ लागले. बापूने कानात बोटें घातली

नाना दीड वर्ष कसून मेहनत करीत होता. त्याचा मावसभाऊ बापू त्याला कसून विरोध करीत होता 'मधुकरा'च्या त्या विनोदी कवनापलीकडे अजून नानाची मजल गेली नव्हती. आणि एकदा त गाणें वाजवता आलें, की मग त्या फुकणीला अडगळीची खोली दाखवायला नाना तयार होता जिवतपणी यातना भोगायची शिक्षा म्हणजे नानाचे बासरीवादन असे आता बापू उघड उघड म्हणू लागला होता. पण नानाचा निश्चय कायम होता. त्याचेहि म्हणणे बरावर होते. घेतल खर लचाड पैसे खर्चून, आता त्याचे पैसे वसूल नकोत व्हायला ?

सहभोजनं म्हणून म्हणताच पुण्याचा सनातनी ब्राह्मण जसा दारू न पिताच दारू प्यायलासारखा डोक्याला गुडाळण्यापर्यंत बेताल होतो, किंवा स्त्रीशिक्षणाविषयी थोडीशी साशकता दर्शविताच जसा सुधारकी विद्वान एकाद्या रस्त्यावरच्या गारुड्यासारख्या उलट्यापालट्या उड्या मारू लागतो, अगर

काव्यगायन म्हणून कोणी पुटपुटताच जसा कविराज अंगात संचारल्याप्रमाणें काव्यगायनाचे फायदे पटविण्याकरिता वर्तमानपत्राकडे धाव घेतो, त्याप्रमाणे नानानें मधुकराला फुकणीत बोलवायचा अवकाश, की बापूनें शब्दाचे फवारे आणि हातवाऱ्याची कसरत करायला सुरुवात केलीच म्हणून समजावे. खरच जगात न्याय कसा तो उरलाच नाही !

चार दिवस बापूचे झाले. आता नानाच्या वाट्याचे चार दिवस उगवले होते इतके दिवस, नाना एकाद्या रावबहादुराच्या हातातील बराच वेळ निद्रिस्त असलेल्या त्रिचनापल्लीच्या ज्वलत्पर्वताप्रमाणे धुमसत होता आजपर्यंत यष्टेचें घी पाहणाऱ्या बापूच्या डोळ्याना तो उपहासाचा बगडा दाखविणार होता.

हातातल्या फोटोकडे पाहून नाना स्वत:शीच हसला. सूडाची कल्पनाच मोठी रम्य होती आज सधि आली होती. इतके दिवस दबा धरून बसल्याचे सार्थक झालें होतें हे चोरू का तें चोरू म्हणून विलायती पुस्तकाच्या ढिगा-आड लपणाऱ्या एकाद्या महाराष्ट्राच्या टीकाकारेच्छु गृहस्थाला ज्याप्रमाणें अकस्मात् शोधीत असलेला मजकूर ऐनजिनसी लावायला साण्डावा त्याप्रमाणें नानाला झाले होतें

किंवा शेजारच्या बिऱ्हाडातील लग्नाच्या मुलीची होणारी कीर्ति ऐकून एकाद्या उपवर मुलीची आई तिच्यात खोड काढण्याकरिता टपली असताना ती मुलगी केसाचे फुगे काढते हा शोध लागावा त्याप्रमाणें नानाची स्थिति झाली होती

बाहेरून येणाऱ्या बापूचा पाय वाजताक्षणींच नानानें झटकन् अलगूज तोंडाला लावून एक कर्कश किंकाळी त्यातून बाहेर काढली बापू जोरातच आत आला—

"नान्या, आत्ताच्या आत्ता ती फुकणी फेकून दे पाहू."

नानानें उत्तरादाखल एकवार हसून बापूकडे पाहिले.

' नाना, तुला काय वाटत रे? तू काय स्वत:ला अगदी गोकुळातल्या निर्बुद्ध गाईना जमवून गोठ्याकडे नेणारा भगवान् कृष्ण समजतास का रे? का सबंध श्रोतृवर्गानें पन्नीच्या टाळ्या पिटल्या तरी एकाद्या पहिल्या वर्षातल्या दुधखुळ्या पोरीच्या सहानुभूतिजन्य नेत्रकटाक्षाने थडगार

पडण्याची इच्छा तृप्त करण्यासाठीं कॉलेजातील चढाओढींच्या सामन्यात भाग घेणारा एकादा बावळट कॉलेजवीर समजतोस आपल्याला? का वाट-खर्चीकरता म्हणून पावा वाजवीत जाणाऱ्या गोल्डस्मिथचा भाऊ समजतोस तू आपल्याला? तसा जर तुझा समज झाला असेल तर माझ मत थोडस ऐकून घे माझ म्हणण आहे आणि ते सुद्धा अगदी स्पष्ट आहे, कीं तू एक महा-मूर्ख आहेस. तुला काहीसुद्धा वाजवता येत नाहीं इतकच काय, परतु सात जन्म जरी प्रयत्न केलास तरीसुद्धा येणार नाही. लग्नमुजींत सगळ्या मिरव-णुकीच्या पुढे गोड्याची टोपी घालून उगीच काहीतरी वाजवीत लोकाच्या कानावर अत्याचार करणाऱ्या दीडदमडीच्या बेडबाजावाल्यापेक्षा तुला एक ओळ सुद्धा जास्त वाजवता येत नाही कळली तुझी किमत आता तरी?"

"बापूसाहेब, खाली बसा असे उभे राहून बोलू लागलात, की मला हिटलरची आठवण होते. तुम्ही आत्ता जे स्पष्टपण मला सागितलत तसच जर जगात एका माणसान दुसऱ्या माणसाला सागितल आणि मौज ही, की तें त्याला पटल तर किती सोप काम होईल? डॉक्टरन रोग्याला त्याच्या-विषयींच आपल स्पष्ट मत कळवल, आणि रोग्यान आपल डॉक्टरविषयीच मत त्या डॉक्टरला स्पष्ट कळवल, तर मला वाटत त्याची चालू नाती एकदम तुटून 'दोन खुनी' या नवीन काव्यपूर्ण नावानच पुढील मजकूर एकाद्या चटकदार दीडदमडीच्या वर्तमानपत्रात वाचायला मिळेल. ऑफिसातल्या जोडे ठेवायच्या कोपऱ्याशेजारच्या स्टुलावर बसून भकास चेहऱ्यान कॉन्ट्रॅ-क्टरची आलेली बिल तपासण्याच्या रम्य उद्योगात गर्क झालेल्या आजच्या एकाद्या बी ए. (ऑनर्स) हगामी कारकुनान जर य:कश्चित् साठ रुपये किंमतीच्या फिरत्या खुर्चीवर ताटकळत बसून, तासाला दोन सह्या ह्या झाल्याच पाहिजेत अशा करारान हाताखालील कारकुनाना कर्तव्याच्या कठोरतेची वेळोवेळी जाणीव करून देऊ पाहणाऱ्या आपल्या वरिष्ठ अमल-दारास जर आपल त्याच्याविषयींच मत कळविल आणि वरिष्ठान त्या कारकुनाला बी ए. (ऑनर्स) पक्षाविषयीं आपल मत कळवल तर हपिसाचा आखाडा व्हायला कितीसा वेळ लागेल? केवळ नाटकात काम करू लागली याच मुद्द्यावर कुलीनपणाचा बकवा करू पाहणाऱ्या एकाद्या नाटक कपनीं-तील मुख्य स्त्रीनटीविषयीं आपल मत जर उद्या एकादा त्या कपनीचा

व्यवस्थापक जाहीर रीतीन व्यक्त करू लागला आणि त्या नटीनहि नाटक कपनींत स्त्रिया येण्याकरिता व आल्या तर कायम राहण्याकरिता सबध कपनीचा जुना बाजार माड् पाहणाऱ्या व्यवस्थापकाविषयीं आपल मत त्याला कळविल तर स्त्रियानी रगभूमीवर काम करावींत किंवा नाहीं या उपद्यापी प्रश्नाचा चुटकीसरसा निकाल लागेल जेवताना प्रेम, हात धुताना प्रेम, अशा प्रकारें मिनिटा मिनिटाला घड्याळी प्रेम व्यक्त करणाऱ्या रसिक नवरदेवान चार वर्षांच्या अवधीनतर जर आपल मत आपल्या पत्नीला ऐकवल आणि त्याच सुमाराला त्याच्या पत्नीनहि उलट आहेर केला तर कोण कुणाच्या मार्गातील धोंड आहे या प्रश्नावर एकाद्या चार भिंतीच्या थिएटरात तावा-तावाचे वादविवाद न होता मोकाट पसरलेल्या पानपतच्या रणक्षेत्रावर पुन्हा एकाद भारतीय युद्ध सुरू होईल आणखी चार जोडया तुला विचार करायला देतो. लेखक-सपादक आचारी, पाणकी आणि यजमान जी. आय्. पी. रेल्वेचा तिकिट कलेक्टर आणि कॉलेजचा विद्यार्थी—इत्यादि

परतु माझ्या बाबतीत तस नाही. माझ्याविषयींच तुझ मत मी शात-पणान ऐकून घेईन आणि उत्तरादाखल—"

म्हणून म्हणत नानानें पुन्हा एक मोडकी-तोडकी ताण घेतली

" नान्या, तुला ताल नाही अन् तान नाही बाकी सर्व काही येत आहे. मूर्खा, मघापासून मी ओरडतो आहें अन् तुझ आपल चालूच वर मला वसतव्याख्यानमाला ऐकवतो आहेस--" बापूने नानाचें अलगूज धरले

" लाबून—लाबून दुरून बोल— '

" सात जन्मीचा सूडकरी आहेस." बापू चिडून म्हणाला.

" अस्स ? अजून आजीबाईसारखी बोट मोडली नाहीस माझ्या नावान ? " नाना हसू लागला.

" काय करू रे ? " बापू चिडून म्हणाला

" काय करतोस ? काही करू नकोस. गाडीखाली उडया टाकून प्राण देण्याच्या कल्पना आता तितक्याशा रोमहर्षक वाटत नाहील. तू जर तस केलस तर एक बैल नाहीसा झाला, आता राहिलेल कुरण आपलच या कल्पनेन मला आनद वाटेल, पण भीति हीच, कीं तू तस काही करणार नाहीस तेव्हा आता मुकाट्यान कोट काढ. कमळी गेली आहे चौपाटीवर समुद्राची शोभा

चाखायला खाडेकराच्या कुठल्याशा गोष्टीत तिन मावळत्या सूर्याच अन् लाजत मुरकत पडद्याआडून डोकावणाऱ्या तारकाच वर्णन वाचल आहे वाटत. तेव्हा प्रत्यक्ष अनुभव काय असतो तें पाह्यला ती गेली आहे अण्णाना अजून फायलींतून सुटका व्हायला तब्बल एक तास अवकाश आहे. अन् आई गेली आहे ठाकुरद्वारावर माझ्याकरिता तिन ऐकलेल्या एका स्थळाबद्दल चौकशी करायला. तेव्हा राज्य आपल आहे आत जा—स्टो पेटव, फर्मास चहा कर दोन कप जणू काय मी तुझा लॉर्ड अन् तू माझा जन्टलमन व्हॅलेट–अ ?"

"सपल तुझ? आता माझ ऐक! तें अलगूज माझ्या ताब्यात दे. मुकाट्यान उठून तूच चहा कर जणू काय मी लॉर्ड—"

"अडल नाही माझ" नाना पायाची जुडी करून समोरच्या भिंतीला टेकवीत म्हणाला

"अन् माझी तरी काय घाई आहे? येतील तुमच्या भगिनी कमळाताई अन् देतील चहा करून तोंपर्यंत बसा तसेच—" अगातला कोट काढून खुंटाळ्याला अडकवीत बापू म्हणाला!

"अच्छा! आपकी मर्जी!" म्हणून म्हणत नानानें अलगुजाला हात घातला. आता मात्र बापू उसळला!

"नाना, तुझ्या हातापाया पडून सागितल, रागान सागून पाह्यल, तरी तू चेकाळल्यासारखच दिवसेंदिवस करू लागला आहेस. काकाच्या म्हणण्याप्रमाण पुण्यालाच राहिलों असतो तर— पण तुझ्या म्हणण्याला मूर्खासारखा हो म्हणून आलों मुबईला तीन वर्ष तुझा त्रास सोसला आता पुढच्या वर्षी सीनिअरकरता मी आपला पुण्यालाच स्वत.च्या घरीं जातो."

'अजून अवकाश आहे ही धमकी द्यायला. तोंपर्यंत तूर्त चहा करतोस का—?"

"हात जोडतों. आपल वाद्य जरा बाजूला ठेवा. स्वावलबनाचे धडे शिकविण्याकरिता एम्. ए., एल्‌एल्.बी. झालेल्या तरुणाकडून कोणत्याशा कादबरीकारान त्याला स्टेशनवर हमालीचा धदा करायला लावल होत तो धदा पत्करतों—पण तें वाद्य—" बापू कळवळ्याने म्हणाला.

"अश्शी! आता कशी? लकडीशिवाय मकडी वळत नाहीं म्हणतात तेच खर. तरवटाची काटकी दाखविल्याशिवाय कोणता टोणगा दगडानें

भरलेली गाडी ओढील, बाबा? ऊठ बाळा—, दुडदुड धावत जाऊन तेवढं आधण ठेव. तोपर्यंत दीड तासात भरपूर कटाळा आणणाऱ्या अभिनव नाटिका संप्रदायात रंगविलेल्या सुशिक्षित स्त्रीप्रमाण या खुर्चीवर निर्लज्जासारखा बसून हा फोटो लक्षपूर्वक पाहतो—" फोटो बाहेर काढून नाना म्हणाला

"कुणाचा रे फोटो?" दारातच थबकून बापूने म्हटले.

"तुझ्या बायकोचा! ह. ह. हः ह. ! का—लाजलास कीं नाही?" नाना म्हणाला

"कुठल्या देशाची नागकन्या?" बापू नानाची थट्टा करण्याकरता म्हणून म्हणाला.

"मनुष्यकन्याच आहे आणि आपल्याकरता म्हणून आपल्या पितृदेवानी—काकानीं— ह्या फोटोसमवेत हें एक शिफारसवजा पत्र पाठवल आहे—"

' पाहू— पाहू—"

"उतावळा कॉलेजवीर चालला पातळाची चौकशी करायला! मुलगी ठरायला का पत्ता नसेना. तिला कोणत्या गुलगुलीत नावान हाक मारावी याची आधीं चर्चा! पाहिला फोटो, लागला हक्क दाखवायला. बापू, या फोटोवर तुझा जितका हक्क आहे तितकाच माझाहि आहे. माझ्या कलान घेतलस तर दाखवीन पण उगीचच्या उगीच अनुल्लेखान मारतो, किंवा लेख लिहून तुमच पत्र बद पाडतो असा राणा भीमदेवी थाट करायचा असेल तर माझ एक उत्तर समजल? हा स्टो. ही पिन. हे पाणी. बसा खालीं. मम म्हणा अन् मुकाट्यान माडी घाला. काही धोतर मळत नाही." बापूच्या पुढें फतकाला घालून नाना म्हणाला बापू मुकाट्यानें सांगितलेले काम करीत होता.

"बापू—" नानानें सुरुवात केली.

"नाना—" सतापारितेकानें बापूला पुढें रेटवेना.

"हतभागी प्राण्या, उद्या तुझ लग्न होणार. उद्या तू आपल्या मित्रातून उठून कायमचा मडळींना धरून बसणार. खानदेश वगैरे भागात ज्याप्रमाण एकाद्या भाकड म्हशीच्या बरोबरीन बैलाला गाडीला जुपतात त्याप्रमाण तूहि एकाद्या जोडीदारणीबरोबर ससाराच्या या विचित्र गाडीला जुपला जाणार. आणि मग माझ कस होणार? बापू, अजून माग घे. वेड्या, विवाहित

आयुष्य आणि तत्पूर्वीच आयुष्य यात एक धगधगीत अग्निरेषा आहे. एकदा ओलांडलीस म्हणजे मुक्त किंवा पशू—बहुतेक दुसराच खरा! अन् मग, दर रविवार-बुधवार उतास येणाऱ्या अमेरिकन नटीच्या सौंदर्याची आबट चिकित्सा कोण करील? कोपऱ्याकोपऱ्यावरून फडकणारी इंद्रधनुष्याच्या रंगांची चित्रविचित्र फडकी आता कोण बर रसिकतेन न्याहाळून पाहील? ब्रह्मदेवाच्या अक्कलेविषयी वादविवाद आता कोण घालील? एखाद्या प्रौढा आणि ऐसपैस वाढत जाणाऱ्या कुमारिकेला पाहून चिंच खाल्ल्याप्रमाण कोण तोंड वेडवाकड करील? असल भरमसाट बेहद्द धावणाऱ्या मोटारीच कल्पनारम्य चित्र दृष्टीआड करून, रुळावरून जाणाऱ्या बार्शी लाइट रेलवेचा का तुला मोह पडावा?—" नानानें भाषणास सुरुवात तर खूप आवेशात केली होती, पण त्याचा शेवट तिमजली हसण्यात झाला

"नाना, पुण्याला जाण्याच्यापूर्वी मी अण्णाना एक सल्ला देऊन ठेवणार आहे, की तुला वकील वगैरे करण्याच्या भानगडीत न पडता एकादी कंपनी काढून तीत मासिकाच्या संपादकाची जागा तुला द्यावी" बापू साखर काढीत म्हणाला

"मात्र कंपनी लिमिटेड असावी, आणि इतर डायरेक्टर्सहि कमींत कमी चारशे मैल दूर असले पाहिजेत" नाना म्हणाला.

चहापान झाले मोरीत तशीच भांडी ढकलून देऊन दोघेहि बाहेरच्या खोलीत आले.

"ढोसलास एकदाचा चहा—"

"ढोसला बर, बाबा!" नाना म्हणाला.

"दहा मारून एक मोजावीशी वाटते—"

"मग वाट का पाहता?" नाना हसून म्हणाला.

"नाना, विषयान्तर करून तो फोटो दाखवायचं टाळतो आहेस—"

"अरे हो, हो! जरा दमान घेशील की नाही? हें इंडिअन आर्टचं नमुनेदार चित्र- प्रथम बहिणाबाई कमूताई, नंतर स्वतःच्या मुलाच्या लग्नाकरिता आतुर झालेली माझी आई आणि नंतर स्वतःच्या मुलाच्या लग्नाविषयी घरात गोष्टी निघाल्या असता पुण्याचें सकाळ वर्तमानपत्र

तोंडापुढें धरण्याचें सुद्धा धाडस करणारे माझे वडील–अण्णा–अशा या सर्वांना दाखवतो. नतर तू—"

इतक्यात जिन्यात बाहेरून आलेल्या कमलाताईचा चिरपरिचित पदरव ऐकू येताच नानानें तोंडापुढें टेंपेस्ट नाटक धरलें

"नाना, माझ्या ट्रंकेला कुणी हात लावला ?" कमूताई फुस्फुस् करीतच घरात आल्या.

"आला होता एक बागुलबुवा." नाना तिच्याकडे न पाहता म्हणाला

"तुला शभरदा सांगितल ना, कीं माझ्या ट्रकेला हात लावीत जाऊ नकोस म्हणून आईऽआईऽऽ—"

"बापू, धाव–अडव त्या महामायेला पधरा वर्षांची घोडी झाली तरी जरा कुठ खुट् झाल कीं 'आई—.' ए म्हसोबा, ऊठ ना !" नाना स्वतःच उठला. परंतु आई घरात नसल्यामुळें कमूताईच पुन्हा बाहेर आल्या

"तू माझ्या ट्रकेला का हात लावलास ? तू कोण ? का लावलास ?" प्रत्येक प्रश्नागणिक नानाला गदगदा हलवीत कमूताई सतापाने म्हणाली

"अग पण हें काय ? पारिजातकाच झाड हालवून ज्याप्रमाण फुल पाडतात त्याप्रमाण मला हलवून का कुठ तुला उत्तर मिळणार आहेत ? अन् हे बघ जास्त गडबड करशील तर—"

"तर—? तर काय करणार आहेस रे तू, नकट्या ?" कमूताई हट्टाला पेटून म्हणाली.

"तर काय करणार ? काही करणार नाही अग, बायकांना चापट्या अन् टिचक्या मारण्याइतका रसिकपणा माझ्या अगात येणार तरी कोठून ? त्यातून तू पडलीस बहीण. जा तुला जीवदान देतो आहे"

"आऽऽऽ हाऽऽऽऽ ! ओवाळा– दिवे ओवाळा ! करून-सवरून वर ही सफाई तू पुन्हा तर माझ्या वाटे जा, मग बघ काय करीन तें. अन् माझ रीडर कशाला घेतल होतस ? थाब आई येऊ दे. सग्गळ सागतें तिला—"

"साग बर. सग्गळ साग. चल चालती हो इथून. त्या आज वाचलेल्या कोट्या पाठ कर जा—"

नानाच्या पुढें तोडाचा सुरकुतलेला चिकू करूनच कमूताई तेथून पसार झाली.

" हृ बापूसाहेब, आपली रसवती आता थयथय नाचू द्या."

" बाबा, तुझ्याशी बोलण म्हणजे दगडाशीं बोलण्यासारखच आहे!" बापू तोंड आबट करून म्हणाला.

" आता तू एकाद्या फुरशासारखा उडी घेणार बहुतेक हा घे फोटो. पण मला लग्नाला बोलावल पाहिजे या अटीवर देतों अ ! पुण्याला जाण्यायेण्याच भाड दिल पाहिजे, आणि तिथला सोडा-लिंबूचा खर्चहि दिला पाहिजे "

बराच वेळ गाजलेला फोटो नानानें बापूच्या हातात दिला. बापूनें त्याकडे पाहिलें मात्र—!

" अरे ! हे कुणाच चित्र ?" घोगऱ्या आवाजात बापू ओरडला.

" सागितल न, की ती इडिअन् आर्ट आहे म्हणून." नाना हसत म्हणाला.

" नाना– हा विवाह होणार नाहीं " बापू निश्चयाच्या सुरानें म्हणाला.

" मी म्हणतों होणार—" नाना तितक्याच जोराने म्हणाला.

" बिलकुल नाही. मी काकाना पत्र लिहून कळवतों, कीं ही वधू मला पसत नाहीं—" खुर्चीवरून उठून आवेशानें बापू खोलींतल्या खोलींत येरझारा घालू लागला

" अहो शेखमहमद, हें पत्र वाचा तुमच्या तीर्थरूपाच ! " नानानें पत्र पुढें करून म्हटलें.

बापूने पत्र वाचून कपाळाला हात लावण्याचेंच काय तें बाकी ठेवलें.

" काय आहे पत्रात ?" नानानें गभीर मुद्रेनें प्रश्न केला.

" तू वाचल नाहींसच ?" बापूनें खोंचून प्रश्नात्मक उत्तर केलें

" मी कॉलेजातला विद्यार्थी असलों तरी लोकाची पत्र वाचू नयेत येवढ ज्ञान मला आहे " नाना म्हणाला.

" नाना, अरे—ही मुलगी आहे का सोंग आहे हें बघ, पायात साखळ्या—!" बापू फोटोकडे पाहत म्हणाला.

" वाः ! कमरेचा घाट सुबक दिसावा म्हणून पायात काहींतरी वजन असाव असच कोणीहि म्हातारा तुला सागेल."

" अन् सोलापुरी बाडाच हें धडोत—" नानाकडे दुर्लक्ष करून बापू स्वतशींच पुटपुटला.

" तलम सुताचीं झिरझिरीत पातळवजा फडकीं गुडाळून घरच्या पुरुषाची

अब्रू वेशीवर टांगणाऱ्या आमच्या कमूताईपेक्षा हें शतपटीन बर. पूर्वी तर झाडाच्या सालीचीं पातळ करीत असत अस मीं ऐकलेल आहे—"

"गप रे बुवा! अन् हे दागिने महाराष्ट्रसरस्वतीच्या कंठात आजकाल प्रसिद्ध होणाऱ्या लघुकथाच्या पुस्तकाची बेगडी माळ अडकवली तर ती या दागिन्याच्यापेक्षा कमीच लायकीची भरेल—" बापू नाक मुरडून म्हणाला

"कनक अन् कान्ता. दुहेरी संगम आहे हा! मारपीट सीरिअलच्या शेवटच्या प्रकरणातला हीरो होशील तू!"

"अन् कोण ह्या केसाच्या झिंज्या? शुद्ध मारवाडीण आहे." बापू म्हणाला.

"शुद्ध विलायतीण म्हण! गावाबाहेर बंगल्याबंगल्यातून राहणारी बडी बडी मंडळी आपल्या 'बाबालोगाना' असच करायला लावतात. ह्यालाच 'बॉब' म्हणतात" नाना हसून म्हणाला.

"नाना, काकानी सर्व काही ठरवल्यासारख दिसत आहे फक्त माझ्या मनाला दुखवायचच नाही म्हणून हें चित्र माझ्याकडे धाडून दिल आहे—नाना हसू नकोस. गंभीर हो काकाना पत्र लिही, कीं बापू लग्नाला तयार नाही. आजन्म ब्रह्मचारी राहून देशसेवा करण्याच व्रत स्वीकारायच त्यानं ठरवल आहे." बापू गंभीरपणे म्हणाला

"देशसेवेच व्रत? देशसेवेच व्रत आचरायला १९२० आणि १९३० या दोन असहकारितेच्या वावटळीमधें जपानी खादी कॉंग्रेसच्या नावावर राजरोसपणें खेड्यापाड्यातून विकून थकलेला-भागलेला तू एकादा गुजराथी व्यापारी नाहींस. पोराबाळाच्या नावान लाखो रुपयाची इस्टेट साचवून चार दिवस हवा पालटण्याकरिता म्हणून माथेरानला न जाता येरवड्याला 'अ' वर्गाचा कैदी म्हणून राहलेला तू गुजराथी तरुण नाहीस हें लक्षात ठेव महाराष्ट्रान ज्या ज्या वेळला देशसेवा केली त्या त्या वेळेला थप्पड खाल्ली आहे. आणि हें बघ विवाह करून आपण एक प्रकारें देशसेवाच नाही का करीत?" नाना म्हणाला.

"नाना, मघाशीं तू हक्काबद्दल कायसस म्हणालास, आठवतय्? तुझ्या म्हणण्याप्रमाण ह्या फोटोवरचा तुझा हक्क मला कबूल आहे. मुलीवर सुद्धा मी पाणी सोडायला तयार आहे." बापू शून्य मुद्रेनें हसून म्हणाला

"नको. बापूसाहेब, तुम्ही स्वार्थत्याग करायला तयार व्हाव हे आपल्या मोठेपणास साजेसच आहे परतु त्या स्वार्थत्यागाचा स्वीकार न करण यातच माझा मोठेपणा आहे मनुष्यान धातूच्या देवाकरिता चमचाभर दुधाचा स्वार्थत्याग करायला तयार व्हाव हे ठीक आहे पण तो त्यानी उद्या खरो-खरीच स्वीकारायच मनात आणल तर हॉटेलातून 'पावणा' कप मिळण कठीण होईल याची काय वाट—?"

"पण नाना, या मुलीशी मी विवाह कसा करू? काकाशी भाडलो तर—?" बापू म्हणाला

"त्यापेक्षा वाऱ्याशी भाड ते सोप आहे हें बघ बापू, तू माझ्यावर विसबून राहा तू बिनघोर झोपा काढ."

"पण तुझ्यावर विश्वास ठेवावा तर जगातील नाटक कपनीतील मॅनेजर, मुख्य नट आणि नटी, रेल्वे कारकून, लघुकथालेखक, इत्यादि प्राण्यावर एक-वेळ विश्वास ठेवण परवडेल, पण तुझी मला खात्री देता येत नाही—"

"पहा बुवा! प्रेमान प्रेम वाढत, एका सिगारेटन दुसरी सिगारेट पेटते अस कालच माझा एक मित्र म्हणत होता. तसच विश्वासान विश्वास वाढायला काय हरकत आहे?"

नानाचें वाक्य पुरे होण्याच्या आतच कमूताई हातात एक बाटली घेऊन आली

"नानिटल्या, माझ्या तेलाची बाटलीसुद्धा तुला पाहवली नाहीं? माझ्या ट्रकेशी तुझ काय काम होत साग? तुझ्या पुस्तकाला नुसता हात लावायचा अवकाश, कीं आकाशपाताळ एक करून सोडतोस. दुष्ट कुठचा—"

"कमे, थोडक्याच दिवसात तुझी माझ्या कटकटीपासून मुक्तता होणार आहे. तोंपर्यंत—" म्हणून म्हणत नाना तिच्या दडाला धरून तिला आत ढकलू लागला. कमूताईनें झटक्यासरशी आपला हात सोडवून घेतला.

"इथ्थ उभी राहणार! तू कोण मला जा म्हणून सागणार?"

"आता जातेस—का दाखवू सूर्याची पिल्ल—?"

"त्या बाता पुरे ह, रावसाहेब! मागच्या मे महिन्यात पुण्याला लाठी-

क्लासात मीं नाव घातलं होत बर का ?" कमूताई मोठ्या आभिमानानें म्हणाली. नाना मोठयानें हसला. कमूताई पाय आपटीतच घरात गेली.

* * *

अभिनव म्हणून ओळखल्या जाणाऱ्या कादबऱ्यातून वर्णन केलेल्या पितापुत्राच्या भेटीच्या वेळचे सवाद पाठ करूनसुद्धा उपयोगात आणण्याची बापूची धमक नव्हती. वडील माणसाशी होणारे त्याचे सवाद बहुतेक स्वगतच उरकून घेतल्यासारखे होत असत थोडक्यात सागायचें म्हणजे वारवार भेटीचे आणि सभाषणाचे प्रसग नकोत म्हणूनच बापू वडिलापासून दूर राहिला होता मनोविश्लेषणाच्या नाजुक धाग्याने खेचून आवळलेल्या एकाद्या नीरस लघुकथेंतल्या बालनायकाप्रमाणें जगातल्या महान् तत्त्ववेत्त्यालाहि एकदम पौंडभर बर्फ डोक्यावर ठेवण्यास लावणारा सूचक प्रश्न एकदाच लहानपणीं बापूनें वडिलास केला होता.

"काका, तुमच्या पगडीचा तुरा खेळायला घेतला तर काय होईल ?" हाच त्या बाल-बापूचा विलक्षण प्रश्न होता. एरवीं लघुकथेंत या प्रश्नाचें उत्तर फारच निराळ्या तऱ्हेनें आले असतें. दीड पानाच्या लघुकथेतला बाप पोरास मोठ्या गभीरतेनें जवळ ओढून सद्गदित कठाने म्हणाला असता, 'बाळा रे ! जगामध्यें असले प्रकार हरहमेश चाललेले असतात साहेबाला कारकुनाच्या पगडीचा तुरा कसा सहन होईल ? मनुष्यप्राणी आपआपल्या कुवतीप्रमाणें हा मानाचा तुरा हस्तगत करण्याकरता हें जगाचे वाळवट सदोदित तुडवीत– तहान नाही, भूक नाहीं अशा ससभ्रम स्थितीत– पुढें पुढें जात आहे. शेवटीं त्याला कळून चुकते, की हा तुरा खरोखरीचा नसून तो एक आभास आहे सत्य केव्हाहि कठोरच असतें. त्या कठोर प्रहारामुळें मनुष्य बावरतो, घोटाळतो आणि शेवटीं खाली पडतो. बाळा, पुन्हा हा तुरा मागणार नाहींस ना ?' असें म्हणून तो बाप कालच साहेबाच्या खाल्लेल्या गरगरीत शिव्या आठवून स्फुदून स्फुदून रडू लागतो. परतु सत्यसृष्टीतल्या बापूच्या काकानें हाताच्या पाच बोटानीं त्या प्रश्नाचे मुद्देसूद उत्तर त्याला पटवून दिलेलें त्याला पूर्णपणें आठवत होतें त्या दिवसापासून कोणताहि आणि कसलाहि गूढगुजनात्मक प्रश्न वडिलास विचारण्याचा बापूस धीर झाला नाहीं.

प्रवाहपतित होण्यातच शहाणपणा आहे हें जाणून बापू स्वस्थ बसला.

आणि नाना—?

*　　　*　　　*

मागील प्रसगाला आज जवळजवळ आठ दिवस होत आले होते येवढ्या अवधींत नानाचा रोजचा कार्यक्रम म्हणजे पत्रें लिहिणें व ती स्वतः पोस्टात नेऊन टाकणे.

आठवडा झाला तरी काकाकडून पुढची 'आरडर' आली नव्हती. तेव्हां लग्नाचा विचार तूर्त रहित करण्यात आला असावा असा आशाजनक विचार बापूच्या डोक्यात येऊ लागला.

आणि एके दिवशीं सकाळीं सहाच्या सुमारास—की ज्या वेळीं सूर्यनारायण सुद्धां अधाराचा रग पाघरून आकाशाच्या किर्लोस्करी खाटेवर त्यात जमलेल्या ढेंकणासहवर्तमान खुशाल घोरत पडला होता त्या वेळी, प्रत्यक्ष काकाच फटक् फटक् जोडा वाजवीत घरात शिरलेले बापूनें एक डोळा अर्धवट मिटलेल्या स्थितींत पडल्या पडल्याच पाहिले तेव्हा त्याला धक्काच बसला.

"काय रे नाना, अजून उठला नाहीत ?" जोडा कोपऱ्यात ठेवून कोटाच्या गुड्याची मालिका सोडवीत काका म्हणाले.

"मुबईची हवा ही, काका! रात्रीं उकडल्यामुळे झोप येत नाहीं, तर सकाळी पुण्याचे पाव्हणे येऊन झोप घेऊ देत नाहीत"

नाना उशीचा लोडासारखा उपयोग करून म्हणाला.

"अण्णा उठले नाहीत म्हणून तर नानाची झोप चालू होती." बापूने हव्च सूड उगवून घेतला

थोड्या वेळानें सर्व मडळी चहाकरिता आतल्या खोलींत जमली. हवा-पण्याचे नित्याचेच मामुली प्रश्न झाल्यावर काकानीं डुकराचें पिलू पोतडीतून बहेर काढले.

"अण्णा, पोराच लग्न कराव म्हणतों यदा—"

बापूला ज्ञ्ऱ्राचा ठसका लागला, नाना हसू लागला, कमूताईनें मोठ्या आदराने बापूकडे पाहिले

"इतक्यातच का घाई करता? अजून पोरवय आहे त्याच, त्यातून परीक्षा वगैरे होऊ द्या. एकदा मुल ससाराला लागली, कीं मग अभ्यासाची

आशाच नको काय ग, असच की नाही—?" शेवटचें वाक्य अण्णासाहेब आपल्या पत्नीला उद्देशून म्हणाले मनुष्य अनुभवाशिवाय बोलत नसतो.

"नाही हो काका, तुम्ही काय ऐकता? मी तर म्हणते नाही झाला अभ्यास म्हणून काहीं पुस्तक फाटून जात नाहीत परीक्षा-परीक्षा ती काय मेली? होईल आज नाहीतर उद्या हें अस्सच आमच्या नानाच्या बाबतीत चालल आहे दोन वर्षं मी पाठीमागे लागलें आहे, पण लग्नाची गोष्ट काढली, की कानात खुट्या घातल्यासारखच करायच" नानाची आई म्हणाली

"जग, पण लग्न माझ का करायच्च आहे आता? तुझा पोरगा तयार आहे का? विचार त्याला" अण्णानी हसून म्हटले

"आई, जाऊ दे ग अण्णाच्याच मनात नाही माझ लग्न करण्याच त्याला तू तरी काय करणार?" चहाच्या किटलीशी खेळत मोठ्या विनम्रतेनें नाना म्हणाला

"चल, चहाटळ मेला! बापलेक दोघहि एकाच माळेचे मीच काय पाप केल होत म्हणून तुमच्यात येऊन पडलें—" नानाच्या हातातली किटली रागानें हिसकावून आईसाहेब म्हणाल्या

"बर का अण्णा, मुलगी नक्षत्रासारखी आहे बर का—" काकानी आपलें तुणतुणे पुढे केलें

"नक्षत्र? मी फोटो पाहिल्याबरोबरच बापूची पाठ थोपटली" नाना हसें दाबून म्हणाला.

"आणि तुमच्या नानान आमच्या बापूला तयार केलेला दिसतो मला वाटल होत, कीं बापू थोडीशी कुरकूर करील लग्नाच्या वेळेला कुरकूर केली नाहीं तर तो आधुनिक तरुण कसला? पण नानाची चार-पाच पत्र आलेलीं पाहताच म्हटल बर झाल! शेवटी आधुनिक तरुणाप्रमाणच हा लग्नाचा विचारान खूप झालेला दिसतो—" काका म्हणाले

"नानान पत्र धाडली?" बापू एकदम स्फोट झाल्याप्रमाणें होऊन म्हणाला.

"छे. छेः! बापू, त्यात येवढ कौतुक करण्यासारख मीं काय केल ब? तू मला सागितल्याप्रमाण पत्र लिहून जर मीं वडील माणसाना तुझी पत्नी

कळवली नसती तरच मी अपराधी ठरलों असतो. तुझा अगदीं आग्रहच असेल, तर करतो कबूल मी, कीं थोडासा उपकार होतो आहे ह्याच्यात पण विचार कर, कीं लग्नाच्या बाबतींत जर असा घुमेपणा धारण केला तर लहानाच्या पसत्या थोराना कशा कळाव्या? उपकाराच ओझच वाटत असेल तर माझ्या वेळेला तू मला मदत कर झाल?" नाना म्हणाला.

"नाना, पण मी—" बापू आश्चर्यानें थक्कच झाला

"तुला सागितल ना? जाऊ दे आता—" नाना त्याला अडवून मध्येंच म्हणाला

"लग्न आहे अजून आठ दिवसानीं, तेव्हा तुम्ही, वहिनी, नाना आणि कमळी सगळ्यानीं अगदी उद्यापासूनच आल पाहिजे मी मुद्दाम पुण्याहून तुम्हाला न्यायला आलों आहे तुमच्या रजेची सबब चालणार नाही. माझ एवढच कार्य आहे—" अण्णाना उद्देशून काका म्हणाले.

"अरेच्या! पण साहेबाला विचारायला नको का? बाकीच्याच्याविषयी म्हणाल तर आत्ताच हाकलून देऊ का घराबाहेर?" अण्णासाहेब उठून म्हणाले

"पडत्या फळाची आज्ञा! नानाची आई, बाधाबाधी करा दुपारच्या गाडीन आपण बाकीचे लोक पुढ पसार होऊ हा सत्तेचा गुलाम मागाहून का येईना" काका बाहेर जाता जाता म्हणाले

"बापू, शेवटीं शिकार मारलीसच अ? काय तुझ्या आईचा थाट विचारावा, महाराजा! शिव्या द्यायला अन् डागायला हाताखालीं सून मिळणार!" नाना आपल्या आईकडे छद्मीपणानें पाहून हसला

"ह्या नान्याला बाहेर बोलवायच होत जरा—" नानाची आई मोठ्यानें म्हणाली. अर्थात् हें अण्णाना आमत्रण होतें हें उघडच आहे कमूताईलाहि अवसान चढलें

"अण्णा—अहो अण्णा—नाना कनई घरात त्रास देतो आहे पहा आईला" ती लाडिकपणानें तारस्वरात ओरडली.

"अच्च्य! अन् तू अगदी छोनुल बाळच कीं नाहीं बोबड बोलायला" म्हणून म्हणत तिच्या मानेवरच्या शेपट्याचा घोड्याच्या लगामासारखा एकवार उपयोग करून नाना बाहेर पळतच गेला

"आईऽऽ, बघ कीं ग—" कमूताईनें म्हटलें

*            *            *

होता होता अखेरीस पुण्यातल्या चार वेदोनारायण म्हणून गणल्या जाणाऱ्या, चार पिचकारीबहाद्दर ब्राह्मणी पोपटासमक्ष, देवघरातल्या देवासमक्ष, सबध पुण्यातल्या धेंडासमक्ष, मायमाउलीच्या समक्ष, गोळात उभा राहून संध्याकाळीं हॉटेलात उडवायला मिळावें म्हणून पैपैसा दक्षिणा मागणाऱ्या चार उडाणटप्पू कारट्याच्या समक्ष, तोंडात विडी आणि हातात एक दडुकणें घेऊन ढोल बडविणाऱ्या दाढीवाल्या बोकटासमक्ष, बापू खरोखरीच चतुर्भुज झाला

'वाजवा रे वाजवा' म्हणून पिढीजात बाळभटानें आपल्या दंतविहीन लाउडस्पीकरमधून गगनभेदी आरोळी ठोकताच, अंतरपाट दूर झाला, बापूनें डोळे मिटून समोर उभ्या असलेल्या नक्षत्राच्या गळयात एका पैशाला आणलेल्या फुलाची दीडवीत लांबीची माळ अदमासानें अडकवून दिली मुलीनें चोरून आपल्या पतिराजाच्या चेहऱ्याकडे पाहिलें उलट सवाल न मिळाल्यामुळें ती जरा हिरमुष्टीच झाली जन्मभर दृष्टादृष्टच होऊ नये म्हणून धडपडणाऱ्या जोडप्यानाहि ही पहिली दृष्टादृष्ट केंव्हाहि हवीशीच वाटते

सबध आळींतल्या बायाबापड्याना कळलें, की बापूच्या आईला घरात कामाला सून आली विरहीगीतें खरडण्याकरिताच केवळ जगण्याची धडपड करणारी आळींतली आबटशोकी कविमंडळी आता बेइरकारपणानें खोलींत बसून लाघून प्रेम करण्यास योग्य असलेली एक कुमारी अखेरीस प्रवाहपतितच झाली याबद्दल हळहळू लागली नानाच्या आईनें कुणाला दिसू नये म्हणून पदरानें डोळे पुसले मोठ्या एका जबाबदारीच्या कर्तव्यातून पार पडल्याचा निदर्शक असा एक दीर्घ श्वास काकानी सोडला, बापूच्या आईला पोराविषयींचें प्रेम पोटात मावेना, म्हणूनच कीं'काय डोळयावाटे अश्रूंच्या रूपानें त्याला मोकळें करून द्यावें लागलें

दिवाणखान्यात इतरेजनाबरोबर लोडाशीं टेकून बसलेले 'अण्णासाहेब पुढ्यात पडलेले तांदुळाचे दाणे चौफेर फेंकून देऊन आता येथून सुटका कशी करून घ्यावी याचा विचार करू लागले

आणि— कमळीचा कोण थाट! जिलबीची वेणी, त्यावर शंभरदा

नानाच्या हातापाया पडून आणवलेला सुकलेल्या फुलाचा गजरा, जावईबुवाच्या बरोबरीनें आपल्याहि डोळयाना फासलेलें काजळ, कुकवावर कुकू लावून लालच लाल झालेलें कपाळ—, थाट होता पोरीचा! अगदीं जरीच्या पातळा-शिवाय करवली हातात नारळ अन् पाण्याचा ताब्या घ्यायला तयारच होईना. एरवीं नाना तिला कितीहि बावळट समजत असला तरी आज त्यालासुद्धा तिचा अभिमानच वाटला "आमच्या मुबईला किनई—" म्हणून मुबईला असतील नसतील त्या गोष्टी चारचौघा समवयस्क सोनसळ्याना खुलवून सागण्यात कमुताईला इकडे तिकडे करायला वेळच मिळत नव्हता

स्वच्छ धोतराचा व्यवस्थित काचा मारलेले, परटाच्या घरीं तीनतीनदा खेटे मारून पैदा केलेले कपडे अगावर चढवून जणू काय स्वत.चेंच लग्न आहे अशा तोऱ्यानें बापूच्याभोंवतीं त्याची स्नेहीमडळी बसली होती नाना बापूच्या शेजारींच बसला होता बाळभट काहीतरी सस्कृतात म्हणत होते

एकजण गधर्व फॅशन खाकरून म्हणाला, "काय बापूसाहेब, आता कशाला बुवा आम्हाला ओळख द्याल?"

"ते पुष्कळ देणार नाहींत, पण तुम्हीं आता दुप्पट जोगान त्याची ओळख कायम करण्याकरिता खेटे घालाल की!" नानानें उत्तरादाखल म्हटलें. सदरहू गृहस्थ एकवार खाकरून स्तब्ध बसले

दुसरा एकजण 'युथीमॉल टूथ पेस्टनें दात घासलेत का आज' म्हणून दरडावून विचारणाऱ्या जाहिरातींतल्या बाईप्रमाणें दाताची पाढरी कवळी बाहेर काढून म्हणाले, "बर का, बापूराव, आता मित्रमडळीला एक दणदणीत फीस्ट झाली पाह्यजे यदा सुटीत घरीं यायला तयार नाही अशा अर्थाच पत्र देऊ घरीं धाडून—"

"हो! म्हणजे एक सुटीभर तरी म्हाताऱ्याच्या जिवाला तेवढाच विसावा मिळेल!" नानानें हसून म्हटले

काहीतरी मजेदार बोलून हशाच हशा पिकवावा या उद्देशानें एकजण हातांतल्या टोपीला नाजूक तऱ्हेने कुरवाळीत म्हणाले, "का हो, नवरदेव म्हणजे तेथून येथून सगळे सारखेच का हो? जसे काहीं पढरीचे विठोबाच—"

कोणी हसलें नाही. होताच काय विनोद यांत हाका मारायला?

" आता हसू का आम्ही ? " नानानें गंभीरपणाने विचारले प्रश्न विचारणारा सोडून बाकीचे सर्व हसले

" आपण नाही बुवा आपल्या लग्नात असं मुखस्तंभ राहणार -- " एकजण हळूच म्हणाला.

" मग काय अक्षता पडल्याबरोबर प्रियतमेला एकादं काव्य रडून दाखवणार ? " दुसऱ्या एकानें प्रश्न केला

नानानें पाहिलें, की आता हा भाग आटोपता घेतल्यास ठीक पडेल.

" काय बापूसाहेब, एक एक कप पाणी पाजून देऊं का पंक्तिपठाणांना रजा ? "

सर्वजण समजायचें ते समजून, 'अच्छा' करीत हळूहळू उठून उभे राहिले

" बरं आहे ! उद्या अकरा वाजता सर्वांनीं भोजनाला यायचं--" नाना हात जोडून म्हणाला.

" अकरा म्हणजे बारा न ? " एकजण फिदिफिदी हसून म्हणाला !

" बाराला या आम्हालाहि खरकटीं काढायला माणसं लागणारच आहेत " नानानं उत्तर केलें मित्रमंडळी गेली

बापूच्या तोंडाला कोरड पडल्यासारखें झालें होतें. नानाच्या प्रत्येक कृतीचा, प्रत्येक शब्दाचा त्याला मनापासून राग येत होता या सर्व अनर्थाला नाना कारण होता लग्नाच्या आधींच दोन दिवस काका सहजच म्हणाले होते की, " जा रे नाना, तू अन् बापू दोघेहिजण जाऊन मुलगी पाहून या हो--म्हणजे ठपका नको, कीं मुलगीसुद्धा दाखवली नाही "

नानानें जाण्याचे साफ नाकारलें. इतकेंच नव्हे तर, " काका, जरी आम्ही अजून कॉलेजात शिकत असलों तरी कॉलेजातल्या मुलांचे रंगढंग आम्हास बिलकुल पसंत नाहींत. मोठीं माणसं जे करतात तें आमच्या हिताकरताच आहे तुम्ही अगदींच काहीं सारवळ्यांवाले त्यालेली दहा वर्षांची चिमुरडी ठकुताई तर आणणार नाहीं ना ? झालं तर ! " इतकें म्हणून बापूला चांगलेंच डिवचलें होते बापूला तें सर्व आत्ता पूर्णपणं आठवलें. नानाची अतोनात चीड आली त्याला. पण करतो काय ? बापूनें खिन्न मुद्रेनें एकवार पुढें पाहून उसासा सोडला !

आणि आत्ता बापू एकदम दचकला !

पुन्हा एकवार त्यानें समोर पाहिलें! पुन्हा तो दचकला!

डोळ्याच्या पापण्याची त्यानें जोरानें उघडझाप केली! तरीहि तोच चेहरा डोळ्यासमोर!

"ती—ती ही नाहीं." त्यानें मनातच म्हटलें

सारवळ्यागळे नाहींत, क्षिपऱ्या नाहीत, बैलगाडीच्या चाकाएवढं कुंकू नाही, पाटीभर दागिने नाहींत!

"ती—ती ही नाहीं" स्वतःशींच तो पुटपुटला.

फोटोंतल्या चेहऱ्याशी बिलकुल न जमणारी मूर्ति त्याच्यापुढें हसत बसली होती. अन् मग नानानं दाखवलेला तो फोटो कुणाचा! खात्रीनं तो फोटो या मुलीचा नव्हता!

"कुणाचा होता तो फोटो?" बापू किंचित् मोठ्यानें परंतु आपल्याशींच आश्चर्यानें म्हणाला.

"हं! मधेंमधें बोलूं नका! आचमन करा—म्हणा, केशव, नारायण—' बाळभट म्हणाले.

इतक्यात नानाच तेथें आला बापूची चर्या पाहून नाना हलकेंच त्याच्या शेजारच्या बाकावर टेकून बसला.

"नाना, ही ती नाही—" बापू हलकेंच म्हणाला!

ही ती कधी होती मग? कोण लेकाचा म्हणतो ही ती आहे म्हणून!" नाना म्हणाला.

"नाना, खरखर सांग! हा काय चावटपणा तू करतो आहेस? दहा छड्या मारल्या तुझ्या पाठीवर—"

"आता? इथं? व्याह्याच्या, वहिनीच्या अन् या बाळभटाच्या गणासमक्ष? वेड लागलं आहे तुला! घरी ये, वरात होऊं दे, मग सगळं सांगेन तुला—"

नाना उठून चालता झाला. चुकलेल्या वासराला जसें शीळ घालून पाणी पिण्यास तयार करतात त्याप्रमाणें बाळभटानें भडकलेल्या बापूस पुन्हा एकदा आचमन करावयास सांगितलें बापूनें पळीनें आचमन करण्याऐवजीं भांडेंच तोंडाला लावलें— आणि भांड्याच्या काठावरून त्यानें काय पाहिलें?

— दोन हसरे डोळे!

* * *

वरातीनतर चार दिवस होऊन गेले

त्या दिवशीं दुपारची वेळ होती. अगणातला माडव अजून निघालेला नव्हता. परतु माडवाचा उपयोग घरात अधार पडण्यापलीकडे आता काहींच नव्हता अण्णासाहेब पुन्हा yes sir, करायला मुबईला गेले होते. काका व्याह्याच्या घरी काही बोलणीं उरकायला गेले होते नाना एकटाच बाहेरच्या माडींत खिडकीशी बसून बाहेर पाहत होता.

काय झाल घरात कुणास ठाऊक ! कमूताई हसत टाळ्या पिटीतच बाहेर आली

"नाना—नाना, काय पण जम्मत झाली आत्ता—" कमळी त्याच्या खुर्चीला रेलून उभी राहली पाठोपाठ लाजेनें गोरमोरा झालेला बापू बाहेर आला.

"कमूताई, त्या मूर्खाला सागू नकोस काहीं—" बापू मोठ्या आर्जवानें म्हणाला

"कमे, तुला तुझ्या प्रेमळ भावाची आज्ञा आहे—काय झाल तें साग आज एक सिनेमाचा शो कबूल, पण अशी नाचू नकोस नीट एका जाग्यावर उभी राहून साग—" नाना म्हणाला

"कनई नाना—, बापू माजघरातून येत होता दारात उभी होती वहिनी. बापूला वाटल मी तिथ उभी आहें अन् काय म्हणाला आहे ठाऊक—? म्हणाला, "दारात काय आहे ग कमे तुझ ?" अन् मग वहिनींनीं लाजून तोंड फिरवल. अन् मग—" कमूताईला हसू आवरेना

"फोटो काढलास का ? नाहींऽ न ?"

अग आयुष्यातील असल्या रम्य आठवणी कायमच्या पकडून ठेवण्याकरिताच तर कोडॅकन उदारपणें इतक्या स्वस्त किंमतींत तो कॅमेरा गिऱ्हाईकाना जवळ जवळ धर्म करण्याकरताच विक्रीस ठेवला आहे आणि मीं तो तुला असल्या गोष्टी पकडण्याकरिताच घेऊन दिलेला आहे. बर जाऊ दे ! बापूराव, अरे आम्हा वडीलधाऱ्या माणसाची थोडीतरी मर्यादा ठेवा कीं." नाना हसून म्हणाला.

"माजघरात म्हणजे डोळ्यात बोट घातल तरी दिसत नाहीं—" बापू गुरकावणीच्या सुरात म्हणाला !

' पण डोळयात कशाला बोट घालायच ? गालावरची खळगी खुलवण्या-करिताच तर—! कमुताई, हें असल ऐकू नकोस ह तू ! ”

“ अन् मनुष्य पाठमोर असल्यावर काय करणार ? ” बापू परिस्थिति समजावून देण्याच्या उद्देशाने म्हणाला !

म्हणजे ! पाठीवर थाप मारलीस कीं काय आमच्या कमूच्यादेखत ? अरे बाबा, या मुलीना असल शिक्षण आपण देण्याची आता जरूरी राह्यली नाहीं त्याना ते पुस्तकातून, गुरुमुखान, शाळामार्फत आपोआप मिळन असतं—”

“ अजून तुझ्यासारख मी डोकीला गुडाळून बसलों नाही ! गाढवा, बघतोस काय बेरडासारखा ? काय गोंधळ केला होतास तो साग म्हणून चार दिवस पाठीमाग लागलों आहे—”

“ थाब ! आधी कोरम पूर्ण करतों. आईला, तुझ्या आईला– सगळ्याना बोलावतो—” म्हणून म्हणत नाना घरात गेला

जरा वेळाने सर्वजण बाहेरच्या माडीत आले नानानें स्थानापन्न होऊन घसा साफ केला

“ बापूची आई, मी पुराण सागणार आहें. कापूस घेऊन बसा, पण झोंप मात्र घेऊ नका— तुमच्याकडून वहिनींचा फोटो मुबईला आला होता— दाराआड वहिनी उभ्या आहेत वाटत ? ”

दाराआड खरोखरीच बागड्याचा आवाज झाला.

“ लाजू नका वहिनी ! तुमच्याच साहेबाची मजा आहे ही. तेव्हा काय झाल ? कीं आटपाट नगर होत तिथ नाना नावाचा एक वात्रट मुलगा होता. त्याला होता अलगुजाचा नाद. पण त्याचा एकमावस भाऊ बापूनामें प्राणी होता तो फार चिडत असे त्या अलगुजावरून. सभ्य शिवीगाळ होई मधून मधून ! सस्कृतिसरक्षण मडळाला ऐकून आनदान गुदगुल्या होतील अशीच ती शिवीगाळ होत होती. नशिबान खैर केली तो फोटो प्रथम नानाच्या हाती आला त्या नानाला कमळी नावाची एका मोठी मिजास-खोर बहीण होती. तिच्या ट्रकेंत तिच्या एका धादरट मैत्रिणीचा फोटो होता. एका दगडान दोन पक्षी सापडत होते मूळ फोटोंतल्या वहिनीच्या जागीं ही खुळचट मैत्रीण चिकटवून दिली—”

"तूच माझ्या ट्रंकेला हात लावलास ! बर आता तरी कबूल करतो आहेस म्हणायचा ! माझ्या ट्रकेला का हात लावलास ?" कमूताई म्हणाली

नानानें तिच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केलें, आणि पुढें बापूला मुलगी पसत आहे म्हणून मींच पत्रें धाडलीं—"

"बाई ! बाई ! बाई ! बाई ! शर्थ झाली या पोराची !" बापूची आई कौतुकानें म्हणाली

"माझ्या नान्याचा मुळींच भरवसा देता येत नाही कुठ आग लावील अन्—" नानाची आई अभिमानाने म्हणाली

"बापू, अपराधी आहें मी. काय शिक्षा करतोस ?—" नाना म्हणाला.

"पण हे सगळ तुला कस सुचल ?" बापू म्हणाला

"याला कारण माझ अलगूज. मला अलगूज वाजवता येत नव्हत, येत नाही--आणि यापुढ कधींहि येणार नाही, हे मी पूर्णपणें जाणून आहें. परतु माझा स्वभावच असा काही चमत्कारिक आहे, की त्या बैठकीच्या रात्रीं तू मला आव्हान केलत म्हणून मी अलगूज वाजवण्याचा पिच्छा पुरवला. परतु आता पटल, कीं कलेशी कुस्ती खेळून काही ती वश होत नसते त्याला नाजुक हृदयच पाहिजे. आणि त्याचींच तर माझ्याजवळ उणीव आहे. हा फोटोचा फार्स तुझा सूड उगवण्याकरिताच केला होता पण सूडासूडातहि अतर असत माझा सूड तुझ्या पथ्यावरच पडला. अन् कमे, हे घे तुझ्या मैत्रिणीच चित्र—" म्हणून म्हणत नानाने आपल्या बॅगमधून एक फोटो काढून कमूताईच्या अगावर भिरकावला.

"मला नको जा आता तो—" म्हणून म्हणत कमूताई घरात गेली

"नाना, तुझ अलगूज आणल आहेस का ? तुझ्या छातीचा भाता फुटेतोंपर्यंत फुकत बैस आता—" बापू उदारपणानें म्हणाला.

"अलगूज ? ह्या वेळेला तें अलगूज बोरघाटातल्या दरींत कुणातरी धनगराच्या पोराच्या हातात पडल असेल किंवा एकादी वाघीण रात्रीच्या वेळेस त्याच्याकडे आश्चर्यानें आ वासून पाहत असेल—" नानानें उत्तर केलें.

"खरच बाई, हें पोर केव्हा एकदा मार्गाला लागेल अस झाल आहे मला—" नानाची आई म्हणाली.

" तुला एकदा सांगितल ना आई, की माझ लग्न करून टाक म्हणजे ठीक होईल—" नाना हसून म्हणाला.

" चल! चहाटळपणा तरी किती करावा माणसान—" नानाची आई म्हणाली

" नाना—" बापू म्हणाला

" काय ? "

" काहीं नाहीं—" बापूने मुग्धताच स्वीकारली

" पुरे आता—उद्या आम्ही मुंबईला जाणार आहोत तेव्हा आज तरी वहिनीच्या हातचा चहा आम्हाला मिळालाच पाहिजे—" म्हणून म्हणत हसत हसत नाना आत गेला

---

## समाज-सुधारक : : ८

—आणि हा पुनर्विवाहाचा प्रश्न किती तरी दिवस बापूच्या डोक्यात घोळत होता. सदरहू प्रश्न त्याच्या डोक्यात यावाच का हा मानसशास्त्रज्ञाचा प्रश्न आहे. आणि हेंहि तितकेच खरें, कीं चार-चौघानीं बनविलेल्या कालच्या विद्वानाला आज विदूषक व्हावेसें वाटावें, चार-चौघानीं व्यवस्थित रीतीनें सुनावलेल्या कविराजाला पुन्हा काव्याची ओढ लागावी किंवा स्वत.च्या अकटोविकट ज्ञानाची पूर्ण खातरजमा असलेल्या इवल्याशा चिचुद्रीनें लेखिका म्हणून मिरविण्याकरिता स्वत. खरेदी केलेल्या दोन पैशाच्या कागदावर स्त्रियाच्या शिक्षणाकरता दिवसाच्या चोवीस तासातून चवदाशेंचाळीस मिनिटें एखाद्या जन्मजात रोग्याप्रमाणें कण्हत-कुथत फिरणाऱ्या फाजील स्त्री-स्वातत्र्याभिमानी महात्म्याकडून पाढऱ्यावर काळें करून घ्यावें किंवा लॉर्ड अर्विनच्या कारकीर्दींत त्याचा शेतकीकडील कल पाहून सस्थानी बैलोबानीं ज्या ठिकाणी प्रजेच्या पुण्याईवर ॲग्रिकल्चरल म्यूझिअम्स् स्थापलीं होतीं त्याच ठिकाणीं ह्या लाटसाहेबाच्या प्रयाणानतर जुन्या प्रकारची झनाना म्यूझिअम्स् स्थापण्याचा त्याच बैलोबाना मोठ उत्पन्न व्हावा या गोष्टींचा तरी कार्यकारणभाव कोण आणि कसा लावील ?

काय असेल तें असो, आपली समाज-सुधारण्याची महत्त्वाकाक्षा पुनर्विवाहाच्या रूपानें महाराष्ट्राच्या मद बुद्धीला पटवून देण्याचा बापूनें ठाम

निश्चय केला होता निदान पुनर्विवाह तर करू प्रथम, आणि विवाहानतर समाज सुधारणा म्हणून चार भगतगणासमवेत ताशे-वाजऱ्याचा जलूष उडवून देऊ हा त्याचा पश्चात् विचार झाला होता. हल्लीं पहावें तों प्रत्येक महात्म्याला स्वत.च्या कल्याणाची काळजी करण्यास वेळच मिळेनासा झाला आहे. ज्याला त्याला महाराष्ट्राच्या कल्याणाची विलक्षण तळमळ लागून राहिली आहे

बापूनें स्वत.शीच विचार करून पाहिलें येऊन जाऊन होणार काय? वडील नाव सोडतील—! ज्याने नाव ठेवलें त्यानेंच जर तें सोडायचें ठरवलें तर त्यात बिघडल कुठें? धाकटी बहीण कमळी आपल्या नवऱ्याजवळ एकाचें दोन करून आपली नालस्ती करील—? नाहीं तरी धाकट्या बहिणी आणि साडेतीन फूट उचीचे वाङ्मयीन योद्धे एकमेकाची नालस्ती करण्या-पलीकडे जगात आणखी कोणती चागली गोष्ट करीत असतात?

आणि कमळी तरी काय येवढी मोठी शहाणी लागून गेली आहे—?

—या ठिकाणी पुन्हा बापू या कुशीचा त्या कुशीवर झाला विचार पुन्हा सुरू झाले.

बायका तेवढ्या सगळ्या अशाच. जरा लग्न होऊन चार महिने जाऊ द्या, कीं लगेच थोरल्या भावालासुद्धा आजीबाईसारखा पोक्तपणान उपदेश करू लागतात आणि तो कशाच्या जोरावर? तर म्हणे ससारातील कटु अनुभव! उ.! मी तर म्हणतों, काय येतय तरी काय कमीला? तिला कलेकरता कला म्हणून ओरडणाऱ्या व्हिक्की बॉमची माहिती आहे, का—डोक्यावरच्या टोपीच्या उच्चाटनानतर, तोंडातील सिगारेटच्या धुराबरोबर महाराष्ट्राचा रशिया करून सोडण्याचा चग बाळगणाऱ्या 'कॉम्रेड' ऊर्फ 'भाई' लोकाचा कार्ल मार्क्स माहिती आहे, का स्वत.च्या बायकोचें नखहि न दिसण्याकरिता राहत्या घराचा मुरकोट किल्ला उठवून दुसऱ्याच्या बायका-विषयीं बोलताना मात्र नवमतवादाचा कट्टा पुरस्कर्ता म्हणून अट्टाहासानें ढोल बडविणाऱ्या सभाविताचा बर्ट्रंड रसेल माहिती आहे, का स्वत.च्या प्रियतमेला पोस्टानें चिठ्याचपाट्या धाडणें धोक्याचें आहे असें वाटून आपल्या कवनातील ओळींतून आपला मनोदय तिला पोंहोचविणारा करामतबाज महाराष्ट्राचा शेक्स्पिअर तिला माहिती आहे? काय तिला

माहिती आहे? एक-दोन मॅकमिलनची पुस्तके घोकलीं, कीं पेन्शनर वधू-पित्याला आश्चर्यानें तोंडातील तबाकू गिळायला लावता येईल--, परतु ऑस्कर वाइल्ड वाचणारा मिशाकट तरूण कसा समाधान पावू शकेल?

कोणी काहीं बोलले तरी हरकत नाहीं. बस्! आपला तर निश्चय कायम.

आता नानाला काय वाटेल? --नाना--

नाना नावाची व्यक्ति म्हणजे शेजारच्या पलगावर घोरत पडलेले लाबरुद पार्सल! बापूच्या या महाभयकर विचाराची त्याला काही तरी पर्वा होती का? काल रात्री ९ वाजता 'चीप रे बुवा!' म्हणून या कुशीवरून त्या कुशीवर होणारा प्राणी आता निद्रासगीतानेंच फक्त आपल्या सजीवतेची जगाला खात्री पटवून देत होता. रात्री ९ ते सकाळी ८ वाजेपर्यंत महाराष्ट्राला नानाचा काहींच उपयोग होण्यासारखा नव्हता यदाकदाचित् झालाच तर 'माझे आई! आता बद करतोस का--' म्हणून बापूच्या अगावर खेंकसण्यापुरताच.

बापूनें एकवार पासोडीनें गुरफटलेल्या आकृतीकडे पाहिले

"नाना, ए नाना ऽऽ!"

"हू" पासोडीतला हनुमान हुकारला.

"नान्या, जागा आहेस का?"

"हू" म्हणजे जवळ जवळ नाहीं असाच अर्थ कारण 'उ', 'हू' म्हणायचें त्यापेक्षा 'हू' मध्ये चटकन् काम होतें, अन् झोपेचा विनाकारण वेळहि मोडत नाहीं.

"नाना-- यापुढ सबध जन्मभर निजलास तरी चालेल पण आत्ता जागा हो"

उत्तरादाखल हुकारच पण जरा अस्पष्टच! कदाचित् घोरणेंहि असावें.

"नान्या--!" बापू ओरडला.

"काय रे!"

"जागा आहेस का?"

"का--? कुणी पुण पेटवायला तर लागल नाहीं ना? साहित्यिकाच्या अगात एखादा सोन्या-मारुती तर घुमू लागला नाहीं ना? असेल तर सकाळ-

पर्यंत थांबा म्हणाव" इतकें म्हणून जागत्या जगातील आपले कार्य संपलें अशाच काहींशा विचाराने नाना पूर्ववत् घोरू लागला

—आणि बापूहि पण आज हट्टासच पेटला.

"नाना, जागा होतोस का कानात पाणी ओतू ?"

नानानें काहींच उत्तर केले नाहीं.

"नाना—नानाऽ—नान्या ऽऽ, नान्या ऽऽऽ" बापूने शेवटचें संबोधन तारस्वरात खेचले.

"ओ ओऽ, ओऽऽऽ" प्रत्युत्तर आले.

"अरे, सहा वाजले आहेत"

"सहा म्हणजे काही आठ नाहींत." नान्याने गणिती उत्तर केले.

बापूला असा काहीं नान्याचा राग आला! काय गृहस्थ पहा! आपण नाही ते नाही, पण दुसरा एखादा समाज सुधारायला निघाला तर सहिष्णुतेनें ऐकून घेणेदेखील नाहीं

नाना आणि बापू जसे मित्रत्वाने बांधले गेले होते, तसेच नात्यानेंहि पण होते नाना हा बापूचा मावसभाऊ. दोघेहि एकाच कॉलेजात, एकाच वर्गात शिकत होते छे.! शिकत होते म्हणण्यापेक्षा शिकणे सोडून इतरच सर्व काही करीत होते म्हणणे सत्याला धरून होईल दोघांचेहि राहणें, वागणें एके ठिकाणींच. कार्यांची विभागणी केली असता कार्य कधीच घडून येत नसतें या न्यायाला अनुसरून नाना-बापूची खोली ही एक आदर्श खोली बनली होती. खोली होती आटोपशीरच— म्हणजे दोनच्याऐवजी तीन जर आले, तर तिसऱ्याला उबऱ्यावर निजायला जागा! एक जुन्या बाजारातून पैदा करून आणलेलें टेबल तीन पायाच्या शंकास्पद आधारावर धूळ खात उभे राहिलें होतें. कुठेंतरी नानाने वाचलें होतें, कीं एक वर्षभर विरूट फुंकण्याच्या पुण्याईवर विद्वान झालेली माणसे अलीकडे चतुष्पादाप्रमाणें जाहीर कसरती करू लागली आहेत तें पाहून चतुष्पाद टेबलाला द्विपाद करून कदाचित् त्या निर्जीव पदार्थाकडून एखादी टेबलगीता निर्माण करून घेता आली तर पहावें म्हणून त्याचे दोन पाय त्याने कलम करून टाकले. टेबलावर एक मोडका दिवा होता. वास्तविक रात्री अभ्यास करून आरोग्याला धोका पोंहोचण्याचा संभव आहे या सबबीवर बरेंच दिवस नानानें दिवा खोलींत आणण्यास हरकत घेतली

होती परतु बापूला कविता करायला स्वत.च्या अकलेचा उजेड पुरेसा नव्हता म्हणून त्याचा नाइलाज झाला. टेबलावर दोन दौती होत्या दोन्हीहि रिकाम्याच होत्या. मूठभर टाक नी पेन्सिली टाकाची निफें मोडलेलीं आणि पेन्सिलीचीं टोकें बोथटलेली अशीच होतीं बापूचा काव्यलेखनाचा उद्योग नानाच्या हृदयात कसलाच प्रकाश पाडू शकत नव्हता. पिंजलेल्या अस्थीच्या तोडलेल्या लेखणीने, रक्ताच्या लाल शाईनें, मेंदूच्या धवल कागदावर चित्रित केलेलीं बापूची कवने नानाच्या डोळ्याच्या पापण्या कधींच बेकरार करू शकल्या नाहीत बापूच्या काव्यानें अखिल महाराष्ट्र अजून ठाण्याला बगले बाधून राहण्याचा विचार करीत नव्हता, तरी नाना मात्र अगदी ठाण्याला देखील स्वर्गसुख मिळेल असे चक्क बोलून दाखवीत असे बापू आपल्या काव्याला जळती आग म्हणून समजत असे अशा तऱ्हेच्या एका प्रतिभासपन्न कवीच्या मनोज्ञ कलाविलासाचे इद्रधनुष्याप्रमाणें पालटणारे रग पाहून आनद मानण्याऐवजी हतभागी नाना खरोखरच कपाळावर हात मारून घेत असे.

आजकालच्या कॉलेजातील डॉन क्विक्झोटाप्रमाणे बापू स्वत.स महाराष्ट्रातील उदयोन्मुख कवीमध्ये फार उच्च दर्जाचा कवि समजत असे आपल्या प्रखर बुद्धीनें आणि विशिष्ट मनोवृत्तीनें काव्यरचना करून प्रचलित काव्यपद्धतीला विजेचे धक्के देण्याचा त्याचा निश्चय होता आपल्या काव्यातून हेतुप्राधान्य, सूक्ष्म मनोविश्लेषण, हृदयव्यथेचें नाजुक चित्रीकरण इत्यादि मसाला त्याने भरपूर पेरून ठेवला होता. इग्रजी साहित्याचें अध्ययन तर कवीला बैलाच्या मुस्क्या-प्रमाणें अवश्य पाहिजे तेहि जय्यत तयार होतें तो नवमतवादी होता हे नानाला सपशेल कबूल होतें

अडचण हीच होती, कीं नाना कवि नव्हता, आणि म्हणूनच हा तटा. नाना म्हणणार माझीं पुस्तकें वर, आणि बापू म्हणणार माझीं पुस्तकें वर. नाना निर्दयपणानें बापूचे आवडते कवि कोपऱ्यात भिरकावणार अन् बापू नानाच्या आवडत्या नटी दूर सारणार. या फेकाफेकीमुळें बिचारे आजतागायतचे कवी अन् होलीवुडातील सौंदर्यसपन्न नटी हे दुर्दैवी प्राणी आयुष्याचें उर्वरित क्षण मोजीत साधीकोन्यातून वावरत होते. एका कोनाड्यात दतमजनाची बाटली व्हॅसलीनच्या रगीत बाटलीवर रेलून उभी होती. डिकदाण्यांतून वाहणाऱ्या प्रवाही पदार्थांत यथेच्छ पोहणाऱ्या दाताच्या ब्रशाला पाहून

मात्र गगामातेवर सुप्रभातीं स्नान करणाऱ्या एखाद्या गालव ऋषीची थोडीशी तरी भाविक मनाला कल्पना आली असती. बाकीचे नित्योपयोगी जिन्नस बारा वर्षे तप करणाऱ्या वाल्या कोळ्यासारखे धूळ खात पडले होते भिंतींवर तर चित्राची फौजच खडी होती. सकाळच्या साप्ताहिक प्रभाकरिता मुद्दाम ब्लॉक पाडून तयार केलेल्या सारख्याच तोंडावळ्याच्या चित्राप्रमाणें पाच-सहा साहेबी तोंडावळे दाढी-मिशाच्या जजाळात इतकें गुरफटून गेले होतें, की चम्म्याची लगोटी लावणाऱ्या एखाद्या भाई टीकाकार गब्रूलाही हे कोणी तरी रशियन लोक असावेत यापलीकडे काहींच सागता येणें शक्य नव्हतें. फोटो सर्व साहेबाचेच होते हें मात्र निश्चित. मराठी भाषेंत काव्य प्रसवणारे कवि काव्याकडे लक्ष पुरविण्यापेक्षा त्या काव्याला कारण झालेल्या विषयाकडेच जास्त लक्ष पुरवितात ही बापूची अडाणी समजूत असल्याकारणानें स्वत:चें काव्य सोडून बाकीच्या कोणत्याहि कवीच्या काव्याला तो 'सुधासिंधु' किंवा 'दद्रुगजकेसरी' असल्या जी आय्. पी.च्या मालगाडीवजा लांबरुद नावाच्या औषधाच्या कॅटलॉगाइतकें सुद्धा महत्त्व देण्यास तयार नव्हता. आणि याच-करिता तो कोणत्याहि काव्यरुदन करणाऱ्या मराठी कवीला आपल्या खोलींत जागा द्यायला तयार नव्हता त्याच फोटोशेजारीं तीन आठवड्यात चार टूथ पेस्ट्स् बदलणाऱ्या आणि वर निर्लज्जपणानें दतपक्ति विस्फारणाऱ्या हॉली-वुडातील तारकाचे, सौंदर्यसपन्न समजल्या गेल्या असल्यामुळे जाहिरातदाराच्या गनिमी काव्याला कसे बळी पडावें लागते हें स्पष्ट दर्शविणारे, चित्रविचित्र मुखडे विराजमान झाले होते एकजण जणु काय सबध जगाला सकाळीं उठल्याबरोबर प्रथम काय केलें पाहिजे ह्याचा धडा देत होती. दुसरी एकजण बजावून सागत होती, कीं ही 'रोटनमग्ज' पेस्ट वापरा म्हणजे तुमचा प्रियकर तुम्हाजवळ खेचला जाईल, कीं जसें लोहचुंबकास लोखंड! तिसरी एकजण पटवून देत होती, कीं ही पेस्ट यःकश्चित् मास्तरालासुद्धा परवडते, मग तुम्हाला का नाहीं?

या सर्वांवर वरताण म्हणूनच कीं काय, कोपऱ्यात फाडून टाकलेल्या कपट्याचा ढिगारा पडला होता. आणि तो मधून मधून पिंजण्याचें काम वारा प्रामाणिकपणानें करीत होता!

पडल्यापडल्या बापूनें नानाच्याकडे एकवार तुच्छतादर्शक मुद्रेनें पाहिलें.

" नान्या—अरे ही तुला काळनिद्रा लागते तरी कशी रे? ऊठ, ऊठ, महाराष्ट्राला लागला आहे वणवा अन् "

" आपण जा न मग विझवायला—" पासोडींतन अस्पष्ट आवाज आला.

" नाना," बापूनें त्याच्या म्हणण्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून नेटाने म्हटलें, " नाना, समाजाला कीड लागली आहे रे रूढीरूपी राक्षस आम्हास जिथ तिथ नडतो आहे धर्माच अवास्तव थोताड माजून राहिल आहे प्रत्यक्ष मातेला पशू ठरवून आपण पशूला आता माता म्हणू लागलों आहोत जिकडे तिकडे निराशा, अव.कार याशिवाय काहीच दिसत नाही नाना,—मी समाजाला धडा शिकवणार बस्स्, ठरल मी पुनर्विवाह करणार—"

" कर—पण आत्ता नको, सकाळी पाहू" नाना गुरकावीत म्हणाला

" नाना," बापू उसळून म्हणाला, " नह्या, वाचाळपणा बद कर. पुन्हा सागतो मी पुनर्विवाह करणार !"

" मारे आ , मा कर ! माझ्याशी तर नाहीं ना ? मग मला का उगीच त्रास. नीज आता—" म्हणून म्हणत नानानें उशाचे पायथें करून पुन्हा घोरण्यास सुरुवात केली

बापू विचार करु लागला —

* * *

नाना, बापू आणि कमळी चहा पीत स्वयपाकघरात बसलीं होती बापू थोडासा विचारमग्न दिसत होता.

"कमूताई–" नानानें बशीच्या कगोऱ्यावरून बापूकडे पाहत सुरुवात केली

" काय ?" कपाळावरच्या भुरट्या चोराना मार्गे सारीत कमळी म्हणाली

" तुला कधीं स्वप्न पडतात का ग ?" नानाने बापूकडे तिरकस नजरेनें पाहत म्हटले

" अरे हो ! परवाच किनई मला स्वप्नात आपली हिंदमाता दिसली. कुकवाचा मळवट भरला होता तिन, अन् कोपरापर्यंत बागड्या चढवल्या होत्या अन्—" इत्यादि–इत्यादि कमूताई म्हणजे बोलकी मशीनगन नको असलेला पाहुणा घालवून द्यायला घरातल्या मडळीचें एक पाशुपत अस्त्रच होतें तें

" कमूताई, तुझ स्वप्न पुन्हा केव्हा तरी ऐकेन– पण माझ एक स्वप्न तुला सागू का ? आजच मला तें स्वप्न पडल. सहाचा सुमार होता आकाशातल्या चांदण्या आपणावर होणाऱ्या मराठी लेखकाच्या अत्याचाराला कटाळून हळूहळू निसटू पाहत होत्या चद्र तर बिचारा आपणावर होणाऱ्या कोट्या नारदामार्फत ऐकून पाढरा फटक पडला होता—थोडक्यात काय की—"

" नाना—! " कमीच्या बाजूकडे बगी आडवी करून बापू नानावर डोळे वटारू लागला

" कमूताई, मला आपल तुझ एक मत पाहिजे " नाना शान्तपणें म्हणाला

" काय ? " आपल्यावर आज हा होणारा अनुग्रह पाहून कमळी तोंडाचा चंबू करीत म्हणाली नाही तर एरवी नानाच्या दृष्टीने कमळीची किंमत कोणत्याहि विषयावर मत विचारण्याजोगी खास नव्हती.

" समज— बापू, तू डोळे काय फाडतो आहेस ? आपल घटकाभर धरून चाल की— बापू, तुला काय सागायच असेल ते मग साग ताटी म्हणून ताक प्यालेल्या अट्टल पिणाऱ्यासारखीं तोंड वेडीवाकडी करू नकोस— "

समज—पण जरा थाब—" असे म्हणून बापूच्यापासून लाब चार हातावर नाना बसला

" अरे, पण तुमच चाऊल आहे तरी काय हें ? " कमाताईनी पोक्तपणानें विचारले

"I say, Nana—cut it, man Don't let me down " बापूनें इंग्रजीची कास धरली.

' बापू, आता ती भाषा का ? कमूताई, हा बघ मला काहीच्या बाहीच बोलू लागला आहे—" नाना हसत म्हणाला

" इश्श ! मीसुद्धा विंग्रजी थोडथोड शिकले आहें म्हटल उगीच काय फसवतोस मला ? तो म्हणतो आहे, की down म्हणजे खालीं जाऊ नकोस इतक्यात " कमाताई मान वेळीत उद्गारल्या.

" पाहिलस नाना, कस कमळीन बरोब्बर ओळखलन् ! जावईबापू मोठे हौशी दिसताहेत बर का ? " बापूने एक हायसा श्वास सोडून म्हटले.

" तुला गिरवण्याकरता धडा घालून दिलेला दिसतो आहे त्यानीं.

बरंपण कमूताई, मला सांग, की आपल्याला पडलेलीं स्वप्नं दुसऱ्याला सांगायला काय हरकत आहे ग ? ”

“ इश्श्, त्यांत काय आहे ? आतां काही काही स्वप्नं असतात—पण तीं तुम्हाला सांगून चालणार नाहीत.

“ नकोच सांगूस, आम्ही भिऊन जाऊ कदाचित् ! ” नाना हसून म्हणाला.

“ तसं नाही रे, परवा किनई—”

“ समज, आपल्या मंडळीपैकीं म्हणजे बापून किंवा मी जर एखाद्या पुनर्विवाहाच्या वधूशी लग्न केलं तर—”

तिघांचे चेहरे तीन प्रकारचे होते पावसाळ्याच्या दिवसांत आपल्या एखाद्या समवयस्क ( असल्यास ) मैत्रिणीकडे जाण्याकरतां म्हणून समयोचित पोषाखाचें खोगीर अंगावर चढवून रस्त्यांत पाऊल टाकावें अन् तेंच पहिलें पाऊल एखाद्या चटोर कारट्यानें भिरकावलेल्या केळ्याच्या सालावर नेमकें जाऊन पडलें असतां जो काय चेहऱ्याचा मनोवेधक कलाविलास दिसणें शक्य आहे तो सर्व कलाविलास-छटानूछटासहित बापूच्या चेहऱ्यावर दिसत होता. चहा बशींतून सांडत होता याचें हे भान त्याला नव्हतें. सर्व शरीर कोठल्याशा संस्कृत नाटकांत वर्णन केलेल्या, शंकराला अर्पण करण्याच्या इराद्यानें मूठभर फुलें गोळा करून निघालेल्या वादरट पार्वतीप्रमाणें घामानें डवरून निघालें होतें. कवीच्या अंदाजाप्रमाणें ती फुलें बहुतेक जमिनीवरच गळून पडलीं. त्याचप्रमाणे बशींत धरलेला चहा जमिनीवरच सांडला. पुण्याच्या नगर वाचनालयाच्या सर्वसाधारण सभेचा अध्यक्ष होण्याचा लाभ ज्या गृहस्थाला दुर्दैवानें मिळतो तो जसा ओरडून ओरडून शेवटी कोणीच बोलू देत नाहीं असें पाहून नाक फेंदारीत स्वस्थपणें आढ्याकडे पाहू लागतो त्याप्रमाणें बापूची अवस्था झाली होती. —अवतार होता बापूसाहेबाचा !

आश्चर्य वाटणें जर शक्य असेल तर कमूताई आश्चर्यानें स्तिमित झाली होती. ‘अग्ग्या’ किंवा ‘इश्श्’ किंवा ‘ऽऽऽईऽऽऽ’ म्हणून कोणता तरी एखादा चटकदार शब्द उच्चारण्याकरतां उघडलेलें ओष्ठद्वय अजून मिटलेलें नव्हतें. आधींचेच ते भुरुभुरु उडणारे केस आतां आश्चर्यानें कपोलभागावर टिकल्यापाणीचा खेळ खेळू लागले. खांद्यावर मागें सरकलेला पदर अजून पूर्ववत् जागीं आला नव्हता

नाना मात्र एखाद्या 'पिवळा डाबीस' किंवा 'मगज्जरे किन्न' ह्या मुबईच्या महाविख्यात बोलपटात अत्यत कौशल्यपूर्ण काम करणाऱ्या कोणत्याशा एका महाविख्यात 'व्हिलन'सारखा घशात गचके देत निर्विकार मुद्रेनें आपली अभिनयकला ताणून पाहत होता, आणि हसू दाबण्याकरिता दातानीं बशीची कड चावीत होता

बऱ्याच वेळानें कमूताईनें, "इश्श्, काहीं तरीच !" एवढेंच म्हटलें.

"नाहीं. समज, बापूच उद्या पुनर्विवाहाला निघाला—"

"नाना—नान्या, केसान गळा कापणाऱ्या सैताना—!" बापूच्यानें आणखी अपशब्द बोलवेचनात.

"काय रे पोरानो, काय—चालल आहे काय ?" बापूचे वडील (काका) अघोळीला खाद्यावर पचा टाकून, जानव्यातून अगठा फिरवीत आत आलेले पाहताच त्रिवर्गानें आपल्या प्रसगावर पडदा टाकला !

कमूताईनीं कपबश्या गोळा करायला सुरुवात केलेली पाहून नाना व बापू पुन्हा आपल्या खोलीत आले.

"बापू—"

बापूने काहीच उत्तर केलें नाही.

"बापू !"

तरीहि बापू स्तब्धच.

आणि मी म्हणतो बापूने तरी नानावर का रागावू नये ? भरवशानें म्हणून एखाद्या साहित्यिकानें आपल्या दोस्ताजवळ दुसऱ्या एखाद्या साहित्यिकाला 'लाडगा' म्हटले म्हणून का हे बाहेर फुटण्याकरता सांगितलेलें असते ? भरवशानें म्हणून एखाद्या कारकुनाने दुसऱ्या एखाद्या समहतभागी कारकुनाजवळ 'हेडक्लार्कच्या कानात केस उगवले आहेत' असें म्हटलें तें काय बाहेर फुटण्याकरता ? भरवशाने म्हणून एखाद्या स्त्री-स्वातत्र्याकरता पाहिजे तर गळ्यात पट्टा अडकवून घ्यायलासुद्धा तयार असणाऱ्या एखाद्या नवशिक्या प्रोफेसराने आपल्या एकाद्या विद्यार्थिनीला सहजच एकदोन प्रश्न सागून ठेवले ते काय बाहेर फुटण्याकरिता ? भरवशानें म्हणून एखाद्या कवीनें आपल्या कवि-मित्राला आपल्या आगामी काव्यविषयाची ओळख करून दिली ती काय बाहेर फुटण्याकरिता ? भरवशानें म्हणून एखाद्या

'पाहिजे'च्या मृगजळापाठीमागें इतस्तत. धावणाऱ्या एखाद्या नोकरी-शोधकानें सहजच एकदोन जागा दुसऱ्याला सांगितल्या त्या काय बाहेर फुटण्याकरिता ?

पहा—त्या पोरटीच्यादेखत हा वाटेल तसें बडबडू लागला अन् ती पोरटी तर बातम्या पसरविण्यात पुण्याच्या सुविख्यात 'सकाळ' किंवा मुंबईच्या विख्यात 'स्वराज्या'लाहि अमेरिकन पत्र पांडित्य शिकवायला खबीर. वर्तमानपत्रें एखाद्याला नेस्तनाबूद करून त्या व्यक्तीच्या निधनाशीं आपला कांहीं संबंध नाहीं असें दर्शविण्याकरिताच कीं काय फार तर पुढें प्रश्नचिन्ह टाकून मोकळी होतील ही प्रश्नचिन्ह न टाकता आश्चर्याचें उद्गार-वाचक चिन्हच टाकील! आता काकाना, आईला आणि वाड्यातल्या चिंगुताई, सत्यबाई, कमलाबाई, विमलाबाई याना सांगून पुन्हा वर आश्चर्यानें इश्श् म्हणून म्हणायलाहि कमी करायची नाही या नर्भद्याला कांहीं अक्कल असावी की नाही ? तरी माहिती आहे काकाचा स्वभाव याला छे.! असल्या मूर्खाशीं संगत ठेवण्यापेक्षा एखाद्या फुरशाचा सहवास फार उत्तर नाही तर आपली सुप्रसिद्ध डेक्कन क्वीन काय वाईट ?

" बापू—"

नाना तरी निर्लज्ज पहा किती !

" ओहोऽ! काय पण राग आला आहे ? स्वर्गातल्या देवगंधर्वांना, मर्त्य-जगातील फक्त हिंदुस्तानाच गर्दी करून राहणाऱ्या तेहतीस कोटि देवाना, पाताळांत वास करणाऱ्या नागकन्याना, साक्ष ठेवून आजपासून हीच प्रतिज्ञा, कीं नानाशी ' गडी फू! यॅन रे पट्टे ! " नाना हसू लागला आता मात्र बापू खवळला.

"झाली एवढी शोभा बस्स् झाली. यापुढं तुमचा आमचा आजन्म बिलकुल संबंध नाहीं " बापू नानाकडे पाठ फिरवून बसला

" वा.! बापूसाहेब, हा काय आपला कलाविलास का ? " बापूच्या पाठीवर थाप मारून नाना म्हणाला.

" अंगाला हात लावू नकोस " बॉबचा वर्षाव झाला.

" बापू, अरे हे विरोधी प्रेम कसलं तुझ्या डोक्यात शिरलंय ? "

" तें आपल्या सदसद्विवेकबुद्धिलाच विचारा—"

" म्हणजे मला सदसद्विवेकबुद्धि आहे एकूण! हें बघ बापू, काव्य-

गायन करायला न मिळालेल्या एखाद्या पैंजण बांधणाऱ्या कवीसारखा चेहरा का पडला आहे तुझा ? तूच विचार करून पहा. स्त्रिया नाहीत तर संसार नाहीं स्त्रिया नाहीत तर कादंबऱ्या नाहींत, लघुकथा नाहींत अन् काव्य तर खात्रीनं नाहीं स्त्रिया नाहींत तर संस्था नाहींत. स्त्रिया नाहींत तरच नाटक कंपन्या नाहीत स्त्रिया नाहीत तर चढाओढी नाहींत, थट्टा-विनोद किंवा काव्यशास्त्र-विनोद या अवजड नावाखाली पचला जाणारा पांचटपणाहि नाहीं स्त्रिया नाहींत तर कोणतेंच कार्य होणार नाहीं. आणि म्हणूनच म्हटलें आहे, कीं 'पुरुषासि स्त्री ज्ञानमाला'. तेव्हां विचार केला, कीं या समाजसुधारण्याच्या तुझ्या कार्यांत—"

"टिंगल चालवली आहेस वाटतं ?"

"ऐकून घे रे आपण दोघेहि पुरुषच त्यांतून हे असे दांडगेश्वर. तेव्हां आपल्या उतावीळपणाला विवेकाचा लगाम घालून आपल्याला मार्ग दाखवायला कमुताईशिवाय—"

"नाना !"

"काय बाबा !"

"खरं आहे हें सारं ?"

"खोटं बोलणं हें पाप आहे असं तूंच नाहींस केव्हां केव्हां बरळत ?"

"नाना ! मित्र असावा तर बस्स, तुझ्यासारखाच !"

"आतां माझ्यावर पुन्हा एखादी कविता नाहीं ना खरडणार ? माझा उल्लेखसुद्धां नको. कोणतासा बडा मनुष्य म्हणतो त्याप्रमाणं मला तूं आपल्या कवितांत अनुल्लेखानंच मारीत जा. बरं पण राग गेला का ?"

"अगदीं." बापूनें मानेनें होकार दर्शविला

"बरं मग आजच्या आनंदाच्या प्रसंगीं अभ्यासाला रजा—" नाना पुस्तकाच्या पोहाकडे नजर टाकून म्हणाला.

"आणि आज दोन महिने नटींचीं चित्रं लोकांकडून आणलेल्या मासिकांतून फाडण्यापलीकडे काय दिवे लागले आहेत ?"

खवळलेला दर्या आतां शांत झाला होता

"बापू, समाजसेवा करणं तर ठरलं. पुनर्विवाहरूपी नदीच्या मुखानं

समाजसेवेच्या समुद्रात शिरायच हेंहि निश्चित झाल पण आता प्रश्न आला—" नाना म्हणाला.

" काय ? "

" विवाह करायचा–पण कुणाशी ? कोठल्याहि धार्मिक कृत्याकरिता आपद्धर्म म्हणून पैशाला सहा मिळणाऱ्या तावडया कुजक्या सुपाऱ्यातून एखादी निवडून घेऊन काम भागवता येत, पण मनुष्य कितीहि कलाविलासप्रिय असला, अन् कल्पनेचे गगनचुंबी मनोरे उभारणारा कलाभिज्ञ असला, तरी प्रत्यक्ष ससाराला सुरुवात करताना एखाद्या कुजक्या सुपारीवर स्वप्नात तरी प्रेम करील की नाहीं याची मला शका वाटते अगदीं प्लेटॉनिक प्रेमाच्या छूमतरावर साऱ्या दुनियेला चीत करू पाहणारा कलावान् केव्हा ना केव्हा तरी मुद्द्यावर आल्याशिवाय राहणारच नाही नाहीं तर एखाद्या फुटक्या बोरूवर प्रेम करायला काय हरकत आहे ? तेव्हा वधूचा प्रश्न कसा निकालात काढणार ? "

" तें मी ठरवल आहे ! " बापू म्हणाला

" ह ! येथपर्यंत मजल आली आहे का ? म्हणजे अगदीच काही तू आकाशातल्या तारका मोजीत पायाखालची वाट चुकून एखाद्या विहिरीत डुबणारा तत्त्वज्ञानी दिसत नाहीस—"

" तू पुन्हा जातीवर जायला लागलास ! " बापू किंचित् कोपाविर्भावानें म्हणाला.

" बर बुवा ! राहिल आमच ! पण बापूराव, आमच्या या नूतन भगिनीच नाव कळेल का ? "

" सरला ! " बापू बिलकुल न लाजता म्हणाला !

" सरला—? " नाना आश्चर्ययुक्त मुद्रेने म्हणाला

" जोशी रे ! " बापूनें खुलासा केला

" अच्छा ! ती होय ? बर, बर ! ती शहाण्याच्या वाड्यातलीच न ? "

" ह "

" छान ! बापूसाहेब, पुनर्विवाहेच्छु वधू, त्यातून कोंकणस्थ ! एका धोंड्यात किती काम करतो आहेस हें ? अरे, ज्ञानप्रकाशात तर नाव येईलच येईल, शिवाय अभिनंदनाच्या सोंगाखालीं महाराष्ट्रातल्या किती लोकाच्या घरीं

अन् किती दिवस जोडप्यान फुकट जेवशील राम जाणे! आता तुला जन्मभर अन्नाची काळजीच नको. इतके दिवस मी तुला नुसताच एका हातात कलेच तुणतुण अन् दुसऱ्या हातात जीवनाचा जळता पलिता वरून लोकाच्या-पुढ नाचणारा एखादा गोंधळी समजत होतों, पण अगदींच काहीं कवि नाहींस तू. काव्याच्या सोंगाचं कातड पांघरून नाजुक मंडळींत हक्कान मिसळायला याव म्हणून 'अग्गबाई ऽऽ' कविता करणारा तू कवि दिसतो आहेस! अरे चोरा— थांब तुझी मुलाखत घेऊन एखाद्या एक पैशाच्या वर्तमानपत्राकडे धाडतों म्हणजे तो संपादक परस्परच तुझ काय करायच तें करून ठेवील—" नाना हसत म्हणाला.

* * *

याहि गोष्टीला एक आठवडा उलटून गेला नानानें वरकरणी पूर्णपणें शान्तता धारण केली होती. मध्यतरी बापूचे काव्यलेखन दुप्पट वेगानें चाललें होते यावरून नानानें आपल्या मनाशींच काही आडाखे बांधून टाकले होते. बिचाऱ्या मासिकाना व्यापाराच्या मंदीच्या सबबीखालीं जाहिरातदार काहीच मजकूर पुरवीत नसल्यामुळें बापूचीं काव्यें छापायला काहीच अडचण वाटत नव्हती!

त्या दिवशीं दिवसभर बापूचा पत्ता नव्हता. नाना खोलींत बसून बापूचा ताजा गरमागरम कवितांचा काढा चाखून पाहण्यात गर्क होता दुपारीं कॉलेजात कोणत्याहि लताकुंजात बापू दिसला नव्हता

इतक्यात प्रत्यक्ष बापूच आला! पण आला म्हणजे कसा—? अगदीं डुलत डुलत. त्रयस्थ माणसानें चक्क शेरा मारायला कमी केलें नसतें इतक्या गैरसावध चालीनें तो आला. कोटाच्या गुंड्याना पत्ता नव्हता एक आणा किंमतीच्या वहीवर मागच्या बाजूस छापलेल्या हिंदुस्तानच्या आकाराएवढें गुडघ्यावर फाटलेलें धोतर, एक बंद तुटल्यामुळें बेबंद झालेली वहाण, मुंबईच्या मवाल्यासारखी शेंडीच्या खुणेवर चिकटवलेली झुकती टोपी—हा त्याचा बाह्य अवतार होता. पण मन—? नुसतें जळत होते. कढ आलेल्या भाताप्रमाणें तें मन खदखदत होतें. पण जाऊ द्या—नकोच त्या उपमा! उगाच कुणाला तरी भलताच संशय यायचा.

बापूच्या टाकलेल्या चेहऱ्याकडे नाना टकमका पाहतच राहिला. आल्याबरोबर बापूनें पायातल्या वाहणा कोपऱ्याच्या दिशेने भिरकावल्या, टोपी खुटीच्या दिशेनें अजमासाने फेकली आणि 'खून का खून' या महाभयकर चित्रपटात अत्यत कौशल्यपूर्ण काम करून अखिल दुनियेची शाबासकी मिळवून पाठीचें विरडें बनलेल्या हॅम्लेटच्या नटाप्रमाणें पलगावर धाड्कन् अग टाकून दिले.

"बापू—" नाना जरा धीर करून उद्गारला हो, न जाणो 'जगाव की मराव' असला खुळचट प्रश्न विचारण्याचा आचरटपणा करण्याकरता आपल्या डोक्याची करटी उपटून ह्या आधुनिक हॅम्लेटनें हातात घेण्याचा आग्रह धरला तर काय करा ? प्रवाहाची भरती ओसरू देणे हाच शहाणपणाचा मार्ग

"ऊ" बापूने आढ्याकडे खिन्नमनस्कतेने पाहत म्हटलें

"कुठ गेला होतास रे आज ?"

"मसणात—" बापूचे काव्यमय उत्तर आले.

"मसणात—? का महारवाड्यात—? का एखाद्या काव्यगायनाला ? का एखाद्या विद्वानाच्या सभेला ?" नानानें म्हटलें

"मसणात म्हणजे मसणात—"

"मग तिथन परत कशाला आलास ? आपण होऊन गेला होतास म्हणून आमच्यावर कित्ती उपकार झाले होते ! महाराष्ट्र सारस्वतदेवीला किती धीर आला होता ! पण काय रे, चेन नाही पडल तिथ म्हणून, का काल्पनिक भुताच्या गोष्टीला टरकून परत आलास ? खर साग अ ? कारण हे एका कवीचे अनुभव म्हणून त्याला महत्त्व आहे."

"मला काहीएक विचारू नकोस—"

"स्मशानाच वार अजून गेलेल दिसत नाही." नाना म्हणाला.

"नाना, जगात जगण्यासारख काय आहे रे?" बापू मोठ्या कळवळ्यानें म्हणाला.

"का ? जागतिक मदीच्या लाटेमुळ सर्व विषयातील पुस्तकांच्या किंमती भरमसाट उतरल्यामुळ सुमारें सहा महिन्यात हुकमी विद्वान् होणारे विदुषकी प्राणी आहेत, प्रौढ वयाच्या अडचणीमुळ लग्नाच सधान न साधता आल्यामुळ कोठल्या तरी 'स्त्री आणि तिच स्वातत्र्य' म्हणून टाहो फोडणाऱ्या

एखाद्या शिक्षणसंस्थेत काम करणाऱ्या 'नमस्ते' म्हणून बेसावधपणानं जाणाऱ्या येणाऱ्याला दरडावून हटकणाऱ्या पुरुषी स्त्रिया आहेत, 'प्रेम-प्रेम म्हणून उगाच एखाद्या फुटक्या ग्रामोफोनच्या कटाळवाण्या प्लेटीप्रमाण टाळक उठविणारी कविमंडळी आहेत, आणि विरोधाशिवाय, भांडणाशिवाय आयुष्याला लज्जत नाही म्हणून लग्नाच्या बायकोला उगाचच डिवचून विनाकारण सुस्कारे सोडणारे नवरेहि आहेत. आणखी काय पाहिजे? मनुष्यान जगायच म्हटल तर त्याची आयुष्यभर करमणूक करायला त्याचे आप्तेष्ट आणि स्नेही मंडळी आपल्या फौजफाटयासह सदैव रोज आप-आपल्या संसाराच फुकट नाटक दाखवायला तयार आहेत त्यातून तुझी मरायचीच इच्छा असेल तर मी आपला बाहेर जातो पंचनाम्याच्या-वेळचा साक्षीपुरावा ही भानगड माझ्याभोंवती नको —" नाना म्हणाला.

"नाना, अरे मेलेल्याला तू आणखी किती मारणार?" बापू सद्गदित कंठानें म्हणाला.

"बापू, आज तुला झालय तरी काय? आज ही भाषा का?"

"नाना, माझा अवतार संपला—"

"मला तर तो सुरू झाल्यासारखाच दिसतो आहे--"

"नाना, माझ्यासारखा मूर्ख मीच—"

"जीते रहो पठ्ठे! तदा मूर्खोऽस्मि इति अवागच्छम्! भांडारकराचें पहिलें पुस्तक. धडा आठवत नाहीं. बापू, अरे महान् तत्त्ववेत्ता साक्रेतिस तरी काय हेंच रडतो आहे. वामन मल्हार जोशाना विचार पाहिजे तर—"

"नाना, थोराची टवाळी करू नकोस लक्षात ठेव, मंबाजीला काहीं स्वर्ग मिळाला नव्हता—"

"पण स्वर्गातली रंभा मात्र त्याची रोज आरती करीत होती. तें जाऊ दे, पण मुख्य मुद्दा की, तू आज हा असा रडुबाई का?"

"जोश्याच्या सरलेकडे गेलों होतों.' बापूला हुंदका आवरेना

"अरे, अरे, अरे! उगी बाळ तें! सरलेच्या हातच्या पापडकुडया खाल्ल्यास वाटत?"

"म्हणजे?"

" म्हणजे संदर्भावरून सुद्धा अर्थ नाहीं लक्षात येत! जाउ दे, पुन्हा केव्हा तरी सांगेन, आता नको. आधीच तुझं हृदय या वेळेल्या एखाद्या स्पजासारखं झालं आहे त्यांत ही भर नको—"

" माझा सद्धेतु मीं तिला उघड उघड सांगितला, पण तिचा गैरसमज झाला! मी तिला किती समजावून सांगत होतों—पण तिच्या कांहीं गळीं उतरेचना. ती आपल्या वडिलांना हाका मारू लागली!"

" अस्स!"

" अन् मग मी पळून आलों!"

" भले बहाद्दर! शिकार मारलीस अन् काय? काही एखाद मेडल् वगैरे देऊं का?"

" नाना, परमेश्वरसाक्ष सांगतों, यांत माझा हेतु अगदीं पवित्र होता." बापू दीनवाणीनें म्हणाला.

" म्हणजे! तिच्यापुढं परमेश्वराची साक्ष घातली होतीस की काय?"

" होय. मी तिला वारवार बजावून सांगत होतों कीं 'परमेश्वर साक्ष आहे, माझी वाचा उदात्त हेतूनें प्रेरित झालेली आहे, उगीच कांहीं तरी हुच्च-पणा दाखविण्याइतका मी अजून उच्च झालेलों नाहीं."

" मग बरोबर आहे. मग पापडकुर्डयांच काय पण मी असतो तर साडगेंच चारले असते तुला!" नाना गंभीर मुद्रा करून म्हणाला.

" कां बाबा, काय चुकलं माझं?"

" वेड्या, अरे मर्त्य जगांतील दोन व्यक्तींच्या परस्पर-संवेदनासारख्या नाजुक लफडयांत त्या स्वर्गांतील हजार भानगडी करून पुन्हा वर पुण्यात्मे म्हणून मिरवणाऱ्या देवांना कां धडपडायला बोलावलंस? शंकराला भिल्लिणी-चा नाच पाहत असतांना मुंबईच्या रीगल सिनेमांतल्या अगदीं अव्वल दर्जाच्या मऊमऊ गाद्यांच्या खुर्चीवर बसून आंग्ल युवतींच्या कोरसांतील अवयवांची नाजुक हालचाल पाहत असल्यासारख्या गुदगुल्या होत होत्या. विष्णूवर तर लक्ष्मीचा पाय चेपण्याच्या निमित्तानें खडा पहारा आहे. ब्रह्म-देवाचे घोटाळे ब्रह्मदेवच जाणे. स्वर्गांतला इंद्र म्हणजे उत्तर हिंदुस्थानांतल्या एखाद्या लाळघोटया संस्थानिकासारखाच वाटतो. बिचाऱ्याला देवांचा सेक्रेटरी म्हणून नेमलं आहे का स्वर्गांतल्या भल्या मोठ्या कुंटणखान्याचा एजंट

म्हणून नेमल आहे कोणास ठाऊक! तो चद्र तर प्रसिद्धच आहे. आता बोल, काय चुकल तिच? तू परमेश्वराला साक्षी ठेवायला गेलास, अन् तुला तिन थापेबाज समजून दरवाजा दाखवला. त्यातून तू 'तुम्ही स्वतःवर जस प्रेम करता तस शेजाऱ्यावर प्रेम करा' म्हणून उदारपणान परस्पर वाट दाखविणाऱ्या येशू ख्रिस्ताचा हवाला दिला नाहीस. तें चालल असत, पण तू गेलास विनाकारण राष्ट्रीयत्वाच्या फाजील कल्पनेत गुगून. बच्चजी, मी असतों तर तुला खिडकींतून फेकूनच दिला असता—"

"नाना, तू मर्यादा सोडतो आहेस—"

"आणि तू तरी काय मर्यादा ठेविल्या आहेस रे? परक्याच्या घरात चोरासारखा शिरलास हृदयाची का होईना, चोरी करायला तू निघाला होतास. हृदयाच्या चोऱ्या काय पैशाच्या पाकिटासारख्या कपाटातून ठेवलेल्या जागेवरून करायच्या असतात? परस्त्रीच्या पुढ उभा राहिलास, तिच्यापुढ गुडघे टेकलेस—"

"छे.-छे.!" बापू ओरडला

"ऐक—! मधें बोलू नकोस. पुन्हा म्हणतों गुडघे टेकलेस—"

"अरे पण— गुडघे नाहीं टेकले—" बापू अजीजीच्या स्वरानें म्हणाला.

"मग काय काव्य रडलास? एकूण एकच. तिच्याशीं बाष्कळ प्रेमाच्या पाणचट कोटया केल्यास तिला आपला नवमतवाद ऐकवलास—! 'कला नावाची बाई पाणी प्यायली' अस साध विधानसुद्धा तू 'कलेन जीवनाला उचलून घेतल' अस काही तरी महा भयकर मूर्च्छा आणणार वाक्य उच्चारून तिच्यापुढ माडल असशील! तें काहीं सागू नकोस, तुम्हा सव्वातीन फूट उचीच्या साहित्यिकाना मोकळ सोडल तर तुम्ही कुठ, कशी अन् केव्हा आग लावाल तें काही सागता यायच नाहीं. साग, कुठ म्हणून तू तरी मर्यादेच्या आत आहेस? हिंदुसमाज– त्यातून उच्च जाती– असले ढग पचायला अजून आम्ही काहीं रशियन किंवा इटालियन झालेलों नाहींत, महाराज—" नाना आवेशानें म्हणाला.

"काय बोललास हें तुझ तुला तरी कळल कीं नाही, राम जाणे! इतका आवेश चढला असेल तर हताश होऊन मार्गे फिरणाऱ्या हबशी लोकाच्यापुढ व्याख्यान का देत नाहींस? नाही तर एखाद्या पुस्तकाच्या प्रकाशन-

समारभाच्या अध्यक्षाच्या सुरक्षित खुर्चीवरून काल्पनिक प्रतिपक्षावर तुटून का पडत नाहींस ? म्हणजे तरी तुझं समाधान होईल--"

"बापू, रागवू नकोस. थट्टा सोडून सागतों, कीं झाल्या प्रकारात तुझा काहींच दोष नव्हता. दोप काढायचाच झाला तर तो एवढाच, की परिस्थिति लक्षात न घेता तू तिसऱ्या मजल्यावरून खालीं उडी टाकीत होतास. आज तुझ्या-माझ्यासारखे पुष्कळ तरुण प्रामाणिकपणान ( आणि तो लोकाना बोलून दाखविण्यापुरताच प्रामाणिकपणा नाहीं ह ) पुनर्विवाहाला किंवा समाजसेवेला म्हण तयार असतील, पण अडचणी पुष्कळच आहेत. वडिलधारीं माणस ही पहिली अडचण. त्याची जुनीं मत ही दुसरी उगाचच खिडकीच्या आडून नयनबाण सोडणारे कुटाळ शेजारी ही तिसरी. स्वत. वधू ही मुख्य अडचण. चिठ्याचपाट्या धाडण्याकरिता मुलगा ठेवावा तर फॅक्टरी ॲक्ट लागू होईल. पोस्टान व्यवहार पहावा तर उद्या कदाचित् कामाला सोप पडाव म्हणून प्रेम-पत्र पोस्टान पाठविण्यास बदी करणेचा एखादा पोस्टाचा नवीन नियम करावा लागेल. प्रत्यक्ष भेटून काय होत तें तुला आज दिसलच आहे."

"पुन्हा ती आठवण काढू नकोस—"

"नाटकातून अन् कादबऱ्यातून आता पुनर्विवाह घडवून आणण म्हणजे सुपारी कातरण्याइतक सोप झाल आहे. खरोखरीच जर तें इतक सुकर असत तर पुनर्विवाहाकरता खास मडळ अन् कमिट्या कशाकरिता ? बापू, पुनर्विवाह वाटतो तितका सोपा नाही हें तू त्या मडळाच्या चालकानाच जाऊन विचार."

"मग आता पुरे करतोस का ?"

"पुरे करतों रे ! पण तुला एक सागून ठेवतों, कीं तू महाराष्ट्रात राहून अमेरिकन लोकाचे आचारविचार दाखवूं लागलास तर एखादे दिवशीं घराण्याची अब्रू घालवून बसशील. बाकी कवि होऊन काय ठेवली आहेस म्हणा ! पण सांगतों तुझ्या असल्या या कलाविलासान थक्क होऊन तुला काय पण मलासुद्धा कोणी मुलगी देणार नाहीं म्हणून म्हणतों, निदान माझ्या कल्याणाकरिता म्हणून तरी जरा कवीपणा सोडून चारचौघाप्रमाणे वागत जा"

"अरे पण नाना— स्त्री-पुरुषानीं एकमेकाशीं बोलायला काय हरकत आहे? त्यात अब्रूचा प्रश्न येतोच कुठ?"

"अस? मग स्त्री-पुरुषानी एकमेकाबरोबर हिंडण्यात तरी काय गैर आहे? अन् एखाद्या लताकुजात बसून कल्पनेचे मनोरे बाधायला तरी काय हरकत आहे? हरकत कुठच नाहीं. पण अडचण आहे ती खुद्द तुम्ही कोठपर्यंत मजल माराल या भीतीचीच. बर, ते सगळ जाऊ दे, मग सरलेच काय करायच?"

"म्हणजे मीं काय सागितल तें नाहीच का तुझ्या लक्षात आल? आता सरलेला कोणी तरी जाऊन माझ्या पवित्र हेतूविषयीं चार शब्द ऐकवलेच पाहिजेत." बापू म्हणाला

"म्हणजे! माझी आताची गीता फुकटच का?" नाना हसून म्हणाला.

"नाना—" बापू अधीऱ्या नेत्रानी त्याच्याकडे पाहत म्हणाला.

"काय?" नाना प्रश्नार्थक मुद्रेनें त्याचेकडे पाहून म्हणाला

"काही नाही!" निराशेने बापू उद्गारला

तो दिवस तसाच गेला. सागायची गमत, की दुसऱ्याच दिवशी काकाच्यापुढें बापू अन् नाना उभे होते. काका काय बोलणार आहेत याचा बापूला बिलकुल पत्ता नव्हता नानाच्या नजरेत मात्र थोडीशी मिस्किल-पणाची झाक मारीत होती

हपिसातील फायलीचा घरीं आणलेला गठ्ठा दूर सारीत काकानीं डोळ्या-वरचा चष्मा कपाळावर चढवला. एकवार चष्म्यातून आढ्याकडे पाहून त्यानी बापूकडे आपादमस्तक न्याहाळून पाहिलें.

"बापू पुष्कळ दिवस विचारीन विचारीन म्हणतो आहे, पण या कामामुळ वेळच मिळाला नाही. तुम्ही तरुण मुल एक प्रकारें फार सुखी आहा अजून तें हपिसाच लफड तुमच्यामाग लागल नाहीं बर का बापू, मीं विचार केला कीं जग फारच झपाट्यान पुढ चालल आहे. किर्लोस्कराच्या मासिकाकडे पाहिल तर अजून आम्ही जिवंत राहण्याच धारिष्ट तरी कस करतों याचच मला आश्चर्य वाटत. तरी पण मीहि जरा हल्ली थोडासा सुधारकी मताचा होऊ पाहत आहें. तू सुधारक मताचाच असशील?"

"मी—? मी नानाला माहीतच आहें—" बापू चाचरत म्हणाला.

" मला ? छेः ! मला रे तुझीं मत काय माहिती असणार ? माझींच मत मला माहीत नाहींत तर तुझी मत समजावून घ्यायला मला कुठ फुरसत आहे ? " नाना म्हणाला.

" छान ! नाना, अगदी वडिलाचा गुण तुझ्यात पूर्णपण उतरला म्हणून मी म्हणतों तें काहीं खोट नाही." काका हसून म्हणाले.

" मला वाटत तेवढीच काय ती वडिलोपार्जित अशी इस्टेट आहे ! " नाना म्हणाला

काका एकवार मोठ्याने हसले

" छान ! छान ! बापू, तुला आश्चर्य वाटेल, पण माझीं मत पूर्णपण सुधारकी थाटाची मला बनवावी लागलीं—"

" मीहि सुधारकच आहें—" बापू घाईघाईनें म्हणाला.

" आणि मलाहि बापू सुधारक आहे हें आता समजल ! " नाना म्हणाला.

" हें सगळ तुम्हा मुलाना सागायच कारण म्हणजे परवा माझे एक जुने स्नेही आपल्या मुलीविषयीं विचारीत होते."

" पुनर्विवाह पाहिजे म्हणून साग—" नानानें बापूला चिमटा घेत हळूच म्हटले.

" मुलगी आहे साधारणच शिकलेली साधारण म्हणजे हल्लीच्या मानान साधारण इग्रजी चार यत्ता म्हणाले वाटत तशी मुलगी फारशी शिकलेली नाही तरी रूपान बरी आहे म्हणतात, पण—" काका मध्येंच थाबले

" पण—स्वानच्या फौटनपेनसारखी काळी किंवा शिकारी कुत्र्यासारखी हाड निघालेली " काकाना ऐकू न जाईल अशा बेतानें नाना पुटपुटला.

" पण—बालविधवा आहे—" आवढा गिळून काका बापूकडे पहत एकदम म्हणाले.

बापूचा या विधानावर विश्वासच बसेना. नाना आपल्याशींच हसत होता

" अरे, विचार कसला करता ? तुम्ही तरुण मडळी जर अस मागमाग घेऊ लागलात तर सुधारणा तरी कसली कपाळाची होणार ! अन् स्वराज्य तरी कमल मिळवणार ? " काका म्हणाले

"बापू, स्वराज्य जर अशीं पुनर्विवाहान मिळूं लागलीं तर एकच काय शेंपन्नास पुनर्विवाह करायला काहींच हरकत उरणार नाही? तेव्हा स्वराज्याच हें कन्राट काहीं मला खर वाटत नाही आधीं काकाच्या मित्राच नाव विचार." नाना हळूच म्हणाला

"अरे, तुम्ही अजून गप्पच? बापू, विचार कसला करतो आहेस? का नानाला विचारू?"

"छेः-छे.! मला कशाला? आधीं काशी नि मग रामेश्वर सेतु!" नाना हसून म्हणाला

"त्याच अस आहे, मला त्याची हपिसात आली होती चिठ्ठी. उत्तर हें गेलच पाहिजे. अन् बापूच—माझ्या मुलाच—नाव फडकाव अस नाहीं का मला वाटणार?"

"आणि मलाहि पण तुमच वाटण बरोब्बर आहे अस वाटतय!" नाना म्हणाला.

"मग काय बापू, काय लिहू जोश्याना उत्तर?" कपाळावरचा चष्मा पुन्हा पूर्वपदावर आणून काका म्हणाले

"जोशी—? म्हणजे शहाण्याच्या वाड्यातले जोशी का?" बापू गैरसावध-पणाने बोलून गेला

"हो, तेच ते. पण तुला काय त्याची माहिती आहे?" काकानीं आश्चर्यानें विचारलें.

"अ—अ—अ—" 'अ'च्या पुढें बापूला काहींच आठवेना.

"उगीच कर्णोपकर्णीं ऐकल असेल झाल!" नानानें शेरा मारला.

"बरेच कान लाब दिसत आहेत!" काकानीं हसत हसत टोला मारला.

"तसच काही नाहीं, कैक वेळेला बातम्याहि लबे होण्याचा सभव असतोच कीं!" नाना हातवारे करीत म्हणाला.

"विद्वान् आहेस झाल. बर मग, बापू—?" बापूकडे वळून काका थाबले.

"आपल्या इच्छेबाहेर काही मी नाहीं!" असेंच कायसेंसें पुटपुटत बापू तेथून बाहेर सटकला.

नाना एकवार काकासाहेबाकडे पाहून हसला आणि बापूच्या पाठोपाठ वर गेला. बापू जणु काय त्याची वाटच पाहत होता—

" नान्या—चोरा, खर साग, हा काय प्रकार आहे ? " बापूनें पाहिला प्रश्न हा टाकला.

" आणखी काही अपशब्द बोलून घे म्हणजे सर्व काहीं सुरळीत सागेन. सद्‌गृहस्था, अरे मनाला काहीच कस वाटत नाहीं तुझ्या ? ज्या भूमींत कृष्ण-राव मराठ्यासारखे लोक सस्कृतीला टेकू द्यायला एखाद्या लोखडी गर्डरसारखे ताठ उभे आहेत, शालीनतेकरता, सभ्यपणाकरता अन् सस्कृति टिकविण्याकरिता संस्कृतिसरक्षक मडळ ज्या ठिकाणी कमिट्यावर कमिट्या भरवीत लोकाच्या डोळ्यात धूळ फेकण्याच अव्याहत कार्य चालू ठेवीत आहे, त्याच ठिकाणी तू भर दिवसा चक्क सस्कृति लाथाडून देतो आहेस ! एक वर्षभर तुला सस्कृतिरक्षक मडळाच्या रेफर्मेटरींत धाडला पाहिजे—"

" ह्या सगळ्या भानगडीत मला तुझा दाट सशय येतो आहे ! " बापू म्हणाला

" बापू, खर सागू ? तुझा निश्चय ऐकून मीं तो निश्चय मूर्तस्वरूपाला यावा म्हणून खटपट केली, दुसर काय ? माझी नि जोश्याची थोडीशी ओळखच आहे म्हणेनास "

" कुणाची—? " बापू साशक मुद्रेनें म्हणाला.

" जोशी ! ऐकू आल ? जोशी म्हणजे श्रीयुत जोशी, त्याची कन्या नव्हे ! " नानानें लागलाच खुलासा केला.

" पण थोडीशी ओळख—? " पुन्हा बापूने शका काढली

" बर पुष्कळशी. ते सातवीत माझे शिक्षक होते. त्याना मी तुझा बेत कळवला. ते कबूल झाले त्यातून ते पडले सुधारक तसच कमुताईकडून सरलेला तयार केली. झाल— पुढच तुला ठाऊकच आहे ! "

" अन्—अन् माझी परवाची फजिती—? "

" ती गमत होय ? अरे, तीहि कमूताईकडून सरलेला सागून मीच मजा केली होती. म्हटल टाकीचे घण दिल्याशिवाय येणार देवपण मुरमासारख ठिसूळ राहण्याचा सभव असतो मला थोडीशी पूर्वी कल्पना होतीच, कीं तू उत्साह, उन्नतीचे आचरट धडे गिरविण्याचा बावळटपणा केल्याशिवाय राहणार नाहींस किर्लोस्कराच्या प्रथम पानावरच्या उमद्या तरुणाप्रमाण आजुबाजूच्या काटेरी निवडुगावर बेदरकारपणान पाय देऊन, दीड फूट छाती

पुढ काढीत, एका हातात धैर्याच टीचभर निशाण फडकावीत, यशो-मंदिराच्या कळसावर अवघडत बसलेल्या कीर्तिदेवतेकडे धडपडायला तू जाणार हें मला माहीत होत म्हणूनच सरलाताईंना थोड्याशा पापड कुर्डया तळायला आगाऊ सूचना देऊन ठेवली होती. आणि हो--आता कळला का पापड–कुर्डयाचा अर्थ ?" नाना हसून म्हणाला.

"नान्या--, तू महामूर्ख आहेस--"

"म्हणजे--? हे तुला आता समजल वाटत ?"

"समज, माझ्या जागी दुसरा एखादा असता, अन् त्यान जिवाच बर-वाईट करून घेतल असत तर कोण जबाबदार ?"

"पण राजा--, ए सोन्या--, तुझा दम मला माहिती होता तू मराठी भाषेतील अव्वल दर्जाची प्रेमगीत खरडणारा एक आधुनिक कवि आहम हें मी जाणतो. एक प्रेमभग झाला तर दुसऱ्या आठवड्यात दुसऱ्या ठिकाणीं प्रेम करू लागशील. नाहीं तरी हें सत्यच आहे. तुम्ही कबूल करा किंवा न करा, पण कवीला प्रेमाच्या कविता स्फुरायला अमुकच स्त्री पाहिजे असा काही नियम नाहीं कोणती तरी स्त्री असली म्हणजे झाल!"

"ही तुझी अभिनव सस्कृति वाटत--?"

इतक्यात कसला तरी–माजरानें उडी टाकल्याचा धप्पकन आवाज झाला बापूने मागे वळून पाहिले--

* * *

"ए, ऊठ, मघाशी सहा वाजता गप्पा मारायला कोण जोर आला होता? माझ्या कानात पाणी ओतायला निघाला होतास नाही का? आता म्युनिसिपालिटीचा नळच कोंबू का तुझ्या कानात--?" नाना बापूच्या अगावरील पाघरूण ओढीत म्हणाला बापूचा विश्वासच बसेना या नवीन घटनेवर.

"नाना, जोश्याना निरोप पाठवला का रे काकानीं ?" खात्री करून घेण्याकरता बापूनें प्रश्न केला

"ऑ!" नाना आश्चर्यानें त्याच्याकडे पाहून म्हणाला

"अरे, तो सरलेविषयीं निरोप पाठविणार होते ना, काका ?"

"सरला? कोण सरला ?" नाना जास्तच गोंधळात पडला.

"आता ही नवीन काहीं तरी गम्मत करतो आहेस वाटत?" बापू किंचित् रागानें म्हणाला. आत्ता नानाच्या डोक्यात थोडा प्रकाश पडला.

"महाराजे, जागे व्हा पुरते. स्वप्नातच पुनर्विवाह लावलात कीं काय कुणाशीं?" तो म्हणाला

"आता एक अशी लगावीन कीं नाहीं—!" बाप् रागानें म्हणाला.

"जिरलों बुवा! अरे, तुझ्या स्वप्नातली ही कत्राट मला कशी बुवा उलगडणार? बापू, नीट शुद्धीवर ये या घरात पुन्हा असले पुनर्विवाह वगैरे शब्द उच्चारून अन्नाला महाग होऊ नकोस. स्वप्नातल्या गमती स्वप्नातच्च विसरायच्या असतात सकाळीं मला सहा वाजता उठवलस म्हणून त्याचं प्रायश्चित्त या स्वप्नाच्या रूपान तुला मिळाल आहे. बाबा, कलियुग असल म्हणून शेफारून जाऊ नकोस वेळ आली म्हणजे ईश्वर काहीं लाब नसतो—"

'नाना!" बापू आबट चेहरा करून म्हणाला.

"काय?"

"चिमटा घे पाहू मला!"

"कशाला?" तुझ्यासारख्या दाडगेश्वराच्या हातून उसनवार परत फेडून घेण्याकरिता? ऊठ, चहा करून ती कमळी वाट पाहत बसली आहे—"

'जग म्हणजे चोराचा बाजार!' असेंच काहींसे पुटपुटत बापू खालीं जाऊ लागला!

———

# निसर्ग आणि मनुष्य : : १

“ हातातून सुटलेला रुपया पुन्हा चोरी करून मिळवता येतो, दृष्टीच्या होऱ्यातून निसटलेली तरुणी धावत जाऊन गाठता येते, गेलेला जीव माकडाच्या गळचेपीचा मार्ग पत्करून कोंडून ठेवता येतो, in fact, जगात एकहि अशी वस्तु नाही, कीं जी पुन्हा दृष्टीस पडणार नाहीं ! पण काशीनाथ, तुझं एकदा एखाद्या गोष्टीवरून मन उडाल, कीं तें पुन्हा त्या गोष्टीवर कस बसवाव हें मात्र ब्रह्मदेवाच्या बापालासुद्धा कळणार नाहीं.” पुरुषोत्तम थोड्याशा चिडखोर मुद्रेनें म्हणाला.

“ म्हणजे ? ही कितवी पाळी ? पुन्हा सालाबादप्रमाण ‘मन जडण’ आणि ‘मन उडण’ ही भाषा सुरू झाली वाटत ? पण यदा हा प्रेमाचा सीझन जरा लवकरच सुरू झालेला दिसतो आहे. कमाल आहे बुवा निर्लज्ज-पणाची. इतके जोडे खाता बायकांचे, तरी तुमचा लघळपणा काहीं थाबत नाहीं ! ” म्हणून म्हणत कृष्णाने दोन्ही हात जोडून मला नमस्कार केला.

“ अरे पण कृष्णा, जोडे अगाला लागतात याच मानससरोवर अथांग असल्यामुळ हा जोडयाचा वारा आत जाऊन पोंहोचतच नाहीं पण तूर्त त्या गहन विषयाला शिवण्याची माझी इच्छा नाहीं. तूर्त आमचा दोघाचा एका गोष्टीबद्दल वाद पडला आहे.” पुरुषोत्तम म्हणाला.

" म्हणजे, संसारातला त्रिकोण असेल बहुतकरून ! वरच्या टोंकाला एक बाई, अन् तिच्या पायाशीं तू आणि हा. हाच वाद ना ? " कृष्णा हसून म्हणाला.

" कृष्णा, जळत्या चितेतली तुझी हाडसुद्धा तुझ्या या हलकट मनाइतकीं काळी सापडणार नाहींत पुण्यपुरुषा, आम्ही काय बोलतों आहोत आणि तुझा काय अवखळपणा चालला आहे, कांहीं शरम जिवाला ! " पुरुषोत्तम म्हणाला

" आमच्या आईबापानी आम्हाला शरम बाळगायला शिकवलच नाही आणि पुरुषा— हें बघ, चिडू नकोस तुमच्या भावना दुखविण्याचा माझा मुळींच इरादा नाहीं पण मला साग, तुम्हाला या विषयाशिवाय एक दिवस कधी दुसरा विषय सुचला आहे का रे ? " कृष्णा म्हणाला

" कृष्णा, जगामधें अशा अनेक गोष्टी घडून येत असतात, की त्या आपल्या दृष्टीस पडल्या म्हणजे स्वाभाविकच मनाला थोडस तत्त्वज्ञान सुचू लागत " मी म्हणालो

उदाहरणार्थ— रस्त्यात वेणीतल फूल गळून पडण—" कृष्णा म्हणाला.

" गप्प बैस मूर्ख आहेस !—आता आपण रेल्वेचे बोगदे पाहिले " मी म्हणालो.

" ते पुन्हा बुजवण्याचा तर विचार नाही ना ? " कृष्णा मध्येंच म्हणाला.

" तेव्हा त्या बोगद्यावरून सहजच विषय निघाला, मनुष्य श्रेष्ठ कीं निसर्ग श्रेष्ठ ? मी दुसऱ्या पथाचा आहे पुरुषा, पहिल्या बाजूचा आहे—" मी म्हणालों.

" त्यात वादाची बाजू उरतेच कुठ ? आपण जिवत आहोंत तोंपर्यत आपण श्रेष्ठ, आपण मेलों, जळलो म्हणजे निसर्ग श्रेष्ठ—उघड आहे " कृष्णा म्हणाला.

" म्हणजे निसर्ग श्रेष्ठ आहे, हें पुरुषाला सप्रमाण दाखविण्याकरिता आताच मी तुझा खून करावा आहे का तयारी ? " म्हणून मीं थट्टेने कृष्णाची मानगुटी पकडली.

" ए—मला त्यातल कांहीं समजत नाहीं." म्हणून कृष्णाने मानगुट सोडवून घेतली.

"वादाचा निष्कर्ष काय?" मी पुरुषाकडे पाहत म्हणालों.

"माझ म्हणण केव्हाहि खर आहे. काहीं काळापूर्वी याच घाटात दळणवळण शक्य तरी वाटत होत? निसर्ग आणि मनुष्य याच्यामधें स्पर्धा चालू होती. शेवटी मनुष्याचा जय झाला. जे डोंगर छातीवर आल्याप्रमाण दिसत होते त्याच डोंगराच्या छातीवर आम्हीं नाचतों आहोंत. 'मनुष्याचा जय'!" पुरुषोत्तम म्हणाला

"ए—तुम्ही काहीहि म्हणा, पण माझ्या पोटात मात्र भुकेचा जय झालेला दिसतो आहे. आता मी सूचना करतों, कीं त्या झोंपडीत आपण घटकाभर बसू, निसर्गाला दशम्याचा नैवेद्य दाखवू, अन् मग पुन्हा भाडायला जोरान सुरुवात करू." कृष्णा म्हणाला

तीन विचाराचे तीन प्राणी, एका पोटापायीं एकविचारी बनतात! आम्हीं झोंपडींपाशीं गेलो. दारातच एक आठ-नऊ वर्षाची मुलगी जमिनीवर पाठ ठेवून पायानें दरवाजाच्या कडीला शिवण्याचा प्रयत्न करीत होती. कृष्णानें तोंडानें 'चक्' करून मान फिरवली. पुरुषा आणि मी आश्चर्यनें त्याच्याकडे पाहू लागलों.

"द्रौपदीवस्त्रहरण—" म्हणून पुटपुटत कृष्णा गभीर चेहरा करून उभा राहिला.

"वाऽरे बहाद्दर! म्हटल याला बिचकायला काय झाल?" मी म्हणालों. आम्ही जवळ गेल्याबरोबर ती उभी राहिली.

"काय व्हव दादा—?" तोंडानें डोक्यावरच्या झिपऱ्या चाटीत ती म्हणाली.

"पाव्हण आहेत का घरात?" म्हणून कृष्णानें तिला विचारलें.

"बा व्हय? हाय की. बाबाऽर, पुन्याच पावन आल्यात बग—"

निळ्या रगाचें, G. I P R. शिक्कामोर्तब शिवलेलें, मळकेसें कुडतें अगात अडकवलेला 'पाव्हणा' बाहेर आला. कृष्णानें त्याला सर्व समजावून सागितलें

"पाटीलदादा, पोर्टररावसाहेब—किंवा कोण तुम्ही असाल ते– हे लोणावळ्याहून रेलवेचे नवीन बोगदे पाहत आले आहेत मी स्वत. नुसता गवताच्या काड्या चघळीत, अन् झाडावरच्या पाखराना दगड मारीत आलें

आहे आम्ही दमलेले आहोंत, भागलेले आहोंत, भुकेनें काळवडलेले आहोंत आमच्या दशम्या पाठुगळीं आहेत त्या पोटकुळी ठेवण्याचा आमचा बेत आहे पाण्याची सोय कराल का ? ”

आमची सोय झाली म्हातारा खरोखरीच मायाळू होता मी जर म्हाताऱ्याच्या जागीं असतों तर कृष्णा जिवत सुटता ना ! पण जगात काय न्याय आहे पहा ! बोलताबोलता म्हाताऱ्यानें कृष्णाला अगदीं आपल्या विश्वासात घेतलें. कृष्णा मुकाट्यानें ऐकू लागला

“ दादा—आता पगा, पाच वरस झालीं, की या नोकरीला रामराम. मग पुन्याला येऊन एखाद्या राजावानी ऱ्हानार ह्या आमच्या पारीची आई म्येली, अन् तवाच अगदी कटाळा आला व्हता, पन म्हगालों—'वार आहे तिच तरी चागल पगाव—आता पगा ही 'वार. लई हुशार दक्ती लहान आहे ना ? आसल आठ-नऊ वर्साची, पन भाकर करन्यात आईला माग टाकील मी वर कामाला असतों, तत ही भाकर आनुनशान् देतें, मग सोता आपली भाकर खानार पाऱ्ये, ए पाऱ्ये—पानी आन् वाइच्— ”

पारीनें पाणी आणून दिलें पारी इतर कामात तरबेज होती वस्त्रप्रावरणाच्या बाबतींत तिनें आमच्या पुण्यामुबईच्या मुलीचा सल्ला घेतला असता तर बरें झालें असतें !

“ ही प्पार एकलीच, आता पुन्याला आल्यावर हिला सरदार गाठून घेईन अक्षी राजाची रानी म्हून ढवळ्या गाडीतून फिरल काय ग पाऱ्ये, बसायला म्वाटार, ममईला जायला ढवळी गाडी, हवा खायला इमान ! ” म्हातारा हसत म्हणाला

“ पाटीलदादा—आता सगळच तुम्ही घेऊ नका. आम्हाला यातल इमान तरी राहू द्या कीं ! पाऱ्ये, ए पोरी—लबाड आहेड तू—” म्हणून कृष्णा हसूं लागला

“ काय ग—काय म्हनत्यात दादा ?—ह्ये दादा लई श्येन ०हायती—” म्हातारा म्हणाला.

“ पोर्टरसाहेब, जगामधें दोनच लोक काय ते मला शहाणा म्हणणारे आहेत. एक तुम्ही, अन् एक आमच्या कॉलेजमधील मुलगी. मला तुम्ही ‘लई

श्येन' म्हणता—ती मला 'फार शहाणे आहात तुम्ही' इतक म्हणते–" कृष्णा म्हणाला

शेवटी पुढें कर्जतला जाण्याचा आमचा बेत ठरला. जाताना मी पारीला हाक मारून तिच्या हातावर एक रुपया ठेवला.

" तुला खाऊकरता बर का ? " म्हणून मी हसत म्हणालों

" जा बाबानो, नाहीं तर रात पडल खाली जायाला--"

—२—

" प्राण गेला तरी या कर्जतला स्मशानभूमि पाहीन पण आता पायान काहीं घाट चढणार नाहीं आता वाजले आहेत चार. आपल्याला ती 'ढवळी गाडी' सापडेल त्या गाडीन जाऊ." कृष्णा टाईमटेबलवर नजर टाकीत म्हणाला.

" मग पूना एक्सप्रेस काय वाईट आहे ? म्हणजे सेकड नको बोकाडीं बसायला." पुरुषोत्तम म्हणाला कृष्णानें मान हालवली.

" त्या म्हाताऱ्यान मला 'ढवळी गाडी' सागितली त्या गोष्टीला आज चार दिवस झाले पण ती गाडी सारखी स्वप्नात दिसते आहे माझ्या—" कृष्णा म्हणाला

" स्वप्नात कशाला ? दिवसातून रोज जाता-येताना दोनदा दिसते आहे कीं–" मीं म्हणालों. शेवटीं 'नाही-हो' करता करता पूना एक्स्प्रेसनेंच आम्हाला माळ घातली ( किंवा आम्हीं तिला घातली—अर्थ एकच ! )

गाडींत कृष्णानें आपलें निरीक्षण चालू केले.

" पुरुषा, तुला नाजुक प्रश्न विचारू का ? " कृष्णा म्हणाला.

" काय ? " म्हणून पुरुषानें आश्चर्यानें विचारलें

" माझ्याजवळचे पैसे सपले आहेत तेव्हा माझ्यासाठी एक कपभर चहा आणायला सागितला तर वाईट दिसेल का ? " कृष्णा म्हणाला.

कृष्णाने चहाची बशी तोंडात धरून मला डिवचलें—

" ती समोरच्या बाकावरची बाई पहा--" कृष्णा म्हणाला.

" प्राण गेला तरी मी पाहणार नाहीं--" मी समोर पाहत म्हणालों.

" ती बाई सारखी माझ्याकडे पाहते आहे. का—तिन का माझ्याकडे पहाव ? " कृष्णा तिच्याकडे पाहत म्हणाला.

" तू तिच्याकडे सारखा का पाहतोस, हें पाहण्याकरिता ती पाहत असावी !" पुरुषा हसून म्हणाला

" हें पहा कृष्णा, तुला जर स्वस्थ बसायच नसेल तर ती बाई आणि तू बाहेर फळीवर उभीं राहून काय वाटेल तें बोलत बसा. हें तुमच बिनतारी यत्र पुरें झाल. मला वाटत तू मूर्ख आहेस, आणि तीहि मूर्खच दिसते--" मी त्रासून म्हणालों.

" सारेच ध्येयवादी लोकाना मूर्ख वाटत असतात." कृष्णा म्हणाला.

" तें तुझ ध्येय वाटत ?" मी म्हणालों

" अरे, हे खेळ असतात. पुरुष आणि स्त्रिया यामधें परस्पराना ओढून धरण्याची जी काहीं एक शक्ति आहे तिला आपण निसर्ग म्हणतों त्या निसर्गाशीं आम्हीं माणस अशी खेळत असतों तिन उगीच ह्या दिशेला पाहायच मी-- पण जाऊ दे, तुला तें सागायला नकोच म्हणा " कृष्णा म्हणाला

" पण निसर्गाचा सूड विलक्षण असतो--" मी अर्धवटच थाबलो.

गाडी एकाएकीं मध्येंच थाबत होती गाडी थाबली. केबिन वगैरे काहीं जवळ नसता हा कसला गोंधळ, तें पाहण्याकरिता सर्वजण डोकावून पाहूं लागले.

डाउन रस्त्यावर एक गाडी उभी राहिली होती. माणसाची गर्दी झालेली होती. काहीं तरी अपघात झालेला असावा. आमच्या डब्यातली बरीचशी मडळी त्या दिशेकडे धावली.

एका मिशीछाट तरुणानें साद्यत हकीकत आणली--

" एक आठ-नऊ वर्षांची कार्टी आहे. बापाला भाकरी पोंहोचवायला चालली होती वाटत. रुळावरूनच चालत होती. गाडी आल्याच तिला काहीं समजलच नाहीं वाटत-- ड्रायव्हरन शिट्या मारल्या म्हणतो. पाय सापडला पोरीचा, आपल्याच गाडीत घालून तिला लोणावळ्याला हॉस्पिटल-मध्यें नेणार आहेत. आईबापाचे लाड हो ! पोर वाटेल तशीं मोकळीं सोडायचीं, त्याचे हे परिणाम--" इत्यादि. आईबापाच्या फाजील लाडावर एक मुद्देसूद भाषण करीत स्वारीनें सिगारेट पेटवली.

मीं पुरुषोत्तमाकडे दचकून पाहिले. कृष्णा सुद्धा चमकला. गाडींतल्या मनुष्याचे उद्गार खरोखरीच ऐकण्याजोगे होते.

"बाई! नऊ वर्षांची मुलगी! अन् मेल्या इच्या आईबापाना काळनिद्रा का लागली होती? बाई गऽऽ अगावर शहारे येतात!" अगावर काटा उभा राहिल्यासारखे करून एक लठ्ठ बाई म्हणाली

"आई, आता त्या मुलीच्या तुटलेल्या पायाच काय ग करतील ते?" हातातल्या केळाची साल चोखीत एक युवराज म्हणाले.

"हें गाडीच काम म्हणजे–रामभाऊ, सुळावरची पोळी आहे पहा! नशिबाचे खेळ सगळे सरकार तर मुळी हेंच करण्याकरिता गाड्यान् विमान काढत आहे. लोकाचे गळे दाबण्याचे हे खेळ!" म्हणून सरकारला शिव्या देत एक वृद्ध कपी 'फू' करून विडीचा धूर सोडते झाले

"अरे, ते काही नाहीं. The driver is not at fault 36 up ( ३६ नबरची गाडी ) येत होती घाट पास झाली Time मेकप करीत होता स्पीड ऑर्डिनरी होती व्हिसल्स दिल्या आहेत. एक-चार रुपये Fine येईल—" एका अदरकी बात जाणता असलेल्या सुशिक्षित फिटरनें आपले मत ठोकून दिले

"काय नाट लागला आहे आज? मुंबईला नाटकाला जाऊन म्हटल तर वडिलाच पुण्याहून पत्र आल गाडी लवकर जाईल म्हणाव तर हा त्रास" एका पितृभक्त कॉलेजिएटने आळस देत म्हटले.

इतका वेळ गाडी उभी राहून त्या मुलीला घेतल्याशिवाय निघालेली पाहताच मी आश्चर्यानं कडक्टरला विचारलें

"First aid चालल आहे. पाठीमाग मेल येते आहे, ती घेऊन येईल" कडक्टरचे उत्तर आलें

मी मुकाट्यानें जाग्यावर बसलों. 'ढवळ्या' गाडींत मुलीला बसवण्याचा म्हाताऱ्याचा इरादा या कारणानें तरी सफल झाला. गाडीतलीं माणस आप-आपल्या कामात गर्क झाली. झालेल्या प्रकाराविषयी कोणालाच कांहीं वाटलें नाहीं. मला काय वाटलें?

मी इतका गोंधळून गेलों होतों, की त्या मुलीला प्रत्यक्ष पाहण्याचीसुद्धा

मला इच्छा उरली नाहीं. मी त्या दिवशीं एकसुद्धा अश्रु गाळला नाहीं मला फुकटचें शोकाचें प्रदर्शन करायचें नव्हतें, पण पोटात झालेली कालवाकालव माझी मलाच माहीत

आपाआपल्या शक्तीप्रमाणें खेद प्रदर्शित करणारी मडळी आता पुन्हा नवीन विषयाशीं समरस झालेली होती कृष्णा मुकाट्यानें समोरच्या बाई-कडे पाहत होता ती बाई त्याच्याकडे पाहत होती पुरुषोत्तम मात्र सारखा माझ्याकडे पाहत होता मी पुरुषोत्तमला काहीहि बोललो नाहीं निसर्ग की मनुष्य या वादात तो हरला होता पण जय झाल्याबद्दल मला बिलकुल आनद वाटत नव्हता उलट अपजय झाला असता तरच मला बरें वाटलें असतें

मी हातावर डोकें ठेवून विचार करू लागलों

पुत्राकडून पित्याचा वध करवावा त्यापैकींच निसर्गाची ही कृति आहे मनुष्यनिर्मित आगगाडींतून मनुष्याचा परस्पर काटा काढण्याची ही कारवाई काही औरच आहे. निसर्गाच्या छाताडावर कोण, आपण नाचतो ? किती फोल कल्पना आहे ही !

नागराचा फाळ आलेला नाही तोपर्यंत शेतातल्या वारुळातील मुंगीचा गर्व !

त्या मुलीचें पुढें काय होईल ? ती जगेल का ? जगली तर एका पावला-च्या तुटक्या आधारावर 'इमाना' तून कशी फिरणार ? एका पायाच्या जोरावर कोणत्या सरदाराला ती पायबद घालू शकेल ?

मानवाच्या आशा, इच्छा, आकाक्षा, फोल व्हायला कितीसा वेळ लागतो !

---

# ऽग बाई ऽऽ, लेख ऽऽऽ क! : १०

[ तुझी मळकी टोपी घाणेरडी आहे, असू दे. तुझा सदरा सोलापूर-चेकच्या कोटासारखा काळाकुळकुळीत झाला आहे, चालेल मला तुझे उच्चार मला नीटसे समजत नाहीत, हरकत नाही तुझे आचार माझ्या कल्पनाशक्तीच्या आटोक्याबाहेरचे आहेत, वेड्या, आमचे आचार तरी काय धड आहेत ? तुझे विचार, तुलाच माहिती मला एवढें माहीत आहे कीं, जगाच्या सुधारणेबरोबर ज्या अनेक गोष्टी घडून येत आहेत, त्यातच खेडे-गावाचें महत्त्व नाहीसें होऊन शहराची वस्ती वाढत आहे,— आता खेडे-गावाचें प्रेम बाजूला केले पाहिजे, ही एक गोष्ट घडून येत आहे आणि मोजेची गोष्ट ही, की ह तुला पटलेलें आहे, आणि म्हणूनच आज तू या सिनेमागृहात पाटीभर शेंगा विकीत फिरतो आहेस.

" खारी, भाजली गावरान श्येंग " अहाहा ! काय सगीत आहे पण !

श्री. आपटे, M A प्रवेश करतात टोपी कोटाच्या डाव्या बाजूच्या खिशात, कोटाच्या सगळ्या गुड्या तुटलेल्या, धोतराचा सोगा छातीजवळच्या खिशात,— जातिवत लेखक आहात बुवा ! — एका खुर्चीवर अल्हादपणें अगाचा चेंडू भिरकावून देतात घरीं चिलटाचा फार त्रास झाला आहे, निदान दोन तास तरी येथें निद्राभग होणें शक्य नाहीं, या गोडशा कल्पनेनें डोळे मिटतात. ]

पोऱ्या—साहेब, भाजलेली देऊ का ?

आपटे—( झोपेंतून उठून ) कोण ? कोण भाजली ?

पोऱ्या—गावरान श्येंग पाहिजे का ?

आपटे—( शुद्धीवर येऊन ) नको रे बुवा !

[ श्री. आपटे पुन्हा खुर्चीच्या मागच्या दांड्यावर फाशीच्या आरोप्या-प्रमाणें मान टाकतात पोऱ्या कानातली जळकी विडी तोंडात धरून काडी ओढू लागतो पहिली धटा होते. ]

आपटे—( काडीच्या उजेडाने सावध होऊन ) ए मुला, जरा इकडे येतोस का बाळ ?

पोऱ्या—( मोठ्या आशेने ) एक पुडा ? खारी का भाजली ?

आपटे—( कळवळयाने ) काय रे, तुझ वय काय रे ? अजून दहा वर्षसुद्धा लोटलीं नसतील अन् दाही दिशा मोकळ्या झाल्यासारखा वागतो आहेस ! तुला वाचता येत का ?

पोऱ्या—( विडीचा आस्वाद घेत ) श्येंग कोणती देऊ, साहेब ?

आपटे—ती त्या तिथली पाटी वाच पाहू ! 'धूम्रपान करण्याची सक्त मनाई आहे ' अर्थ समजतो का रे त्याचा ? ( पोऱ्या पाटी उचलून डोक्या-वर घेतो ) दुसरी शोभा कमी होती म्हणून ती अक्षर काढलीं आहेत अस का तुला वाटत आहे ? ( हसून ) ए, अरे चाललास कशाला ? दे, तुझी खारी शेंग पाहू. ( पोऱ्या विडी टाकून परततो ) आणि हे बघ, विडी ओढायची झाली तर बाहेर ओढावी, बर का ?

[ गिऱ्हाईक गवसलें, की दुकानदाराला वाचा फुटणारच ]

पोऱ्या—साहेब, आजचा आशक फार रिग्गी रिग्गी करतो बघा. त्याची बायको पळवतात तिला अगदीं कोंडून ठेवतात आशक जातो तिथ ( स्वत. छाती फुगवीत ) जोरान काहीं तरी म्हणतो, 'दे माझी बायको, नाहीं तर हा बघ पिस्तूल ' फार मजा आहे.

आपटे—( एक एक शेंग तोंडात टाकीत ) अस्स ? तुला सिनेमा पाठ असतील, नाहीं रे ? हा आशक, तो आशक, ह्यान त्याला मारल, त्यान त्याला मारल ( अर्धवट आपल्याशीच ) काय ज्ञान आहे !

पोऱ्या--( आठवल्यासारखें करून ) साहेब, मला रोज खेळ फुकट. ार्टींत शेगा घेतों, खेळ पाहतो

आपटे—( कौतुकाने मान डोलवीत ) पार्टीत शेगा घेतो, खेळ पाहतों, अन् बिड्या फुकतों वाऽरे बहाद्दर ! शाळेत जातोस का रे ?

पोऱ्या--( तिरस्काराने ) जात होतों, पण मास्तर मारू लागला, मी पळून आलो. पुढ गेलोच नाही. मी बैदूल खेळत होतो. आमच्या मास्तरान पाहिल माझ्या बान मला मारल मास्तरन पण मारल मी मास्तरच दगडान टकुर फोडल.

आपटे--( खवळलेल्या आत्म्यास शान्त करीत ) जाऊ दे. नाहीं तर नाही शाळा. ( एकदम ) तुझ नाव काय रे ?

पोऱ्या-- गुण्या माझ नाव बाच नाव भिकू

आपटे— अस्स ? गुणवतराव भिकाजीपत (हसून) लक्षात ठेव, बर का ?

पोऱ्या—( 'गुणवतराव भिकाजीपत' तोंडातल्या तोंडात पुटपुटतो. झालेल्या गौरवामुळे लाज वाटून हसतो सदऱ्याच्या बाहीने तोंड स्वच्छ करतो ) साहेब, तुम्ही मोठे दिसता मला हे काम करण्याचा फार त्रास आला आहे काम करणार नाही तर बा मारील तुम्ही मला नोकरी द्याल ?

आपटे--( विचारात पडतो कारण ह्यालाच नोकरी पाहिजे असते ) तुला नोकरी का ?

पोऱ्या--( नोकरी शोधण्याच्या कामात हातभार लावण्याच्या हेतूने ) अगदी साहेबासारखी नोकरी मी नाहीं करणार, साहेबाला सही करावी लागते मला चागल लिहित। येत नाहीं मग मी सही कशी करणार ?

आपटे--( मुलाच्या या महत्त्वाकाक्षेकडे पाहून दचकतो ) साहेबाची नोकरी नको म्हणतोस तर ? बर जाऊ दे, तुला पत्र विकायची नोकरी दिली तर राग येईल का ?

पोऱ्या--( आनदानें ) तो आमच्या घरातला बाघू रत्स्यातन ओरडतो, तसच कीं नाही ? ( पाटी वगैरे बाजूला ठेवून डोक्याची खादी-टोपी वर्तमानपत्रासारखी खाकेंत मारतो आणि गैरहजर बाबूचा अभिनय करीत ) केसरीऽ, ( अ )ज्ञानपिरीकाश—( हसून ) हा, ही नोकरी चागली. मी सगळीं पत्र विकीन तवाच घरीं जाईन

आपटे--अरे, तू तर आत्ताच अगदीं केसरी विकायला निघालास हें बघ, उद्या मला कुठ भेटशील? तो रसवती मासिकाचा पत्ता आहे का तुला ठाऊक?

पोऱ्या—आमच्या बाबूला आहे माहिती त्याला घेऊन येईन साहेब पण मी कुणाच नाव सागू?

आपटे—'नारायणराव आपटे' कुठ आहेत म्हणून विचार म्हणजे कोणीहि तुला माझ्याकडे घेऊन येईल (पोऱ्या पुन्हा तोंडातल्या तोंडात 'नारायणराव आपटे' म्हणून पुटपुटतो हाताने डोकें खाजवून मान हालवतो जणु काय आता हें पक्कें झालें) काय शिवीबिवी तर नाहीं ना देत, बाबा!

पोऱ्या—शिवी देईन तर पायातल्यान मारा, साहेब शिवी काय म्हणून! साहेब, उद्या मी पत्र विकणार माझी आई मला रोज सागते, 'गुण्या, तू कागद विकून पैसा आण' साहेब, आज माझी आई मला जास्त भाकरी देईल बा मारणार नाही बाबूला उद्या आणतों धरून सरवती मासिक नारायणराव आपटीसाहेब—

आपटे—(कौतुकानें त्या महाराष्ट्राच्या पिल्लाकडे पाहत,) रसवन्ती मासिक अन् नारायणराव आपटे उद्या सकाळीं ये--आणि इकडे बघ—ही दुसरी घटा झाली वाटत--, तू आता त्या खालच्या लोकाची सोय पहा जा, पळ

[पोऱ्या घाईघाईनें पाटी उचलून जाऊ लागतो दाराबाहेर पडणार, इतक्यात बाहेरून येणाऱ्या एका व्यक्तीचा धक्का लागून डोक्यावरची पाटी खालीं पडते ती व्यक्ति 'अगबाई, काय झाल?' म्हणून दचकून उभी राहते दुसरी एक स्त्री 'काय झाल?' म्हणून पुढें येते पाठोपाठ एक, रस्त्यात रात्रीच्या सोबतीकरता म्हणून बाळगलेला कदील या नात्याने बरोबर आणलेला--सुमारें पधरासोळा वर्षे वयाचा मुलगा येतो ]

'अगबाई, काय झाल' म्हणून म्हणणारी—दिसत नव्हत का रे तुला? डोळे फुटले होते का तुझे? माजुरी मेला बघतोय कसा बेरडासारखा! आधळा आहेस का?

नुसतेंच 'काय झाल' म्हणणारी-- अग पण मदे, इतक काय रागवायला झाल? त्याच्याकडे काय दोष आहे? आधीं आपण उशीर करून यायच, अन्

तिकीट काढण्याची खोटी, कीं लगेच शर्यत लावल्यासारख जीव घेऊन पळत सुटायच त्या गरिबाबर का उगीच डोळेफाड? (पोऱ्याकडे पाहून) जा रे बाबा तू आपल्या उद्योगाला पण थाब, तुझ्या शेंगा भरायच्या असतील रघुनाथ, तेवढी त्याला मदत करीनास जरा!

रघु०—माझ अडल आहे मदीची चूक आहे तिला वाटल तर तिन करावी त्याला मदत मी येत नव्हतों मला तुम्ही सोबती म्हणून आणलेल आहे, मी काही ह्या हमालीचा पत्कर घेतलेला नाही!

मदा०—का? जीभ फार सैलशी सुटली रे तुझी? जास्ती फाजीलपणा करायला लागलास तर मारीन एक थोबाडीत (त्याला वेडावून दाखवीत) म्हणे मडीची च्युक आहे!

रघु०—मदे, मी बाबाना सागीन ह मोठी बहीण झालीस म्हणून इतकी तावदारकी दाखवू नकोस

मदा०—(रागानें) काय रे, काय तू बाबाना सागणार? सिनेमाला गेलें, हेच कीं नाहीं? गेले होतें, मग? तुझ काय त्यात बिघडल?

रघु०—(फुगटून) यसुताई, मी जातों आपला घरीं सदान्कदा ही माझ्यावर अशी डाफरत राहणार मला तो सिनेमा नको नि काही नको घरात भाडण बाहेर भाडण, जस काही आम्ही म्हणजे काहीं नाहीच कुणी!

यमुना—तू तिच काय ऐकतोस, रघुनाथ? मी तुला आणला आहे ना? तू आपला माझ्याशीं बोल काय तें मदीची चूक आहे, मला कबूल आहे पण अस पहा, कीं बायकानी आता खालीं बसून शेंगा गोळा करण बर दिसेल का? तूच साग मी जर अशी खालीं बसू लागलें तर तुला कस वाटेल?

[रघुनाथ तात्काळ फसतो रघुनाथ खाली पाहू लागतो, पण पोऱ्या केव्हाच आपल्या शेंगा गोळा करून निघून गेलेला असतो दोघीच्या ही गोष्ट लक्षात येते मदी यमूकडे पाहते, आणि यमू मदीकडे पाहते ]

मदा०—इश्श्, यमे, उगीचच का इतका वाद?

रघु०—मद, तुझीं मुक्ताफळ ऐकल्याबरोबर तें पोरग भिऊन पळाल

मदा०—(त्याला वेडावीत) आहा ऽ ऽ हा!

[पुन्हा सुरुवात झाली असती, पण यमू मदीला हाताला धरून पुढें ओढते रघुनाथ मुकाट्यानें ‘अहा ऽ ऽ हा’चा अपमान गिळून त्याच्या

पाठोपाठ जातो श्री आपट्याच्यापुढे दोन रागा सोडून तिघीहिजणी स्थानापन्न होतात तिसरी घटा होते ]

यमुना--- पण काय ग मदे, आज तुला सिनेमाची कसली ल्हर लागली? परवा मी चल म्हणाले होतें तर 'नको बाई, बाबाना भ्याव लागत' म्हणून म्हणालीस, अन् आता कुठ गेल बाबाच भय?

मदा०—( लाडिकपणानें पदराचें टोक चोखीत ) अग, आज बाबा किनई गेले आहेत मुबईला अन् ज्या दिवशी बाबा घरी नसतात त्या दिवशी मी आपला स्वातन्त्र्यदिन पुकारते ( मोठेपणाचा आव आणून ) तस म्हटल तर मी हल्लीं बाबाना भिण सोडून दिल आहे आणि बरोबरीची मुल झाली म्हणजे मुलानी वडिलाना घाबरण बर तरी दिसेल का?

रघु०—( घरातला चोर ) माहिती आहे परवा बाबा रागे भरले तर मग का रडायला लागलीस? यमुताई, सायकल मागत होती बाबाजवळ ही. ( मदी डोळे वटारते तिकडे दुर्लक्ष करून ) बाबा म्हणाले, 'जास्त बोल्लीस तर तोडात देईन' मग बाईसाहेब आईजवळ जाऊन रडत बसल्या

यमुना— रघू, तू मधेमधें न बोलायला काय घेशील? तर मग आज तू स्वातन्त्र्य पुकारल आहेस, म्हणायच काकू काही नाहीं का ग बोलल्या?

मदा०—( रघुनाथाने केलेला अपमान गिळून ) आई पुष्कळ बोलली. पण तिच बोलण कोण मनावर घेत आहे! 'तिला लागलय् वेड' म्हणून नेहमी बाबा म्हणत असतात आज धाडत नव्हतीच, ( मानेला वळसा देत ) पण मग मी जरा रडले

यमुना—( कौतुकानें तिच्याकडे पाहात ) रडलें!

मदा०—रडले म्हणजे काय? जरास अ.रडलें, झाल!

यमुना—अग, मग येऊन यायच तर पहिल्या 'शो'ला नसत का बनल यायला? अगदीं यायच ठरल तर शेवटच्या 'शो'त काय मौज आहे?

मदा०—तें तुला कस समजत नाहीं, आश्चर्य आहे! कीं पहिल्या वर्षात तीन वर्ष तपश्चर्या केलीस म्हणून अगवळणीं पडल आहे, कुणाला ठाऊक! रागवू नकोस ह, मी आपली उगीच थट्टा केली

यमुना—बर, नाही समजत मला. तस का होईना, पण तुला काय समजत आहे तें तरी कळू दे ना?

मदा०—पहिल्या 'शो'ला येणं मला पसंत नाहीं कारण आपले हितशत्रु त्याच खेळाला गर्दी करून सोडीत असतात (डोळे बारीक करून, मान उडवीत) ज्याला गाठीभेटीच घेणं असेल त्याची मात्र गोष्ट निराळी!

यमुना—(आश्चर्यानें) म्हणजे? हा आरोप माझ्यावर की काय? (आठवल्यासारखे करून) म्हणजे तू त्या मुलावरन म्हणतेस होय? अग बाईऽऽ! (हसू लागते.)

मदा०—का, आता का उडवाउडवी? तासन्तास त्याच्याशी गप्पा झोडीत असतेस व्हराड्यात उभी जेव्हा पाहावं तेव्हा तू आपली तिथ्थ. काय ग, इतका वेळ तुमच्या गप्पा तरी काय चालतात?

यमुना—तू हसणार नसलीस तर मी सांगते तो मुलगा आहे कोणत्याशा लीगचा सभासद मी परवाच्या कॉलेज Magazineमध्यें Womanhood वर लेख नव्हता का लिहिला? तो या स्वारीनं वाचला अन् आता सारखा माझ्या पाठीस लागला आहे, की त्या लीगचे सभासद व्हा मी रोज त्याला वाटाण्याच्या अक्षता लावते अन् तो रोज लघळपणा करीत हॅं हॅं हॅं करीत 'मग व्हा ना आमच्या लीगचे सभासद' म्हणून तोंड वेंगाडीत येतो

मदा०—हात्तीच्या, एवढंच ना! मग त्याला माझं नाव सुचव

यमुना—तू सभासद होणार की काय?

मदा०—(हसून) मी? अन् सभासद?

यमुना—नुसत्या गप्पावर काही मजा नाही येत बाई!

मदा०—शेंगा घ्यायच्या आहेत का?

यमुना—शेंगा ऽऽऽ (काही वेळ 'आ ऽऽऽ' तसाच कायम राहतो.)

मदा०—अगबाई!–सभ्य रीतीला सोडून आहे नाहीं का हें वर्तन्? अन् तुला हें कसं खपणार? अग चल, मोठी आली आहे, माहीत आहे! रघू–ए रघू, (रघू 'काय शिंचा त्रास आहे' या मुद्रेने 'ऊ' करतो पण समोरच्या पड्यावरची दृष्टि काहीं काढीत नाहीं.) रघू, शेंगा आण ना रे बाहेरून.

रघु०—(आनुवंशिक संस्काराला धरून वडिलाच्या हुकमी आवाजानें) गप ग! उगीच काय त्रास देतेस?

मदा०—नको ऐकूस हो तुझीं लोकानीं कामं करावींत, तू मात्र लोकाचीं काम बिलकुल करू नकोस!

रघु०--( तिरस्कारानें ) हु.! काय लोकानी माझीं काम केली आहेत, राम जाणे. बाबाच्याजवळ, नाहीं तर आईजवळ चहाडखोरपणा करून मार देववण, याला लोकाचीं काम म्हणण्याचा प्रघात असेल तर मात्र गोष्ट निराळी म्हणे लोकानीं मात्र तुझीं काम करावींत—

मदा०--आणि चहाडया करण्याच तुला मात्र बिलकुल ठाऊक नाहीं—छे, भोळा साबाचा अवतार! अन् लोकाच्या खिशावर ताव मार--

यमुना—( बहीणभावाच्या भाडणात पडण्यापेक्षा तोंडात मारून घ्यावी अन् बाजूला व्हावें, हें पटल्यासारखी मुद्रा करून ) ए, तुम्हाला भाडायचच्च असेल तर घरी भाडत जा, लोकाना उगीच तमाशा नको दाखवायला.

मदा०--मी भाडलें ?

रघु०--नाही-नाही, मी भाडलो. आता माझी भाडणाची हौस पुरी झाली आहे. तुम्हाला शेंगा आणून देतों आणि मी आपला चार पावल दूर बसतों पैसे दे

मदा०—तुझ्याजवळ नाहीत का ?

रघु०--माझ्याजवळ? 'मुलगी दुसऱ्याच्या घरात जाणार, तिथ तिचे कोण लाड पुरवणार?" म्हणून सढळ हातान चारदोन पैसे आईबाप मुलीला देत असतात मुलगा काय! आहे नेहमीचाच बह्रोबा. त्यातून लाडिकपणान, वाऊडी वाकडी जीभ करून, मॅव मॅव करण्याची मला कुठ सवय आहे? उघडपणान तोंड वेंगाडण्याची मला बुद्धिच दिली नाहीं परमेश्वरान

मदा०.—तू काय काय बोलला आहेस आता तें ध्यानात ठेव घरीं चल तर खरा तू, आताशा तू नेहमीं मला टाकून बोलायला लागला आहेस. इग्रजी सहावींत आलास म्हणजे काही स्वर्ग गाठला नाहींस, बर का? मला आई रोज जिलब्या खायला घालते अन् तुला कोंडयाच्या भाकरीवर गुजराण करावी लागते! साहेब, तुम्ही घरीं चला अन् मग बोला!

रघु०.—( चिडून ) मग घरी जायला चोरी आहे का कुणाची? काय करणार आहेस घरी गेल्यावर? तुला वाटत असेल मला डोळे नाहींत म्हणून. तुझीं बिंग मला बाहेर नाहीं का काढता येणार?

[ मदी चपापून जीभ चावते. रघुनाथ विजयी मुद्रेनें, तोंडानें हलकेच शीळ घालीत, कोटाच्या खिशात हात घालून टाचावर चालत जातो. मदी

यमुनेकडे चोरून पाहते, पण काहीं झालें नाहीं असें दाखवण्याकरिता मोठ्याने हसण्याचा प्रयत्न करते यमुना कान टवकारते ! ]

यमुना-- मदे, हे काय नवीन पिलू बाहेर पडल पोतडींतून ?

मदा०--( शुष्क हास्य आणून ) अग, त्याला वेड लागलय--बडबडतोय् काहीं तरी

यमुना--मला वाटत त्याला वेड लागण्यापेक्षा तुलाच कुणाच तरी वेड लागल असाव !

मदा०--( स्त्रीस्वभावास अनुसरून ) इश्श् ! तुझ आपल काहींच्याबाहींच बोलण ?

[ इतक्यात उजेड होतो, अर्थात् भाग सपलेला असतो. दोघी सहजच मागें वळून पाहतात. श्री. आपटे खिशातली टोपी बाहेर काढून तिच्याशीं लडिवाळपणान बोलू लागतात दोघी चपापून एकमेकींकडे पाहतात ]

यमुना--मदे, अगदीं म्हणून जिभेला आपल्या खड पडला असेल तर शपथ !

मदा०--( किंचित् निष्काळजीपणाच्या आवाजात ) असेल कुणी तरी. काय करायच आहे आपल्याला ? अन् त्याला काय एवढ भ्यायचय् !

यमुना--पण बाई आपल्या अगदींच कस लक्षात नाहीं आल ?

मदा०--तू म्हणजे अगदीं--मी म्हणतें ऐकल त्यानीं, बिघडल कुठ ? आपण काहीं राज्य उलथून पाडण्याचा गुप्त कट करीत नव्हतों अन् चारदोन पुरुष जमले म्हणजे ते नाहीं का आपल्याला ऐकू जाव म्हणून मोठ्यादा अद्वातद्वा बोलत ? त्याना तेवढी मुभा आणि आपणच काय पाप केल ?

यमुना--ह बघ, मी काहीं तुझ्यासारखी बोलण्याच्या कामात पटाईत नाहीं माझ्या आपल वेडीच्या मनाला जें वाटत तें मी बोलून टाकतें.

मदा०--नाहीं, तें करतेस तें छान करतेस ! तो रघु आला वाटत.

[ दोन्ही खिशात दोन पुडे आणि हातात एक अशा थाटानें रघुनाथराव येतात ! ]

यमुना--मदे, मी नाहीं बाई गडे !

मदा०--आता जास्ती चद्रबळ आणायला लागलीस तर त्या माणसाला ऐकू जाईल इतक्या मोठ्यान मी ओरडेन ह

यमुना--बर बाई, राह्यल ! ( तरी पण मनाची समजूत म्हणून पुडा न दिसेल अशा बेतानें त्याच्यावर खिशातला रुमाल झाकण म्हणून टाकते ) रघुनाथ, खरच मला तू खर सागशील ना ?

मदा०--रघू, तुला माझ्या गळ्याची शपथ आहे

रघु०--तुला गळा असेल तर कीं नाही ?--काय पण मधुर आवाज ?

मदा०--कसा रे तू इतका निर्लज्ज ? आता तुला मी बोललें अन्--

रघु०--तू ? अन् मला बोलणार ? तुझी काय बोलण्याची शामत आहे ? तू रडली असशील थोडस--

[ म्हणून झपाट्याने तेथून निघून जातो श्री आण्व्याच्या शेजारीं जाऊन बसतो ]

यमुना--भद्रे, साग ना ग ?

मदा०--( हसून ) इश्श ! तू तर अगदी लहान पोरासारखच करायला लागलीस !

यमुना--मला तू सागतेस का त्या गृहस्थासमोर रघूला विचारू ? ( उठण्याचा आविर्भाव करते )

मदा०--नको, तू इथ बैस, सगळ काही सागेन पण तिसऱ्या कुणाजवळ बोलायच नाहीं ह त्याच अस आहे--( एकदम ) अग तो सिनेमा चालू झाला बघ ! अहाहा ? काय पण Scene आहे !

यमुना--( दोघीहि एकाच जातीच्या आहेत हें विसरून कसें चालेल ? ) सिनेमा मरू दे, मला तू काय सागणार आहेस ते साग--

मदा०--भारीच बाई तू चिकित्सेखोर यमे, माझ तू थोडस ऐकून घे चाकू, सुरी, कात्री ही लहान मुलाचीं खेळणीं नव्हत !

यमुना--आता तू सागतेस का--( म्हणून आवेशाने उठते )

मदा०--( तिला खाली बसवून ) परिहास विजल्पित सखे, खालीं बैस. मी हल्लीं एक गोष्ट लिहिण्याच्या--खरडण्याच्या म्हण पाहिजे .तर, नादात आहें, हें सागितल तर तुला खर वाटेल का ?

यमुना--मुळींच नाहीं खर वाटणार.

मदा०--मग बदल तर तुझ मत आणि आजपासून मला महाराष्ट्र-

वाङ्मयाच्या अभिवृद्धयर्थ तळमळणारा आत्मा समज. नमस्कार नाहीं केलास मला! का, इतक अगदी घाबरून जायला काय झाल?

यमुना—तू! अन् गोष्ट लिहिणार?

[ दोघीजणी हसतात, पण दोघीच्या हसण्याचीं कारणें अर्थात् निराळीं असतात ]

यमुना—( हसू दाबीत मदे, अग तू गोष्टी लिहायला लागलीस, तर मग तुझ्या तिकडच्याची काय दशा होणार? बुधवारात उभें राहून तुझ्या गोष्टी का त्याना विकायला लावणार आहेस तू? काय ससार चालवशील पण तू! यदाकदाचित् मी जर तुझ्या घरी आले तर 'मिय्यासाहेब कुठ आहेत' तर 'घोड्याला पाणी दाखवीत आहेत' अन् 'बिब्बीसाहेब कुठ आहेत,' तर 'घोड्याला पाणी दाखवणाऱ्यावरन एक गोष्ट सुचली आहे ती लिहीत आहेत', असा फार्स दिसायचा!

मदा०—( शान्तपणाने ) झाल का तुझ? यमे, तू पुरुष असतीस तर तुला सागितल असत

यमुना—पुरुष असते तर मी तुझ्या वाऱ्याला उभी राहिले नसतें त्यातून लेखक बायको? घरात माझे डोळेच पाढरे व्हायची वेळ. नको ग बाई!

मदा०—काय अश्लील बोलते आहेस? अश्लील वाङ्मयावर जसा निर्बंध असतो त्याप्रमाण बायकाच्या अश्लील बोलण्यावरसुद्धा कायदा काढला पाहिजे.

यमुना—अग पण अश्लील म्हणजे काय? मिश्रसमाज असताना जे शब्द अश्लील ठरू शकतात ते आपल्याआपल्यात बोलायला काय हरकत आहे? [ काय पळवाट आहे पण! ] पण ही नवीन टूम कसली? लेखिका होऊन तू लेख तरी कोणता लिहिणार आहेस? 'एक होता कावळा, अन् एक होती चिमणी, अन् मग चिमणीच घर होत मेणाच अन् मग, अन्—मग अन् मग—' बाई, बाई, बाई! अन् मग मदाराणीचा कोण थाट? 'ह्या कोण?—' तर म्हणे—'अजून माहीत नाही? अहो, ह्या त्या लेखिका मदाराणी—!'

मदा०—यमे, ( यमू हसते ) यमेऽ ( मोठ्यानें ) यमिटले—आल ऐकू? यमे, तुला काय वाटत ग? मला तू समजतेस तरी कोण?

यमुना—अग तू ती लेखिका मदाराणी —( हसते. )

मदा०—होय! मी आता लेखनाचा विचार डोक्यात घेतला आहे.

यमुना.—( नि.श्वास सोडून ) बर झाल बाई! एका काळजीतून तूर्त तरी मुक्त झाले लेखनाचा विचार सध्या नुसता डोक्यातच आहे! काही हरकत नाहीं तो विचार हाताशी येईतोपर्यंत त्या हातावरची तुझी मालकीच नाहीशी होईल! तेव्हा मग काहीं काळजी नाहीं

मदा०—मी आता दुसरातिसर काहीं करणार नाहीं, उठेन आणि पाठींत धपका घालीन!

यमुना—आहात बाई, लेखक आहात तुम्ही काही केलत तरी खपून जाईल निरकुश कवि तुम्ही!

मदा०—यमू, सध्याच वाङ्मय केवळ पुरुषी थाटाच आहे स्त्रियाची Psychology एकालासुद्धा धडपण देता येत नाहीं त्यामुळ आपल्या स्त्रीवर्गाविषयी विनाकारण गैरसमजुती पसरल्या जातात उदाहरणार्थ, श्री. आपटे म्हणून त्या रसवन्ती मासिकात गोष्टी लिहीत असतात मी त्याना मूर्ख समजतें [ नशीब त्या आपट्याचे! ] चारदोन स्त्रियाच्या मनोभूमिकेच उठावदार चित्र रेखाटण्याचा त्या शभूमहादेवान प्रयत्न केलेला आहे [ आपटे! अहो आपटे! परमेश्वर तुमचें रक्षण करो! ] माझ्या मत त्याना कवडीइतकीहि स्त्रियाच्या स्वभावाची माहिती नाही त्याना उत्तर म्हणून मी एक गोष्ट लिहिणार आहें आल लक्षात? आता गप्प बसायला काय घेशील?

यमुना—मदे, आता माझ म्हणण ऐकून घे तुझे विचार स्तुत्य आहेत, पण अप्रस्तुत आहेत आज तो गृहस्थ M A ची डिग्री लावतो आहे, अन् तू याच वर्षी मॅट्रिक झालेली आहेस. माझ्या मत तुझ्यापेक्षा तो जास्त शहाणा आहे बायकानीं बायकाची चित्र रेखाटण्यात मुळीच मौज नाहीं ती पुरुषानीं रेखाटण्यातच कला आहे. आणि लक्षात ठेव, गोष्ट लिहिण्याची कला सोपी नाहीं तू म्हणते आहेस,' पण माझा तुझ्यावर मुळीच विश्वास नाहीं

मदा०—अन् लिहून तुला दाखवल्यावर?

यमुना—तू लिही पाहिजे तर,—पण मला दाखवू नकोस

मदा०—( आवेशानें ) चल, पैज तुझी-माझी—[ अरेच्या! स्त्रियाचें

पुरुषीकरण होऊ लागलें आहे, म्हणून चारदोन लोक ओरडतात तें याना कळतच नाहीं की काय ? ]

यमुना—काय पैज ? (हीहि पण हट्टाला पेटली की ! )

मदा०—तूच बोल

यमुना—पहा बर ! मुदत सहा महिन्याची सहा महिन्याच्या आत जर तू गोष्ट लिहिलीस तर मी आपल College Career सोडून देईन, नाहीं तर—

मदा०—नाहीं तर मी आपल सोडून देईन.

यमुना—ठरल ?

[ मदा मान हालवून 'ठरल्या' ची समति देते दोघीहि आपापसात कुजबुजू लागतात. पाठीमागें श्री आपटे आणि रघुनाथ याच्यामध्ये स्नेहाची इच्छा जागृत होते आणि दोघेहिजण बोलण्याकरिता विषय कोणता काढावा ह्या विचारात पडतात ]

रघु०—( अर्धवट आपल्याशीच ) अजून किती भाग आहेत बर ?

आपटे—अ ?—मला काहीं म्हणालात ?

रघु०—छे. ! किती भाग आहेत अजून, म्हणून सहजच विचारल

आपटे—कुणाला ठाऊक बुवा ! ( जरा भेळानें ) जवळच राहता वाटत ?

रघु०—कोण, आम्ही होय ? सदाशिव पेठेंत

आपटे—'आम्ही' म्हणजे ?—[ मुद्दामच प्रश्न टाकलेला असतो. ]

रघु०—मी, माझी बहीण अन् तिची एक मैत्रीण बरोबर आली आहे

आपटे—अस्स होय ? त्या समोर बसल्या आहेत त्यात तुमची बहीण आहे वाटत ?

रघु०—ती धाकटी आहे ती माझी बहीण.

आपटे—( 'असेल–असेल' या निष्काळजीपणाच्या थाटात ) अगदीं शेवटचा खेळ ?

रघु०—सन्ज लहरीला आल म्हणून आलों, झाल. [ गृहच्छिद्रें दिसू नयेत, ही पोराची इच्छा ! ]

आपटे—( वकिली कावा करून ) तुमच नाव जोशी काय ? तुम्हाला कुठ तरी पाहिल्यासारख वाटतय्

रघु०—आमच नाव फडके आहे अन् मी तुम्हाला कधींच पाहिलेल नाहीं

आपटे—( डोकें खाजवीत ) तुमच नाव फडके ? छे. हो ! मला वाटत जोशी असाव

रघु०—( हसून ) म्हणजे आता माझ नाव मलाच माहिती नाही अस समजायच की काय ?

आपटे—छे.-छेः ! तस मी म्हणत नाहीं जोशी आडनावाचा तुमच्या-सारखाच मुलगा नूतन मराठी शाळेंत होता—

रघु०—तुम्ही इथच असता ?—

आपटे—ह्या थिएटरात म्हणता का ?

[ इतक्यात आपला चिरंजीव गुणवंतराव भिकाजीपंत प्रवेश करतो ]

गुण०—( आपट्यांना उद्देशून ) साहेब, मी नाव विसरलो कागदावर लिहून द्या ( म्हणून खिशातून एक सिनेमाची जाहिरात काढतो. पेन्सिली-करता खिसे तपासतो अर्धवट जळक्या 'कृष्णमुखी' ह्या संज्ञेस प्राप्त झालेल्या विड्या हातात काढतो पण लाज वाटून त्या तशाच खिशात कोंचतो शेवटी एक बिनटोकाची पेन्सिल काढतो चाकू जवळ नसला तरी दात अजून पडलेले नाहीत ! दातांनींच पेन्सिल कुरतडू लागतो यालाच काहीं काही ठिकाणीं 'स्वावलंबन' म्हणून म्हणतात )

आपटे—( खिशातल्या फाउंटनने लिहीत ) बराच धड आहेस कीं आठवणीचा !

[ 'बोलका ढलपा' या धड्यातील भिल्लाप्रमाणे चि गुण्या त्या कागदाकडे डोळे फाडफाडून पहातो काय साहेब आहे ! म्हणून पुटपुटत आपल्या मनाशीच आश्चर्य करीत उभा राहतो जरा वेळाने ज्याप्रमाणें चेक बरोबर आहे की नाहीं हें पाहण्याकरता, किंवा आम्ही चेकचाच व्यवहार करतों, असें लोकांना दाखवण्याकरता आपण दुसऱ्या कुणाला तरी ते चेक दाखवतों, त्याप्रमाणें जवळच असलेल्या रघुनाथापुढें तो कागद धरतो ]

गुण्या—साहेब, हें नाव काय आहे ?

[ रघुनाथ मोठ्यानें वाचतो ज्ञानतंतूंच्यातर्फे मेंदूवर आघात होतो. ]

रघु०—( आश्चर्यानें ) तुम्ही आपटे ? म्हणजे अऽऽ तुमच नाव आपटे ?

आपटे—( बावळी मुद्रा, देवळीं निद्रा ) का ? आपटे नावात काहीं पाप आहे का ?

रघु०—( घाईनें ) तुम्ही गोष्टी लिहिता ?

[ श्री आपटे जणु काय गोष्टी लिहिणें म्हणजे सस्थानाचा कारभार पाहणें आहे, या अवसानात एक इच मान तुकवतात. रघुनाथ पटकन् उठून मदीकडे जातो. ]

रघु०—( तिच्या दडाला धरून तिला चागली हालवीत ) मदे–मदे—

मदा०—( त्रासून ) ऐक रे बुवा ! उगीच का छळतोस ? तेव्हा यमू, मग मीं अस ठरवल आहे की—

रघु०—मदे, माझ ऐक आधीं. ( दोघीजणी त्याच्याकडे पाहतात )

मदा०—अरे, आग का लागली आहे थिएटरला ? तस असेल तर आम्ही पळून जातों.

रघु०—अग, तो पाठीमाग बसला आहे ना मनुष्य ?—

मदा०—मग तो मनुष्य नसून गोरीला वानर निघाला का ?

रघु०—तो नारायणराव आपटे आहे !

मदा + यमुना—कोण ? ( रघुनाथ पुन्हा सागतो.)

मदा०—( यमूचा हात धरून ) यमू ऽऽ

यमुना.—( मदीचा हात धरून ) मदे ऽऽ

[ दोघीहिजणी एकमेकींकडे पाहतात शब्दाच्या साहाय्यावाचून विचार ठरतो ]

मदा०—( खाली पाहून ) अग, माझ्या चपल्या घातल्यास वाटत ?—

यमुना—( खालच्या मानेनें ) दृष्टिभ्रम झाला वाटत इतक्यातच ? पायाखालच्या चपल्या दिसेनाशा झाल्या अ ! समज, कीं—

[ मदा तिच्या हाताला धरून जवळजवळ फरफटतच तिला ओढते. रघुनाथ मदीचा अर्धा राहिलेला शेंगाचा पुडा हातात घेऊन पाठोपाठ धावत जातो ]

गुण्या—साहेब, उद्या मी येऊ ?

आपटे—( एकदा आपटे योगी पर्यटन् ग्रहकाक्षया इत्यादि श्लोकात सागितल्याप्रमाणें जमिनीवर येऊन ) काय म्हणालास ? ( एकदम परिस्थिति

ओळखून ) उद्या येणार म्हणतोस ? ये कीं, अवश्य ये. तुला आता पुष्कळ काम देईन मी. हुषार मुलगा आहेस तू---( उठून बाहेर जाऊ लागतो )

[ चि. गुण्या चक्क लाजतो, आणि दोन्ही हाताचे दोन्ही अगठे तोंडात घालतो ]

## प्रवेश २ रा

[ 'बोलेल तो करील काय' ही म्हण स्त्रीजातीला उद्देशून केली आहे, की काय असे वारवार वाटतें मदा इतकी बोलली पण शेवटी पैजेंत हरलीच. श्री. आपट्याना प्रत्यक्ष पाहिल्यानतर मदा गोष्ट लिहिण्याचे ध्येय लगेच विसरून गेली. अप्रत्यक्ष आपटयाच्यावर तिला सूड उगवावयाचा होता, पण प्रत्यक्ष आपटे,--त्याच्याविरुद्ध लिहाव तरी कस, बाई ! ]

मात्र मदा शब्दाला जागली वडिलानी वरसशोधन केलें जावई पसत केला, आणि मदीला ते थट्टेने म्हणाले, " काय ग, ए पोरी,—तुला M A नवरा चालेल ना ? का एखादा I C S पाहू ? " मदीनें विचार केला मनाशीं की महाराष्ट्रात I C S आहेत कुठे ? त्यापेक्षा M A काय वाईट ? अन् त्यातून लेखक ! चागली खरड काढू. अगदीं मुळींच मागें घेऊन चालणार नाही पाहिला प्रश्न हा, कीं तुम्ही आम्हा बायकाच्याविरुद्ध काय म्हणून लिहिता ? लिहिलेंत तें लिहिलेंत, झालें ते गगेला मिळाले, आता पुन्हा मी असे बिलकुल लिहू देणार नाही. तुम्हाला जर माझ्याविषयी थोडस वाटत असेल तर घ्या पाहू माझ्या गळ्याची शपथ !

सुमारें आठ महिन्यानीं मदाराणीने श्री आपट्याच्या मातोश्रीकडून पहिल्याप्रथम वेणी घालून घेतली

नारायण आता पाच फूट लाबीच्या साखळीनें खाबास बाधलेल्या कोंकरा-प्रमाणें घराची चतु.सीमा ओलाडण्यास धजावेनासा झाला. ससारात पडणें इतके धोक्याचें असेल तर,—विचारच करायला पाहिजे आधीं ! शिकलेल्या मुली विवाहाचा कटाळा का करतात, तर म्हणे व्यक्तिस्वातंत्र्य जातें व्यक्ति-स्वातंत्र्य जातें, कबूल. पण प्रश्न हा, की कुणाचे ?

आपल्या परिचित विदुषी कु यमुताई आता पुण्याच्या शिक्षणसस्थाना कटाळून मुबापुरीच्या शिक्षणसस्थेकडे वळलेल्या आहेत अर्थात् त्याच्या

कानावर ही गोष्ट गेली होती त्याचें एक लाबलचक पत्रहि पण आलें पण पत्रात अश्लील मजकूर फार असल्यामुळें ते पत्र पोस्टात गहाळ झालें असेंच आपण धरून चालू यमुताईचा बी. ए. होण्याचा निश्चय अजून टिकलेला आहे परमेश्वर करो आणि त्याचा निश्चय तडीस जावो

रघुनाथ आता University, centre वगैरे वगैरे गप्पा मारण्यात दग असतो

चि गुणवतराव भिकाजीपत 'रसवन्ती' मासिकाचे फिरते एजट झाले आहेत. सकाळच्या प्रहरी गावभर फिरताना त्याना विविध तऱ्हेचीं विशेपणात्मक सबोधने लावण्यात येत आहेत 'ए रसवन्ती' म्हणून त्याना हटकण्यापर्यंत पुण्यपत्तनस्थाची मजल जात असते

[ वेळ सकाळची आहे हजार डोळ्याचा भगवान् सूर्यनारायण झोपेतून उठल्याला बराच वेळ झाला आहे दोन डोळ्याचा मनुष्य नारायण नुकताच उठून टॉवेलला ब्रश पुशीत बाहेर येतो आहे नारायणराव डाव्या बाजूची खिडकी उघडतात, अन् बाहेरच्या नारायणाकडे पाहून स्वत:शींच हसतात. सौ मदाराणी एका हातात किटली आणि दुसऱ्या हातात दोन कपबशा घेऊन बाहेर येते आणि शिकलेल्या मुलींना गृहव्यवस्थाच नाहीं म्हणून लोक ओरडतात ! ]

मदा०—( हातातील सामान टेबलावर ठेवीत ) आज मात्र हद्द आहे ! किती वेळ झाला उन्ह पडून !

नारायण—काय म्हणलीस ?

मदा०—म्हणायचय् काय ? माझी घरातली सगळीं काम उरकलीं. ( उजव्या हाताच्या करगळीने डाव्या हाताची बोटें मोजीत ) दोन्ही ठिकाणचे केरवारे झाले. गुण्याकडून भाजी आणवून घेतली. दूधवाल्याचा हिशेब चुकता केला शेजारच्या विमलाबाई आल्या होत्या, त्याच्याशीं इकडे तिकडे केल,—तरी इकडे काही त्याच आहे का ?—

नारायण—( हसून ) इकडे काय असायच आहे ? झोप लागल्यावर मनुष्याला तिकडच कळणार तरी कस ? आणखी तिकडे माहेरी पळून गेलीस तरी मला काय पत्ता लागणार ?

मदा०—(चहा कपातून भरताना) इतक्या झोपा लागतात तरी कशा मी म्हणतें ? आई तर पहाटेपासून सारखी जागी असते

नारायण—तुझी आई अजून कॉलेजात Lecturer म्हणून शिकवायला जात नाहीं अन् रात्री दिव्याशीं बसून गोष्टीहि पण खरडीत नाहीं. तू आल्यापासून मला कॉलेजातली जागा पत्करण भागच पडल आज रविवार आहे म्हणून झाला जरा उशीर

मदा०—(हसन) कसल आल आहे ? आपला आळशीपणा कोण सागेल ?

नारायण—तुझ म्हणण तरी काय आहे ? मी आळशी आहें हाच तुझा आरोप ना ? कबूल मी आळशी आहे, तू तर उद्योगी आहेस ना ? हसू नको. 'उद्योगी' शब्द मी चागल्या अर्थान वापरतों आहें अग, ससारात हें अस चालायचच ससार म्हणजे दोन चाकाचा रथ असतो दोन्ही चाक चागली असताना रथ हाकण्यात काय कौशल्य आहे ? एक चाक सिक पडल असताना दुसऱ्याच्या आधारावर रथ चालवण्यात डोक आहे. बर, तें तत्त्वज्ञान राहू दे बाजूला, आज तू मला चहा दे. उद्या पाहिजे तर मी लवकर उठून तुझ्या या उपकाराची फेड करीन

मदा०—हो ! म्हणजे आजूबाजूच्या बगल्यातल्या लोकानीं म्हणाव, की पाहिलत ! अहो हे शिक्षण ! बिचारा गुरासारखा राबत असतो हिला काही त्याच आहे का '!

नारायण—म्हणूनच तर मी लवकर उठत नाहीं ! तुला चार लोकानीं चागल म्हणण्यातच मला भूषण आहे. आज विमलाबाई आल्या होत्या ना ? उद्या त्या शेजारच्या कमलाबाईना मुद्दाम बोलावण धाड, आणि त्याच्या-देखत केर-पोतेऱ्यासारखीं काम हौसेन कर ! बघ तुझी स्तुति होईल कीं नाहीं तें ! तू पाहत नाहींस का ? कोणी चार लोक आले, कीं मी लगेच टाक-दौत घेऊन लिहायला सुरुवात करतों. अग ह्या जगात बडेजाव वाढवायला आपणच पुढाकार घ्यावा लागतो

मदा०—(चहा पुढे करून) हें पहा ! मी काहीं लेखक नाहीं इतक बडबडायला ! मला दुसरीं काम आहेत.

नारायण—पण लेखक म्हणून मिरवण्याची मला वाटत काहीं दिवसापूर्वी तुझी इच्छा होती ! (तिचेच शब्द तिच्यापुढें टाकीत) सध्याच वाङ्मय

केवळ पुरुषी थाटाच आहे. स्त्रियाची Psychology कुणालासुद्धा धडपण देता येत नाहीं, आणि या गोष्टी सुधारण्याकरता तू त्या शभूमहादेव आपट्याला उत्तर देणार होतीस ना ? मदे, सायकॉलॉजीच स्पेलिंग काय ग ?

मदा०—( विचार करते. 'cho' का नुसतंच 'co' कुणास ठाऊक ? ) त्याच आता काय नडल आहे ? लवकर कपबशी रिकामी करावी मला अजून तांदूळ धुवायचे आहेत अन् हो ! रघुनाथ येणार आहे आज इकडेच जेवायला.

नारायण—आज तो तुझा गेस्ट वाटत ? मग आज माझा एक गेस्ट आहे गुण्या मासिकाचे अंक आता घेऊन येईल, तो इथच जेवेल.

मदा०—ही का खानावळ आहे वाटत ? रोज उठून दुसऱ्याच्या खस्ता खायला माझे काहीं हात पर आले नाहीत अन् त्या पोरट्याला इतका काय डोक्यावर घेऊन ठेवलाय ?

नारायण—अस्त समधा शान्त हो ! तुला जस गणगोत आहे तसच मलाहि पण आहे मला धाकटा भाऊ नाही, त्या पोऱ्यालाच मी आपला भाऊ समजतों. मदे, तुला कल्पना नाहीं त्या पोराची. आज तो किती उपयोगी पडतो आहे माझ्या ! आपल्या लग्नात दिवाबत्तीपासून तों शेला-पागोटं गुंडाळणाऱ्या धेडापर्यंत हा घोडा घोळीत होता मी त्याच्या तोंडात मारल्यापासून विडया ओढणसुद्धा पोरान टाकलन्—

मदा०—जळक्या सिगारेटस् ओढीत असेल—

नारायण—मी जर त्याला उडी टाक म्हणून म्हणालों तर तो खात्रीन उडी टाकील आता तुझा भाऊ पहा. ( कपबशी खाली ठेवतो ) त्याला मीं त्या दिवशी अगदी गोडीन सागितल, कीं " भाऊराया, आता तू आपल्या बहिणीला मदे या उर्मट संबोधनान हाक मारण्यात काहींच स्वारस्य नाही तुम्ही लहान होता तोंपर्यंत ठीक होत. पण आता मदा एका घराची मालकीण झाली आहे निसर्गाच्या नियमानुसार उद्या ती चार लेकरा—" ( मदा पटकन 'इश्श' म्हणून पाठ फिरवते. ) हें अस्स चुकत आम्हा लेखकाच. कुठ काय बोलाव याचा विसरच पडतो अजिबात. सागायच कारण हें कीं—

मदा०—( कपबशी आवरीत फणकाऱ्यानें ) चलाऽऽ ! पुरे झाल ! त्या पोराला आणखी नसत काहीं सागून चिथवून ठेवल म्हणजे आई मला बोलेल

नारायण०--तो आला तर बोलू सुद्धा नको त्याच्याशीं ? पुन्हा म्हणशील कीं माझ्या भावाचा 'दुष्टावा' करतात.

मदा०--( आठवल्यासारखें करून ) हो ! अक आल्यावर मला आधीं पाहिजे ह !

नारायण०—कशाला ? चुलींत घालायला का ? ( मदा 'हो' म्हणून ठसक्यानें उत्तर देऊन जाते.)

[ नारायणराव स्वत.शीच एक मोडकीतोडकी तान घेतात. अगदीच बेसूर तान ती. तरी पण त्याना ती बरी वाटते सहजच तोंडावरून हात फिरवतात. दचकून समोरच्या आरशात पहातात विचार येतो की आहे वेळ,--जमेल पण पुन्हा आठवण होते, कीं आज एकादशी आहे अगदीच धर्मबाह्य वर्तन बरे नाही. एकादशीला जेवले तरी काही हरकत नाहीं, पण--इतक्यात हातामध्यें वासवानी, बानर्जी इत्यादि धुरधराच शिलालेख ( कीर्द-खतावण्या ) घेऊन रघुनाथराव ( Matric ) प्रवेश करतात. नारायणरावाना पाहून अदबीनें टोपी खुटीवर ठेवतो.]

नारायण--आज काय ? तास होता का रे ?

रघु०—नाहीं, पण दुपारीं गावात जायचा त्रास नको अन् अभ्यासहि बुडायला नको म्हणून—

नारायण—( कौतुकानें मान डोलवीत ) हो ! तू मॅट्रिकच्या क्लासात आहेस, नाही का ? सौभाग्यवतीला मणिमगळसूत्र त्याप्रमाण मॅट्रिकच्या विद्यार्थांना हे वासवानीचे ग्रथ लागणारच

[ जसे काही हे अगदी नोटस्‌शिवायच पास झाले ! ]

रघु०--( काय बोलणार ? मुकाटयानें पुस्तकें टेबलावर ठेवतो आणि आत जाऊ लागतो ) मदे—( जीभ चावतो ) ताईऽऽ ( मदा तादुळाची रोवळी घेऊन बाहेर येते. )

मदा०--आत्ताच आलास का ? अन् रघू, येताना तुला आईकडून दोन कपबशा, गाळण, चमचे, चकल्याचा सोऱ्या आणायला सांगितल होत तें काही तुला आठवल नाहीं ना ? इकडे सागाव तर 'आज विसरलों', 'काय कराव ? असल सामान पुरुषानीं कस आणाव ? ' हीं उत्तर सिनेमा नाहीं तर नाटक असू द्या, अगदीं धावत म्हटल तरी 'हो, चला कीं !'

नारायण—हें बघ, लहान पोरासमक्ष का अशी अब्रू काढतेस ? त्यात तुझीच पत जाते आहे ज्या बाईला नवरा आपल्या ताब्यात ठेवता येत नाही तीच अशी कुरकुर करील. रघुनाथ, तू हे शब्द विसरून जा. असच समज, की आम्ही दोघहिजण आत्ता कानडींत बोललो.

रघु०—ताई, तू ऐकून तर घे आई ते सगळ सामान गुण्या आज सकाळीं गावात आला होता त्याच्याबरोबर धाडणार आहे. मी आणणार होतों पण गुण्या म्हणाला 'मी नेईन.'

नारायण—(शर्टच्या कफ-गुड्याशीं खेळत, अर्धवट मद्रीकडे पाहून) तरी आपले वाडवडील सागत आले आहेत, कीं आधी सगळ ऐकाव नि मग बोलाव

[ मानेला हिसडा देऊन मद्री आत जाते रघुनाथ घरकोंबड्यासारखा चुलीशीं बसायला म्हणून आत जातो नारायणराव खुटीवरच्या कोटाचे खिसे तपासतात टेबलाच्या ड्रॉवरमध्यें डोकावून पाहतात. सिगारेटचें एक थोटुकहि घरात शिल्लक नसते घरात सिगारेट नाही म्हणजे काय प्रश्न आहे ! गुण्या आला की काय ते पाहण्याकरिता खिडकीबाहेर पाहतात तों—काय ? कु यमुनाई फाटकातून शिरताना दिसतात कु. यमुताई दरवाजाला लाथ मारून सोसाट्याच्या वायुगतीने आत शिरता। पोशाख प्रवासातला असतो. पिना लावून नेसलेलें गुलाबी रगाचे पातळ, पायात मद्रासी चपला, डाव्या हातात रिस्टवॉचची घडी, उजव्या हातात स्त्रियांच्या मासिकाचा एक अक, इत्यादि थाटाने यमुताई मैत्रिणीकडे आलेली असते. पण नारायणरावाना पाहताच बिचकते ]

नारायण—(मोठ्यानें) रघुनाथ, ए रघुनाथ, मद्रीला म्हणाव आता पुरे झाल तुझ पाकशास्त्र, बाहेर ये म्हणाव बाहेर कोण आल आहे तें पहा

रघु०—(बाहेर येऊन) ताईऽऽ ऽ, अग यमुताई आली—यमुताई आली.

मद्रा०—(लगबगीने बाहेर येऊन) कोण, यमे ! फार लवकर उगवलीस हो बारा वर्षांनीं भेटणाऱ्या सुहृदाच तेलात तोंड पहाव म्हणतात, आणू का थोडस तेल ?

यमुना—आज मी तुझ्याकडे जेवणार आहें.

नारायण—आमच्याकडे फक्त दापत्याची सोय होत असते !

यमुना—तर, तर ऽऽ ? ( लगेच लाजून स्वेटरच्याआड तोंड लपवते )

नारायण—( डोक्याला टोपी अडकवीत ) मीं जरा कोपऱ्यापर्यंत जाऊन येतों

मदा०—( जाण्याचें कारण ओळखून ) डबा घरात आला तर मी फेकून देईन ह !

नारायण—( बाहेर सटकताना ) मी डबा आणणारच नाहीं पाकीटच आणीन. ( हसत जातो. )

यमुना—( आश्चर्यानें ) ही खडूच्या काडीची नवीन दीक्षा वाटत ? पूर्वी नव्हत अस काही !

मदा०—( किंचित् शरमिंद्या आवाजात ) अग, काय—बोलायच काय माणसान ? नसतीं व्यसन उगीच लावून घ्यायची माग. बर, बोलायला जाव तर त्याच काही नाही. तुम्ही रागवा, रुसा, भांडा, काय वाटेल ते करा. स्वभावात बदल म्हणून नाही

यमुना—आता Lecturer ची जागा मिळाली ना ?

मदा०—अग, गोष्टी लिहून का कुठ पोट भरणार आहेत ? हो, पण तू अशी उभी किती वेळ राहणार ? ( तिला खुर्चीवर बसवते ) रघू, तेवढ आत जाऊन दूध वर आल का पाहून ये बर. अन् हे बघ, वैलावर आधणाच पाणी आहे. हलकेच चहा करशील का ? [ रघू मनात चरफडतो. पण यमुताईविषयी त्याला आदर वाटत असल्याकारणाने मुकाट्याने आत जातो. मदा यमूच्या खांद्यावरच्या स्वेटरशी खेळत टेबलावर बसते दोघीजणी आपलीं नवीन नातीं विसरतात आणि अगदीं सख्ख्या बहिणीबहिणीप्रमाणे एकमेकाशी आपलें मन मोकळे करतात. ]

यमुना—तुझ्या लग्नाला येण्याकरता मी किती धडपड केली. पण आईची अगदी प्राणान्तिक अवस्था. माझ पत्र तुला मिळाल ना ?

मदा०—( हसून ) मिळाल अन् हातात पडल माझ्यादेखत वाचायच सुद्धा झाल.

यमुना—( घाबरून ) म्हणजे ? नारायणरावाना तू दाखवलस की काय ते पत्र ?

मदा०—अग, हातातून ओढून घेतल्यावर मी काय करणार ? मी म्हणाले

सुद्धा, कीं 'दुसऱ्याची पत्र वाचण पाप आहे.' मला उत्तर मिळाल की, 'अर्ध्या पापाची वाटेकरीण तू आहेस ' बोल आता ! आणि यमे, त्यान तुझ काहीच नुकसान नाहीं. पत्र वाचल्यावर लगेच म्हणणं झाल, कीं 'ही मुलगी कदाचित् लेखक म्हणून पुढ येईल ' तेव्हा मला अस वाटायला लागल आहे, कीं लेखक व्हायला माणसान अश्लील बोलाव लागत की काय !

[ यमुना मासिकाचा अक पाठीमागे दडवते ]

यमुना--माझ ऐक तू, मदे तुला अश्लीलपणा म्हणजे मोठा बाऊ वाटतो, पण अश्लीलपणा म्हणजे काय, म्हणून विचारल तर तुला सागता येत नाहीं. अग सगळे मनाचे खेळ असतात. मानल तर आहे, नाही तर नाहीं. मी पूर्वी पुण्यात होतें तर कित्ती साधीभोळी होते ! पण मुबईच वातावरणच काही निराळ मुबईला किती तरी गोष्टी आम्ही अगदी निर्भयपणान करतों. त्या लीगचा तो मेबर, मीं तुला सागितला ना ?—त्याच्याशीं मी बोलत होतें तर केवढा त्याचा ग्रथ झाला इथ अन् मुबईला तर मी रोज दहाजणाच्याबरोबर गप्पा मारते.

मदा०—मला मोठी काळजी वाटते आहे यमे, की तू ससार कसा करशील ? तुझ्या एका तोडाला दहा तोडाच बळ आल्यासारख दिसत आहे.

यमुना—अग मी 'समान हक्क' मागणार नाहीं मी सगळेच हक्क मागणार आहें 'घर माझ आहे, मी सागेन तेव्हा जेवल पाहिजे !' अशी माझी सक्त ताकीद घरात फिरल. अन् तेच सागायला आज मी मुदाम मुबईहून पुण्याला आले आहे.

मंदा०—(आश्चर्यानें) म्हणजे ? बरोबर यजमानराजहि घेऊन आलीस वाटत ?

यमुना—छे. ! छे. ! अग तू घाबरू नकोस. आज मी एकटीच तुझ्या इथ येणार आहे. माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच, कीं बाबानीं मला आता रीतसर नोटीस दिली आहे. 'माहेरच दिवाळ काढू नका. आता शिक्षण पुरे झाल' अशा अर्थाची भाषासरणी सुरू होऊन आज दोन महिने झाले. अन् आठ दिवसापूर्वी मी दुपारचा चहा करतें न करते तोच एक बूटसूटवाला आला कीं घरात. बाबा गेले होते बाहेर मी पुढ होऊन विचारल 'कोण

पाहिजे !' खालीं मान घालून त्यानीं बाबाची चौकशी केली. दुसऱ्या दिवशी बाबा घरात होते अन् मग मला कळल

मदा०—ह्यात Discount किती परसेंट ( per cent ) —?

यमुना—म्हणजे ? सगळ्या तुला थापा वाटतात का ? आईला विचार—

मदा०—बरोबर आहे, तेवढ तुझ्या आईला विचारण्याकरिता मुंबईला येतें बर पण आपले भावी पतिराज करतात तरी काय ? की आहेत इनामदार कुठल्या गावचे ?

यमुना—मदे, मीं आपल्या मनाशी विचार केला, महाराष्ट्रात पैसेवाले लोक फार थोडे आहेत. जवळजवळ नाहीत म्हटल तरी चालेल बर, I C S आहेत कुठ ? आपले सगळे B A, M A एक कारकून तरी होतात नाही तर हमाल तरी होतात पेरावाई सपली अन् आपले हाल सुरू झाले. आता आपणा मुलींच्यापुढ प्रश्न हा आहे, की कारकून बरा की हमाल बरा ? मी आपला एक हमालच पत्करला. त्यानी तरी बिचाऱ्यानी नोकऱ्या आणाव्यात कुठल्या ?

मदा०—पण त्या हमालाचा मासिक तनखा काय आहे ?

यमुना—असेल शे-दीडशें नुकतेच B E झाले आहेत. मदे, अग पूर्वीचे आपले सुखाचे दिवस गेले. आता हल्लीच्या मुलींनीं त्या कल्पना सोडल्याच पाहिजेत. मला पुष्कळ वाटत होत, कीं काही नाहीं तरी निदान चार हजार रुपये महिन्याला मिळवणाऱ्या प्राण्याला गाठावा पण आता आयुष्यात परिस्थितीशी झगडाव लागणारस दिसत आहे

मदा—पण तुझ्या B. A ची काय वाट ?

यमुना—B A ! ( हसते ) बायकाच्या बाबतीत शिक्षण ही एक करमणुकीची गोष्ट आहे शिक्षण करून त्या शिक्षणाचा पोटापाण्याकडे उपयोग करणाऱ्या पुरुषवर्गाची गोष्ट निराळी असते.• त्याना शिकण भागच पडत जास्ती शिकतील तर पोटाला खातील आपली गोष्ट निराळी आहे. अजून शिक्षणाचा उपयोग केवळ पोटापाण्याच्या सोईकरताच करावा 'अशी युरोपातल्या बायकाप्रमाण आपली स्थिति नाहीं केवळ नवऱ्याला धमकी देण्याकरता म्हणून आपल्याकडल्या बायकानी शिकायच. आता मी धमक्या देण्यात वस्ताद आहे.

मदा० —पुरे, अजीर्ण होईल ! तू तर अगदीं तत्त्व बोलून राहिली आहेस आज !

यमुना—रघुनाथाचा चहा होईपर्यंत तुझी करमणूक तरी चागली झाली ना ? (मोठ्यानें) ए पोऱ्या, अरे दोन कप चहा आणायला किती उशीर हा?

[ रघुनाथ हातात लोखडाची पळी घेऊन येतो ]

रघु०—घरात पुरुषमाणस कुणीच नसल्यासारख केवढ्यादा ओरडता ? दोघीच्या जिभेला डाग दिला पाहिजे, म्हणजे पुढ जन्मभर बोलण बद

यमूना—ऍ हॅ ! काय धाक पण ! त्या पळीन तुलाच डाग देतें, थाब—

[ म्हणून दोघीजणी त्याच्या अगावर धावून जातात तो आत पळतो ]

मदा०—( मासिक पाहून ) अग यमे ! नवीन अक आला वाटत—पाहू, पाहू.

यमुना—( मासिक दडवीत ) माहिती आहे तुझी गोष्ट आहे ती. ( मासिक चाळीत ) गोष्टीच नाव काय, तर म्हणे "इश्श !" लेखिका–श्रीमती सौ मदाकिनी आपटे ही बघ सापडली गोष्ट आली खरी तुझी, पण पैजेची मुदत टळलेली आहे

मदा०—आणि मी आपल्या शब्दाला जागलें आहें

यमुना—आणि मुदत गेली तरी तू गोष्ट लिहिलीमच्च म्हणजे तू पैज जिकलीस अस मी समजतें तेव्हा आता माझा शब्द मी लवकरच खरा करणार आहें ( मासिकाकडे पाहत ) पण मदे, मी तुला दुसरी एक गमत सागणार आहें ह्या अकात 'राधाबाला' या नावाखाली जी गोष्ट आली आहे ती माझी आहे, आईच नाव राधाबाई. तिची मी मुलगी म्हणून— 'अजि राधाबाला मीच लेखिका' ( दोन्ही हात पसरून मान हलवीत त्या गाण्याच्या चालीचें अनुकरण करते इतक्यात नारायणराव हातात Passing Show चें अर्धवट उघडे पाकीट घेऊन येतात त्याना पाहून दोघीहि चटकन आत पळतात मात्र मासिकाचा अक तेथेंच पडतो )

नारायण—( स्वत:शींच ) गुण्याचा आज का पत्ता नाहीं ? कारट मोटार-खालीं सापडून मेल तर नाहीं ! की गेल विजेच इजन पाहायला ?

[इतक्यात 'कारट' धावतच आत शिरतें. डोक्याला पुरून उरणारी टोपी, अगात पायघोळ कोट, हातात केसरीचे काहीं अक, त्यावर 'रसवन्ती'

मासिकाचे काहीं अंक, अशा थाटात ही टपालगाडी विद्युद्वेगानं आत येते. नारायणराव दचकून दरवाजाकडे पाहतात. ]

नारायण—आज इतका उशीर का रे? की रस्त्यात बेदूल खेळत होतास?

गुण्या—( घाईघाईनें ) साहेब, साहेब—बाई कुठं आहेत?

नारायण—आधी हा बुवा काय विचारतो त्याचं उत्तर दे. कुठं होतास इतका वेळ?

गुण्या—मी? मी हपिसात गेलो होतों साहेब, त्याची गम्मत अशी झाली–( सर्व सामानासकट खालीं बैठक मारतो. ) काल रात्रीं भटसाहेबानी मला अंक दिले. आणि भटबाईसाहेबानी फुलवती मासिकाचे अंक दिले आज सकाळी मी सगळ्या दुकानात ते देणार होतो. मी रात्री सरवती आन् फुलवती दोन्ही अंक वाचले. बाईसाहेबानी एक गोष्ट लिहिली होती ती मी फुलवती मासिकात वाचली—

नारायण—( आश्चर्यानें ) म्हणजे! हिनं गोष्ट लिहिली म्हणतोस? अन् मग मला कसं सांगितलं नाही?—[ कसं सांगितलं नाहीं तें कळेल आता.]

गुण्या—अन् साहेब सरवती मासिकातली तुमची गोष्ट वाचली दोन्ही एकच वर नाव बाईचं—गोष्ट तुमची. वर नाव तुमचं—गोष्ट बाईची

नारायण—( अधिकच घोटाळ्यात पडून, गुण्याच्या हालचालीप्रमाणें स्वत. हात हलवीत ) वर नाव बाईचं, गोष्ट तुमची. वर नाव तुमचं, गोष्ट बाईची. ( त्याच्याकडे पाहून ) काय, म्हणतो आहेस काय गुण्या तू? आज काय दारुबिरु प्यायला आहेस कीं काय बाच्याबरोबर? वर नाव बाईचं–गोष्ट—

गुण्या—साहेब, हे पहा ( रसवन्ती मासिक दाखवतो. ) ह्यात तुमचं नाव आहे. ( पानें चाळीत ) हे पहा. ‘इश्श्’ ( उच्चार मात्र ‘ईश’ असा करतो. ) ले पुढं शून्य. श्री पुढें शून्य नारायणराव आपटे पुढें काहीं तरी इंग्रजी आहे आन् हेंच सगळं त्या फुलवती मासिकात आहे फकस्त नाव बाईचं.

नारायण—( यमूच्या हातून खालीं पडलेला फुलवन्ती मासिकाचा अंक पाहतात. ) अगदीं हेंच सगळं आहे असं कसं होईल? ( सौ. मंदाकिनी, ‘इश्श्’ वगैरे वाचल्यावर थक्क होतो घटकाभर विजेच्या खांबाप्रमाणें तटस्थ उभा राहतो. ) खरंच की, तीच गोष्ट. अन् एक स्त्रियाच्या मासिकात अन्

एक ह्या मासिकात. फक्त लिहिणाऱ्याचीं नावें निराळीं. ( स्वत:शीच ) हा काय हिन घोटाळा केलान् ?

गुण्या--मी हपिसात गेलो. भटसाहेबाना दाखवल. भटबाईसाहेबाना दाखवल दोघहि मलाच शिव्या देऊ लागली मी पळून आलों

[ इतक्यात बाहेरच्या बाजूस 'अरे, What-What-What' असा ध्वनि ऐकू येतो थोड्या वेळाने 'What-What-What' या ध्वनीचे मालक आत प्रवेश करतात. श्री भट, सपादक रसवन्ती मासिक ते हेच गुरु. पायात पुणेरी पद्धतीचीं पादत्राणें,--म्हणजे अर्धवट तपकिरी, अर्धवट किरमिजी, अर्धवट लाल, अर्धवट- वगैरे वगैरे अर्धवट सगळ्या रगाचा जोडा. बिन कानाचा, एक गुडीचा, मुडीछाट (म्हणजे गळ्यापाशी फाटलेला) सदरा, त्यावर दोन्ही कोपरावर फाटलेला बिनरगी किंवा सर्वरगी पार्शी फॅशनचा लॉग कोट वरच्या तीन गुड्या बेपत्ता, त्यामुळे आतला सदरा बाहेर डोकावतो आहे टोकीवर जर नसलेला, जरीचा रुमाल. डोळ्यावर मात्र आधुनिक पद्धतीचा वाटोळ्या काचेचा चष्मा एका बाजूची काडी पुड्याच्या दोऱ्याने आवळून बाधलेली आहे. हातामध्यें सायकलचा पप कारण, सायकलच्या चाकावर विश्वास ठेवणें केव्हाहि शहाणपणाचे ठरणार नाही. 'झुकु झुकु' करीत सायकल चालणार अन् एका मैलात चार ठिकाणीं पड पडणार ! ]

भट--( दरवाजातून ) अरे, What-What-What ? नारायणराव आहेत का घरात ?

नारायण--आहेत, आहेत. या, या आत या ना हो भट. ( श्री भट पुन्हा एकदा, अरे What-What-What 'आलों ह' या अर्थानें पुटपुटत आत येतात. ) का ? आज सपादक महाशय गरीब लेखकाच्या भेटीला आले ?

[ भट काहीं एक न बोलता आजूबाजूला चष्म्यातून पाहत उभे राहतात. जरा वेळानें नारायणराव पुन्हा एकदा 'कुत. आयात.', 'कोऽर्थ.' वगैरे विचारतात. महाशय एकवार चष्म्यातून नारायणरावाकडे आपादमस्तक न्याहाळून पाहतात आणि मनाशींच पुटपुटतात--'अरे, What-What-What--अरे, हा काय घोटाळा ? नारायणरावाना त्याची बोली उमगते

पण समजलें असें दाखविण्याची ही वेळ नसल्यानें दाताच्या साहाय्यानें हाताच्या बोटाची मशागत करू लागतात श्री भट गुण्याच्या ध्यानाकडे पाहतात धुमसणारा ज्वलत्पर्वत पुन्हा एकदा पेट घेतो. ]

भट—काट्यां, अवलक्षणी पोरगा,—( गुण्या केसरीच्या पानावरचा सिंह पुढें करतो ) तुला पोटाला लावल तर तू धन्याला सताव्न सोडलस

गुण्या--मी काय करणार, भटसाहेब ? मला दिसल–मीं सांगिनल मीं पाहिल, बाईसाहेबाची गोष्ट–साहेबाच नाव. साहेबाची गोष्ट,–बाईसाहेबाच नाव. मला काय–मी तुम्हाला सांगितल आन् भटबाईसाहेब फुलवती मासिक लिहितात म्हणून त्याना सांगितल मला गरिबाला का— ?

भट---( रागानें ) उनाड आहेस, चळवळ्या आहेस, क्रान्तिकारक आहेस, कम्युनिस्ट आहेस--बोल् नकोस तुला कायदा दाखवला पाहिजे तुझ्यापुढ कायदा रद्द आहे (नारायणरावाकडे वळून) अरे What–What–What ? नारायणराव, हा काय गोंधळ झाला आहे ? स्त्रियाच्या मासिकात तुमची गोष्ट अन् नाव तुमच्या–तुमच्या सहधर्मचारिणीच आपल्या मासिकात तीच गोष्ट नाव तुमच ! धर्मे च अर्थे च कामे च नातिचरामि म्हणून तीनदा शपथ घेतलीत त्या वेळेला मासिकाला गोष्ट लिहिण्यातहि तिला मदत करीन अशी शपथ नव्हती ना घेतलीत ?

नारायण--हा असा का गोंधळ झाला, काही कळत नाही माझी फेअर कॉपी सापडेना म्हणून मी तुम्हाला रफ कॉपी दिली मग काय फेअर कॉपी तिने तुमच्या पत्नीकडे फुलवन्ती मासिकाकरता दिली, कीं काय झाल– काहीच कळत नाहीं !

भट—अरे What-What-What ? हा सगळा स्त्री शिक्षणाचा परिणाम ! घरचा छापखाना पाहिला आणि स्त्रियाच मासिक काढण्याची आमच्या हिला लहर लागली इतके दिवस लहान पोर म्हणून गय खाल्ली. आता तर ही धडधडीत चोरी करू लागली आमच्या अंकातल्या गोष्टीसुद्धा ही आपल्या अंकात घेऊ लागली. पुन्हा वर हिकमत कोण ? अरे, तुमच्याच बायकाच्या नावाखालीं त्याच गोष्टी दिल्या म्हणजे तुम्ही काय करणार ? अरे, What-What-What-अशान कुठ वाङ्मयवृद्धि होत असते ?

[ गुण्या त्याच्या हालचालीकडे लक्षपूर्वक पाहत असतो त्याला एवढें

ज्ञान आहे, कीं भटसाहेब आपल्या घरधानिणीवर, त्याच्या पश्चात्, नेहमीच असे गरम होत असतात. ]

भट--आता हा गोंधळ कसला माजला आहे, पहा! दोन्ही अंक बाहेर पडलेले ह्या पोरट्यान मला आता दाखवल म्हणून बर, दोन्ही अंक मी लगेच ठेवून दिले, आज पोस्टात धाडले असते तर मग मला बाहेर तोंड काढायला जागा नव्हती! अरे, What-What What! (म्हणजे हरे राम, शिव शिव!)

नारायण--पण दोन्ही मासिक एका कारखान्यात होतात तर बाकीच्या लोकाच्या कस लक्षात नाही आल? त्याच्या दृष्टोत्पत्तीस ही गोष्ट कशी नाही आली?

भट--अरे, What-What-What! (म्हणजे, तें काहीं विचारू नका.) त्याच्या मागल्या अकात आमच्या कपॉझिटर्सनी स्वातंत्र्याचें ध्वजारोपण केलें म्हणजे दर पानागणिक स्वत'ची अक्कलहुशारी चालवली 'राम' नाव असेल त्या ठिकाणी 'रमा करून ठेवल इंग्रजी पार्लमेंट ज्याप्रमाण 'can do and undo anything' त्याप्रमाण त्या पार्लमेंटच्याहि पुढ जाऊन पुरुषाची नाव स्त्रियाना आणि स्त्रियाचीं नाव पुरुषाना बहाल केलीं. अर्थात् मला स्वतंत्र बाण्याचा, वृत्तीचा अभिमान वाटला, कौतुक वाटल, गौरव करावास वाटू लागल पण फुलवन्ती मासिकाची संपादिका निराळ्याच चष्म्यातून पाहू लागली. चूक कुणाची, दोष कुणाचा, अपराध कुणाचा अन् मला तिच भाषण साद्यंत ऐकावं लागल तिन लगेच आपल्या मासिकाकरता निराळे लोक आणले सध्या छापखाना एक पण छापणारे दोन अशी द्विदल-राज्यपद्धति सुरू आहे. डायार्कीचे परिणाम फार भयंकर असतात, म्हणून मी तिला किती तरी वेळा सांगितल, पण लुच्च्या इंग्रजाप्रमाण ही लक्षच देत नाही. बाहेरच राज्य चालवणारे लोक हट्टी, घरातले सत्ताधिकारी हे असे हट्टी. म्हणजे माणसान जगात राहण्याची सोयच उरलेली नाहीं.

[ इतक्यात् बाहेरच्या बाजूस पिपाणीच्या आवाजासारखा कर्कश आवाज होतो श्री. भट एकदम खुर्चीवर बसतात. धीरवीरनर गलितधैर्य बनतो. 'ऑ! बाईसाहेब आल्या की' म्हणून गुण्या ओरडतो नारायणराव आल्या प्रसंगाला धैर्यानें तोंड देण्याकरता मनाची बळकटी अजमावून पाहतात.

श्री. भट 'लहान पोर' म्हणून म्हणाले तरी पण ही लहानपणाची व्याख्या पाहून हसावें कीं रडावें हेंच समजणें कठीण आहे. ]

लहान पोर—( धापा टाकीत गुण्याकडे पाहून ) हा ?—हा भिकारडा इथ कसा ? काय रे ए मेल्या लुच्च्या, तुला काही तरी लाजबीच आहे कीं नाहीं ?

गुण्या—( निर्लज्जच तो ) बाई, मीं काय केल ?

बाई—( उत्तर देण्याचे टाळून नारायणरावाकडे वळतात. ) मदाकिनी आहे का घरात ?

नारायण—घर सोडून हल्लीं ती मासिकात शिरली आहे.

बाई—मी त्या गोष्टीची चौकशी करण्याकरता आलें आहें त्या बिचारीची गोष्ट तुम्ही आपल्या नावावर का दिलीत ?

नारायण—कारण ती माझी होती म्हणून !

बाई—तुम्ही दुसरी लिहायची होतीत

नारायण—ही काही सबब नव्हे.

बाई—( चढत्या आवाजात ) तेच सागते काय ? स्वार्थ सगळा. एखादी गोष्ट आली बायकोच्या नावावर तर त्यात तुम्हा लोकाच बिघडत तरी काय, कुणास ठाऊक जिथ तिथ 'अहम्' पुरुष म्हटले म्हणजे येथून तेथून एका माळेचे मणी आम्ही बायका तुमची काळजी घ्यायला आहोंत या जगात म्हणून बर, नाही तर हें जग म्हणजे एक मोठ्ठथोरल वेड्याच इस्पितळ बनल असत. का तुम्हाला व्यवहारातल धोरण असत, का तुम्हाला तारतम्य-ज्ञान असत, का तुम्हाला चार लोकात कस वागाव हें समजत—मी म्हणतें तुम्हाला येतय् तरी काय ?

भट—( हळूच ) 'तुम्ही' म्हणजे General you का Particular you ?

बाई—( एकदम ) काय म्हणालात ?

भट—( पपाशी खेळत ) मी ?—कुठ काय म्हणालों ? गाणसुद्धा म्हणू नये का ?

बाई—मधें मधें कशाला बोलता मग ? अन् चहाटळपणा किती करावा ? आता या वयाला शोभत का हें ? ( नारायणरावाकडे पाहून ) पाहिलत ? अस्स ज्या त्या ठिकाणीं मला सभाळून न्याव लागत. मी जर नसतें तर

सागा काय दशा झाली असती तें— बर, ती जाऊ द्या कर्मकटकट. आता नारायणराव, आपण अस पहायच, कीं मार्ग कसा काढावा ? एक गोष्ट दोन मासिकात आली आहे. लोक काय म्हणतील ? एक तुम्ही तरी ती गोष्ट तुमच्या बायकोपासून चोरली असावीत, अगर तिन तुमच्यापासून चोरली असावी. एक कुणी तरी चोर ठरणार. त्यातल्या त्यात मला वाटत, तुम्ही चोर ठरलात तर त्या बिचारीची तरी फजिती वाचेल. पहा, विचार करा. तुमचीच पत्नी आहे, तिच्या नावाची तुम्हाला काळजी !

भट—( नारायणरावाना हलकेच खुणावून ) अरे What-What-What ! ( म्हणजे मी सागितलें नव्हतें ? )

नारायण—मला एकच मार्ग दिसतो. तो म्हणजे एक मासिक या महिन्याला उशिरान काढाव. मी दुसरी एक गोष्ट लिहितों ती तुम्ही तिच्या नावावर छापा.

बाई—( आवेशाने ) ती तुमच्या नावावर द्या. आमच मासिक बद पडण किंवा उशिरा निघण शक्य नाहीं आज राष्ट्राला स्त्रियाच्या उन्नतीची जास्त गरज आहे. स्त्रियाच मासिक आधीं निघाल पाहिजे.

भट—हे मला खपणार नाहीं—हा अपमान आहे हा आमच्या स्वातत्र्यावर घाला आहे. अरे, What-what-what ! म्हणे स्त्रियाच्या उन्नतीची राष्ट्राला गरज आहे हें कुठल नवीन राष्ट्र ?

बाई—( दोन्ही टाचावर गिरकी मारून ) तुम्ही पुन्हा बोलायला लागलातच.

भट—मी बोलणार, मधें बोलणार. पुन्हा बोलणार. बोलणार, बोलणार, बोलणार—

बाई—( त्याच्या आवाजाला आवाज भिडवून ) नाहीं ! नाहीं ! नाही !

भट—हो-हो-हो. अरे, What-what-what.

बाई—( रागानें दातओठ खाऊन ) मर्यादेच अतिक्रमण होत आहे.

भट—ही अमर्यादा होते आहे.

बाई—मी ऐकून घेणार नाहीं.

भट—मी ऐकायला उभा राहणार नाहीं.

गुण्या—साहेब, पण मी फुलवन्ती मासिक आज विकल. आता सरवती मासिक तेवढ परत आणल.

बाई—( आनदानें ) झाल तर. आमच मासिक आधींच बाहेर पडलेल आहे. आता तुम्ही आपल पाहून घ्या.

भट—( हातातलें धनुष्य खाली ठेवून–म्हणजे सायकलचा पपखालीं ठेवून) गुण्या, तू उद्यापासून कामावर येऊ नकोस

बाई—गुण्या, उद्यापासून तू आमच्याकडे कामावर ये

भट—तुझ्या पगारातले पाच रुपये दड दे.

बाई—गुण्या, तुला मी पाच सोडून दहा देतें

[ गुण्या, बाई आणि भट आपापल्यातच रमतात. भट म्हणतात शभर रुपये दड करीन. बाई म्हणतात दोनश देईन गुण्या एकदा हात पुढें करतो, एकदा मागें घेतो. देण नास्ति घेण नास्ति —इतक्यात मदा, रघु आणि यमू बाहेर येतात ]

मदा०—( यमूस पुढें ढकलीत ) यमे, तूच साग गडे

यमुना—इश्श्! मी कशी बोलू त्याच्याशीं?

मदा०—ए गडे, मला लाज वाटते.

यमुना—अन् गोष्ट चोरताना मला विचारायला आली होतीस का?

मदा०—ए, साग किं ग तेवढ—तू तरी काय केल आहेस? 'राधाबाला' नावाखालीं मावसभावाकडून गोष्ट लिहून घेतलीस तू तरी काय चोरच आहेस

यमुना—मला चोर म्हणतेस अन् वकीली करायला सागतेस—छान!

नारायण—( जवळ जाऊन ) मदे, जेवायच झाल का? झाल असल तर या दोघानाहि या खिडकीच्याबाहेर फेकून देतों.

मदा०—( धिटाईनें पदराशीं खेळत, भोळामोळा करीत, खालच्या मानेनें, किंचित् कापऱ्या आवाजात ) मी काहीं केल नाहीं त्या दिवशीं बसायला म्हणून त्या काशीबाई आल्या, अन् मासिकाला गोष्ट दे म्हणून पाठीस लागल्या आपली गोष्ट मी वाचीत होतें. तीच त्यानीं माझ्या हातातून ओढून नेली. मी इकडे सागायच विसरलें. अन् मग पुढ मला भीति वाटूं लागली

नारायण—( तिच्याकडे पाहून ) अरे-अरे-अरे! उगी बाळ तें! ( मदा चटकन हसते पदराने डोळे पुसते. )

भट—तुझ्यापुढ हद्द आहे

बाई—( त्याला खिजवीत ) अरे, What-what-what!

भट—मूर्ख आहेस तू.

बाई—अरे, What-what-what.

भट—मी सतापलों आहें, रागावलों आहे, कोपलों आहें, क्षोभित झालों आहें! हजार डोळे उघडलेले आहेत अरे, What-what-what!

नारायण—भटसाहेब, अहो भटसाहेऽब! आता दुपारची वेळ होत आली आहे उगीच सतापू नका पायाची आग मस्तकाला नेऊ नका स्रोजात निमकहराम आहे म्हणून म्हणा नि सोडून द्या मी उद्या सध्या-काळच्या आत तुम्हाला काही तरी लिहून देतों त्या गोष्टींचीं पान फाडून हीं त्या ठिकाणीं घाला अहो, वक्रशीरपणा हा आपला गुण नव्हे—

भट—( मुकाट्यानें उठून ) अरे, What what-what—आज मी अन्न घेणार नाहीं

बाई—अन्न नका घेऊ, मी तुम्हाला फळ खायला लावीन

[ दोघेंहिजणें जातात. यमू, गुण्या आणि रघू हसत त्याच्या पाठोपाठ गमत पाहण्याकरता म्हणून जातात. ]

मदा०—( नारायणरावाकडे चोरून पाहते ) हुश्श्!

नारायण—( बारीक आवाजात ) ऽग बाई ऽऽ, लेख ऽऽऽक! झाली का हौस पुरी?

मदा०—( खाली पाहत ) यमून तर आपल्या मावसभावाकडून लिहून घेऊन 'राधाबाला' या नावान गोष्ट दिली आहे.

नारायण—सगळे सारखे. भाऊ, नवरा, वडील, कुणाकडून तरी खरडून घ्यायच. खऱ्या लिहिणाऱ्या एकदोनच. ( काय हा आरोप? ) बाकी हा आमच्या घरातल्यासारखा प्रकार. मदे, मी तुझ्यावर रागावलों आहें

मदा०—( हसून ) मग मी काय करू?

नारायण—जेवायला वाढ.

मदा०—अजून अघोळसुद्धा नाहीं अन् जेवायला वाढू तरी कस?

[ यमू, रघु, गुण्या हसत हसत येतात. ]

गुण्या---( भटाचें अनुकरण करीत ) अरे, वहाट, वहाट, वहाट ! (हसतो

नारायण---गुण्या, स्त्रीदाक्षिण्याचे धडे तू कधींपासून गिरवू लागलास ( यमूकडे वळून ) हे एक दुसरे अगवाई लेखक ! यमूताई, मला मोठ्ठ काळजी आहे !

मदा०---( हसून ) हमाल आहे तिचा नवरा. काही काळजी नको. त गोष्ट लिहिणार नाहीं अन् ही लिहायला लागली तर तो हातोडाच डोक्या घालील !

यमुना---मदे ऽ ऽ ---

नारायण---( आश्चर्यानें ) अ ऽ ऽ ऽ ?

गुण्या---अरे ! वहाट, वहाट, वहाट,---रहाट, रहाट, रहाट---